[ भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-ग्रंथमाला पुस्तक २२ वें ]

# चंद्रचूड–दफ्तर

( कला पहिली )

## गंगोबा तात्यांची कारकीर्द.

संपादक
दत्तात्रेय विष्णु आपटे बी. ए.

प्रकाशक
दत्तो वामन पोतदार, बी. ए.
व
गंगाधरराव नारायणराव मुजुमदार
( चिटणीस भा. इ. सं. मंडळ, पुणें )



भाद्रपद शु. ४।१८४२.

किंमत ३ रुपये

श्री

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ पुणें.

## ( स्थापना शके १८३२ )

**सन १८६० च्या २१ व्या म्ह० सोसायटीज् रेजिस्ट्रेशन् अॅक्टान्वयें नोंदलेलें.**

संस्था शके १८३८ सालीं सरकारांत नोंदण्यांत आली. त्या वेळीं संस्थेचे उद्देश येणेंप्रमाणें ठरविले:—

( श्री ) भारतवर्षासंबंधीं ऐतिहासिक साधनें म्हणजे कागदपत्र, दस्तऐवज, बखरी, कैफियती, शिलालेख, जुने हस्तलेख, सर्व प्रकारचे सारस्वत ग्रंथ, कलाकुसरीचीं कामें, नाणीं, ताम्रपत्रें, मूर्ती, शिल्पकृत्यें, चित्रें आणि इतर हरतऱ्हेच्या ऐतिहासिक महत्त्वाच्या वस्तू जमा करणें व संरक्षिणें.

( ग ) असलीं सर्व साधनें संरक्षिण्याकरितां व प्रदर्शिण्याकरितां योग्य इमारती उभारणें.

( णे ) अशीं साधनें प्रसिद्ध करणें, त्याचप्रमाणें ऐतिहासिक संशोधनाचें कार्य जोरावण्याजोगे इतर ग्रंथ प्रसिद्ध करणें व भारतवर्षासंबंधीं ऐतिहासिक ग्रंथ व लेख प्रसिद्ध करणें.

( श ) हिंदुस्थानच्या इतिहासासंबंधीं संशोधन व त्याचा चिकित्सापूर्वक अभ्यास जेणेंकरून बळावेल व उत्तेजित होईल असे मंडळाला जरूर अगर योग्य वाटतील ते अन्य उपाय योजणें.

### कारभारी मंडळ शके १८४२.

अध्यक्ष.

१ रा. ब. का. ना. साने बी. ए.

उपाध्यक्ष.

२ रा. रा. चिं. वि. वैद्य एम्. ए. एल् एल्. बी.

३ श्री. खं. चिं. मेहेंदळे बी. ए.

चिटणीस.

४ रा. रा. द. वा. पोतदार बी. ए.

५ श्री. स. गं. ना. मुजुमदार

खजिनदार.

६ रा. अ. वि. पटवर्धन बी. ए.

सभासद

७ डॉ. श्री. कृ. बेलवलकर एम्. ए. पीएच्. डी.

८ ना. रा. ब. ग. कृ. साठे सी. आय्. ई.

९ रा. रा. न. चिं. केळकर बी. ए. एलएल्. बी.

१० रा. रा. वि. ल. भावे बी. एस्‌सी.

११ रा. रा. पां. न. पटवर्धन

१२ रा. रा. स. म. दिवेकर

१३ रा. द. वि. आपटे बी. ए

Candracuda - daptara

# चंद्रचूड--दफ्तर

( कला १ ली )

## गंगोबा तात्यांची कारकीर्द.

संपादक
दत्तात्रेय विष्णु आपटे, बी. ए.

Dattatreya Visnu Apte

प्रकाशक
दत्तो वामन पोतदार बी. ए.
व
गंगाधरराव नारायणराव मुजुमदार
( चिटणीस भा. इ. सं. मंडळ, पुणें. )



भाद्रपद शु ४।१८४२

किंमत तीन रुपये.




# चंद्रचूड दप्तर

## कला १ ली.

## अनुक्रमणिका.



---

# चंद्रचूड-दफ्तर



## विज्ञप्ति

मंडळाच्या दफ्तरखान्यांत चंद्रचूडदप्तर म्हणजे एक अमूल्य भांडार आहे. हा ठेवा कै. श्री. माधवराव अण्णासाहेब चंद्रचूड यांनीं मोठ्या कृपाळुपणें मंडळाचे स्वाधीन केला. एवढा मोठा संग्रह एकजात मंडळास नजर करण्याचा पहिला मान व श्रेय श्री. चंद्रचूड यांनीं मिळविलें व इतर सरदार आणि जहागिरदार वगैरेंस उत्कृष्ट उदाहरण घालून दिलें. श्री. माधवराव यांचे पश्चात् त्यांचे चिरंजीव श्रीमंत सरदार यशवंतराव ऊर्फ नानासाहेब यांनीं मागाहून आढळलेले आणखी कांहीं महत्वाचे रुमाल वडिलांप्रमाणें च औदार्य दाखवून मंडळास दिले. सदरहू कागदांबरोबर च त्यांनीं आपल्या घराण्यांतील उत्कृष्ट जुन्या संस्कृत प्राकृत हस्तलिखित पोथ्यांचा नामांकित संग्रहहि मंडळास नजर केला. इतकें च नव्हे, तर सदरहू संग्रह सुरक्षित ठेवण्यासाठीं एक दगडी कपाट हि आपल्या खर्चानें बांधून दिलें. असो.

चंद्रचूड-दफ्तर लावण्याचें काम हल्लीं चालू आहे. आतांपर्यंत मोजलेले कागद २१३७५ भरले असून, शिल्लक असलेले रुमालांतील कागद कमींत कमी ५।७ हजार तरी भरतील. मिळून एकंदर चंद्रचूड दफ्तरांतील कागद बारीक कागदसुद्धां **तीस हजार** धरण्यास हरकत नाहीं.

ऐतिहासिक दृष्टीनें हे कागद कालानुक्रमानें लावून ते हळूहळू खंडशः प्रसिद्ध करण्याचा मंडळाचा विचार आहे. ज्याप्रमाणें रा. खरेशास्त्री यांनीं छापलेल्या पटवर्धनी दफ्तरावरून मराठी राज्याच्या दक्षिणेकडील उलाढालींची सुसंगत माहिती मिळते, त्याप्रमाणें उत्तरेकडील राजकारणांसंबंधानें बरी च सुसंगत माहिती या चंद्रचूड-दफ्तरावरून आपणांस उपलब्ध होईल. पटवर्धनी दफ्तर, होळकर दफ्तर, शिंदेदफ्तर, काळे दफ्तर, फडणीस-दफ्तर, पुरंधरे दफ्तर वगैरे मिळण्यासारखीं निरनिराळीं दफ्तरें प्रकाशित झाल्याशिवाय मराठी साम्राज्याचा उत्तरंग यथार्थपणें चित्रित होणार नाहीं. पैकीं चंद्रचूडदफ्तर म्हणजे च पर्यायानें होळकर दफ्तर होय. अर्थात् श्री. होळकर सरकार यांनीं या दफ्तर प्रकाशनाचा भार उचलावा या हेतूनें मंडळानें श्री. सरकार सवाई तुकोजीराव महाराज होळकर यांचे कानावर आपला हेतु घातला. मंडळाचे हितचिंतक रा. ब. माधवराव विनायक किबे यांनीं या कामीं मंडळास मदत केली. हें काम बरे च खर्चाचें आहे. प्रथम हे तीस हजार कागद सर्व वाचून निवडले पाहिजेत. नंतर त्यांचा कालानुक्रम

ठरवून ते लावले पाहिजेत. तदनंतर, हे निवडलेले व लावलेले कागद बिनचूक नकललें पाहिजेत व त्यांवर योग्य त्या टीपा देऊन ते अधिकारी तज्ञांकडून संपादवून मग प्रसिद्ध केले पाहिजेत. या प्रचंड उद्योगाला काळ, वेळ व द्रव्य बरें च खर्चावें लागेल. रा. राजवाडे, रा. मुजुमदार, श्री. मेहेंदळे, प्रो. भानु वगैरेंनीं हें दप्तर दोन चार वेळ साधारणपणें चाळलें आहे, व त्यांच्या मतें यांत सुमारें दहा हजार कागद छापण्याजोगे निघतील. निवड करण्याच्या कामास एकाद्या तज्ञास एक वर्ष तरी खपावें लागेल. पत्रांचा कालानुक्रम ठरविण्याच्या कामांत त्यास दोन तीन वर्षे घालावीं लागतील. मग पुढें इतर संस्कार. असो; तर, हा एका तज्ञाचा जन्माचा उद्योग होऊन बसेल. वर दिलेले सर्व संस्कार करून सर्व दप्तर छापून काढण्यास कमींत कमी २५।३० हजार रुपये व निदान १२।१५ वर्षे तरी लागतील. श्री. होळकर-सरकारांपाशीं गोष्ट काढली त्या वेळीं ' हें आमचें आद्य कर्तव्य च आहे ' असें सहानुभूतीचे व यथार्थ उद्गार त्यांनीं काढले. यावरून आशा वाटते कीं, लवकर च मंडळाचे विनंतीचा आदर श्री. होळकर सरकार यांजकडून होईल.

हल्लींचा हा ग्रंथ ' चंद्रचूड दप्तर कलम १ ' या नांवानें प्रसिद्ध करीत आहोंत. त्यांतील कागदांवरून व संपादक रा. दत्तोपंत आपटे बी. ए. यांच्या पुढें जोडलेल्या प्रस्तावनेवरून चंद्रचूड दप्तराचे महत्वाची कल्पना येईल. सबंध दप्तर आधीं तपासून, कागद निवडून, ते कालानुक्रमानें लावून मग व्यवस्थेनें एकेक खंड प्रसिद्ध करणें अशी जी वर योजना सुचविली आहे ती अर्थात्च या ग्रंथाचे प्रसिद्धीचे वेळीं अमलांत आणणें शक्य नव्हतें. साधारणपणें दप्तर पाहतां, रा. राजवाडे, मुजुमदार वगैरेंनीं जे कागद निवडून व नकलून ठेवले होते त्यांतील कांहीं कागद घेऊन ते कालानुक्रमानें लावून, त्यांत हि मध्यें च नवीन उपलब्ध झालेले कांहीं त्या च कालांतील कागद सांपडले तसे घालून हा खंड बनविला गेला आहे. अशी योजना सत्वर करण्याचें कारण इंदूर येथील ' मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी ' या संस्थेनें चंद्रचूड दप्तर प्रकाशनाचे कामीं देऊं केलेली एक हजार रुपयांची मदत ही होय. नमुन्याचा एक खंड प्रसिद्ध केला म्हणजे दप्तराचें महत्त्व सर्व लोकांस कळेल, असें वाटून ' म. ग्रं. मंडळी ' इंदूर यांनीं उदारपणें देऊं केलेले मदतीचे आधारावर मंडळानें हा उद्योग हातीं घेतला. देऊं केलेल्या रकमेपैकीं रु. ५०० मंडळाकडे पावते झाले आहेत; व भा. इ. सं. मंडळाकडून ग्रंथप्रसिद्धीचें काम रेंगाळत न पडतें तर उरलेला हप्ता मंडळाचे पदरीं यापूर्वी च पडला असता. अनेक अडचणींमुळें प्रस्तुत खंडप्रकाशन लवकर उरकलें नाहीं. त्याचप्रमाणें शुद्धिपत्र हि बरें च विस्तृत जोडावें लागलें. असे जे कांहीं दोष घडले त्यांचीं कंटाळवाणीं कारणें सांगून समर्थन करण्यापेक्षां इतिहासभक्तांजवळ मेहेरबानीची तसलमात मागावी, हा च प्रशस्त मार्ग होय.

आतां शेवटीं, चंद्रचूड दप्तराची उपलब्धि कशी झाली याबद्दलची थोडी हकिकत येथें नमूद करून ठेवतों:—चंद्रचूड यांचें गांव निंबगांव. हें पुण्यापासून सुमारें बारा

कोसांवर आहे. जवळच त्यांचे यजमान होळकर यांचें वाफगांव हि आहे. जसा वाफगांवास होळकरांचा वाडा आहे, तसा च निंबगांवास चंद्रचूडांचाहि फार मोठा वाडा आहे. वाफगांवचा वाडा आतां दुर्दैवानें अगदींच पडून गेला आहे, परंतु चंद्रचूड यांचा वाडा अद्याप हि मुद्दाम जाऊन पहाण्यासारखा आहे. सबंध महाराष्ट्रांत जे कित्येक चांगले व नांवाजण्यासारखे जुने वाडे शिल्लक आहेत त्यांत या चंद्रचूडांच्या वाड्यास प्रमुख स्थान द्यावें लागेल. या वाड्यांत च हल्लीं मंडळांत असलेला चंद्रचूडांचा प्रचंड कागदसंग्रह व पोथ्यांचा संग्रह अस्ताव्यस्त पडलेला होता. तो आमच्यापैकीं रा. मुजुमदार हे निंबगांवीं लहानपणीं असतांना त्यांनीं पाहिला व त्याचे वाचनामुळें च त्यांचे मनांत इतिहाससंशोधनाची गोडी लागली आणि त्यांनीं तो संग्रह सुरक्षित बांधून ठेवला. यामुळें च तो बरा च सुव्यवस्थित असा मंडळाचे हातीं पुढें लागला. नाहींतर इतर मोठमोठ्या दफ्तरांप्रमाणें त्याची केव्हांच परवळण होऊन, न जाणों, शिमग्यांतील सोंगांच्या मुखवट्यांचे कामीं अगर वाणसवद्याच्या पुड्या बांधण्याचे कामीं, अगर पाण्याचे चुलीखालीं गेला असता !

सदर दफ्तर संपादण्याचे कामीं रा. दत्तोपंत आपटे यांनीं जे परिश्रम केले व मराठी ग्रंथोत्तेजक मंडळीनें तो छापण्याचे कामीं जी मदत केली त्याबद्दल मंडळातर्फे त्यांचे आभार मानणें अवश्य आहे. आतां लवकर च पुढील खंडप्रकाशनाचा सुयोग येऊन त्यायोगें देवी अहल्याबाई वगैरेंचीं जीं हजारों पत्रें या दफ्तरांत आहेत तीं प्रकाशित होऊन आपलें पितृऋणाचें ओझें हलकें व्हावें, अशी श्री म्हाळसाकांत चरणीं प्रार्थना आहे.

पुणें, मिती श्रावण शु. १ शके १८४२.

{ दत्तो वामन पोतदार
{ गंगाधरराव नारायणराव मुजुमदार

# मुक्कामांचें टिपण



या खंडांतील बहुतेक पत्रें माधवराव बल्लाळाच्या कारकीर्दींतील पहिल्या सहा वर्षांतलीं आहेत. त्यांचा पूर्वापर संदर्भ लक्षांत येण्यासाठीं माधवराव, रघुनाथराव व गंगोबा यांच्या मुक्कामांचें टिपण येथें दिलें आहे. हें टिपण करण्यास मुख्य आधार 'ऐतिहासिक लेखसंग्रह', 'वाडकृत पेशव्यांची डायरी खंड ८' या पुस्तकांचा मुख्यतः आधार घेतला आहे. गंगोबाचे मुक्काम या खंडांतील पत्रांवरून च बहुतेक ठरविले आहेत. याशिवाय राजवाडे यांच्या खंडांचा हि उपयोग क्वचित् केला आहे. मल्हारराव होळकराचे मुक्कामांची यादी पुढील खंडांत यावयाची आहे. बाजीराव बल्लाळाच्या कारकीर्दीपासून तों १६८८ च्या वैशाखापर्यंतच्या या कर्तृत्ववान् सरदाराच्या हालचालींचा बरोबर पत्ता लागण्यास चंद्रचूड दफ्तर हें उत्तम साधन आहे.

## माधवराव बल्लाळाचे मुक्काम



१६८३ आषाढ– माधवरावास वस्त्रें मिळालीं.

श्रावण ते पौष.–मोंगलाशीं लढाई; मोंगलाचा उरळीजवळ पराभव; रामचंद्र जाधवराव व मोंगलअली रुसून मराठ्यांकडे आले.

१६८३ पौष /
१६८४ वैशाख \ मुरगोड, सोंधें येथपर्यंत कर्नाटकची स्वारी; देशस्थ–कोंकणस्थ यांजमध्यें तेढ; सखाराम बापू घरीं बसून त्रिंबकराव व बाबूराव फडणीस कारभारी झाले.

१६८४ ज्येष्ठ व कार्तिक– चुलत्या–पुतण्यांचा तंटा.

,, कार्तिक व. ६– घोडनदीची लढाई. माधवरावांचा पराजय.

,, मार्गशीर्ष ते फाल्गुन– पटवर्धनाकडून मिरज घेतली. इतक्यांत भोसले व निजाम एक होऊन पुण्यावर निघाले म्हणून मोंगलाच्या मुलखांत स्वारीवर निघाले.

१६८५ चैत्र– वऱ्हाड, पैठण, नळदुर्ग.

,, वैशाख– हैदराबादपर्यंत खंडणी वसूल केली.

,, ज्येष्ठ– हैदराबादेहून परत सुगर कृष्णातीर पर्यंत.

,, अ. आषाढ. /
आषाढ. \ चितापूर, कलबर्गा, बीड.
निजामानें पुणें जाळलें व लुटलें.

,, श्रावण– राक्षसभुवनची लढाई. गोदावरीतीर, पैठण.

,, आश्वीन– कायगांव, नेवासें, जुन्नर, पुणें.

,, कार्तिक ते पौष–पुणें

,, माघ– जत, ममदापूर ( विजापूर ), कोकटनूर, कुडची.

,, फाल्गुन– रायबाग, मनोळी, धारवाड.

१६८६ चैत्र / रायहुबळी, सावनूर पर्यंत कर्नाटकची स्वारी करून उपरांत
१६८७ ज्येष्ठ ) स्वारी परत पुण्यास आली.

१६८७ ज्येष्ठ ते कार्तिक–पुणें.

,, मार्गशीर्ष– मोंगलाची भेट. त्यास कांहीं प्रांत परत दिला.

१६८७ पौष / खानदेश, वऱ्हाड मधून फिरून स्वारी परत पुण्यास
१६८८ वैशाख ) आली. माघ व. ८ रोजीं निजाम व माधवराव यांची वऱ्हाडांत कुरुंदखेडानजीक भेट झाली.

,, ज्येष्ठ व कार्तिक–पुणें

,, मार्गशीर्ष /
१६८९ वैशाख ) –हैदरावर कर्नाटकांत स्वारी

१६८९ ज्येष्ठ–श्रावण–पुणें

,, भाद्रपद–आश्वीन–आनंदवल्ली

,, मार्गशीर्ष–पुणें.

## रघुनाथराव दादासाहेब यांचे मुक्काम

वर दिलेल्या माधवरावांच्या मुक्कामांवरून रघुनाथरावाचे बहुतेक मुक्काम ठरण्याजोगे आहेत. त्यांनीं या अवधींत स्वतंत्रपणें केलेल्या स्वाऱ्यांचा तपशील असा आहे–

१६८६ आश्वीन शु.९–माधवरावांच्या मदतीसाठीं दादासाहेब कर्नाटकच्या स्वारीस नाशकाहून निघाले ते

,, माघांत दोघांची गांठ पडली. नंतर हैदराशीं तह करून

१६८७ ज्येष्ठ कृष्ण ५ रोजीं माधवराव व रघुनाथराव दोघे हि परत पुण्यास दाखल झाले.

१६८७ आषाढ–रघुनाथरावांनीं माधवरावांकडे अर्धे राज्य मागितलें. पण हें म्हणणें मान्य झालें नाहीं. नंतर ते आनंदवल्लीस गेले. तेथून उत्तरेस मल्हाररावाच्या मदतीस जाण्यासाठीं निघाले ते

१६८७ श्रावण ते पौष– प्रथम वऱ्हाडांत गेले. पुढें माधवरावांची भेट घेऊन व भोसल्याशीं तह करून उत्तरेस निघाले.

१६८७ माघ– दादासाहेब हिंदुस्थानच्या स्वारीसाठीं निघाले. ते जळगांव, एदलाबाद, बऱ्हाणपूर, नेमावर, भोपाळवरून

,, फाल्गुन– माळव्यांत पोंचले.

१६८८ अ. चैत्र–सिहोर, सिरोंज, बुंदेलखंड, झांशी, ओडसे.

,, चैत्र–ओडसें; भांडेर.

## मुक्कामांचें टिपण.



,, वैशाख–भांडेर, अलमपूर, शेवडे, मोह.

,, ज्येष्ठ<br>,, कार्तिक } –परगणे ग्वाल्हेर, गोहद.

१६८८ मार्गशीर्ष<br>१६८९ ज्येष्ठ } –उत्तर हिंदुस्थानांतून परत नाशकास.

---

## गंगाधर यशवंत चंद्रचूड यांचे मुक्काम



१६७५ वैशाख शु.९–नाशीक.

,, कार्तिक शु.८–रामगंगेच्या पुलासमीप.

१६७६ आषाढ शु.१३–दिल्ली.

१६७९ मार्गशीर्ष–यमुनातीर.

१६८१ वैशाख–देशीं परत आले.

,, कार्तिक त माघ–जयनगर, आग्रा, फतियाबाद.

१६८३ वैशाख–मथुरा.

,, श्रावण–दिल्ली प्रांत.

१६८४ आषाढ–देशीं परत आले.

,, फाल्गुन–चांदवडास मल्हाररावाबरोबर.

१६८५ ज्येष्ठ–बसालतजंगास आणावयास जातो.

,, भाद्रपद–राक्षसभुवनानंतर तहाच्या बोलण्यासाठीं औरंगाबादेस.

१६८५ कार्तिक ते मार्गशीर्ष–हिशेब समजाऊन देण्यासाठीं पुण्यास.

,, फाल्गुन–मुलीच्या लग्नासाठीं नाशकास.

१६८६ वैशाख ते आषाढ–जावर प्रांत उदेपूर.

,, फाल्गुन–दिल्ली, प्रयाग.

१६८७ चैत्र<br>,, माघ } –इटावे, झाशी, ग्वाल्हेर.

१६८८ अ. चैत्र–जाटवाडा.

,, चैत्र–इंदूर.

,, कार्तिक–देशीं येण्यास निघतो.

---

# पत्रांचा मितीवार अनुक्रम.



या खंडांतील पत्रें आगेंमागें मिळाल्यामुळें व तीं छापतांना त्यांवरील कांहींच्या मित्या **चुकीच्या** छापल्या गेल्यामुळें त्या **दुरुस्त** करून लेखांकांचा अनुक्रम मितिवार येथें दिला आहे. इतरत्र आढळणारीं पत्रें या ग्रंथांतील पत्रांशीं ताडून पहाण्याच्या कामीं या यादीचा चांगला उपयोग होण्याजोगा आहे.

* ही खूण केलेले व ३१ आणि ३७ ह्या लेखांकांचीं अस्सलें मंडळाचे संग्रहीं नाहींत.

| | |
|---|---|
| १६५६ कार्तिक शु. ८ | ४ |
| १६६१ भाद्रपद व. ११ | *६ |
| ,, आश्विन शु. १ | १२७ |
| ,, मार्गशीर्ष व. ११ | *५ |
| १६६९ कार्तिक व. ८ | ७ |
| १६७२ आषाढ शु. ६ | ८, ९, १० |
| ,, श्रावण शु. ३ | ११ |
| ,, श्रावण शु. ५ | *१२ |
| १६७४ आषाढ शु. ९ | ६१, १३ |
| ,, भाद्रपद शु. १३ | ३८ |
| ,, भाद्रपद व. २ | ३३ |
| ,, मार्गशीर्ष व. १४ | १४ |
| १६७५ चैत्र शु. १३ | ३४ |
| ,, चैत्र शु. १५ | १७ |
| ,, वैशाख व. १ | १८ |
| ,, वैशाख व. ६ | ३२ |
| ,, वैशाख व. ९ | १९, १२८ |
| ,, ज्येष्ठ शु. ९ | १२९ |
| ,, भाद्रपद व. १० | १३२ |
| ,, आश्विन शु. ९ | १३० |
| ,, | *१५, १६ |
| १६७६ आषाढ शु. १३ | २० |
| ,, माघ शु. १३ | १३३ |
| १६७७ श्रावण शु. ५ | *२१ |
| ,, मार्गशीर्ष शु. १ | २२ |
| १६७८ चैत्र शु १२ | २३ |
| ,, आश्विन व. ११ | २४ |
| ,, कार्तिक व. १० | २५ |
| ,, कार्तिक व. १४ | १३४ |
| ,, माघ शु. ७ | ३६ |
| १६७९ वैशाख व. ८ | १४७ |
| ,, भाद्रपद शु. १४ | २६ |
| ,, कार्तिक व. ११ | २८ |
| ,, मार्गशीर्ष शु. १ | २७ |
| ,, मार्गशीर्ष व. ७ | २९ |
| ,, माघ शु. १४ | ३० |
| ,, फाल्गुन व. २ | ४१ |
| ,, फाल्गुन व. ५ | ३९ |
| ,, फाल्गुन व. १३ | ४० |
| १६८० वैशाख शु. ५ | ४२ |
| ,, आषाढ शु. ६ | *४४ |
| ,, आषाढ व. १ | ४५ |
| ,, श्रावण शु. १० | १३५ |
| ,, आश्विन शु. १ | ४६ |
| ,, पौष व. ९ | ४७ |
| ,, माघ व. ८ | *४३ |

# चंद्रचूड-वंशावळ



( उपनांव—धनपावडे— देशस्थ, ऋग्वेदी, गोत्र विष्णुवृद्ध, सूत्र आश्वलायन. )

१ चूडामणपंत—१ गंगाधरपंत.

१ गंगाधरपंत— २ यशवंतराव ऊर्फ येसाजी × अकाबाई राहणार जुन्नर; ३ भगवंतपंत; ४ अनाजीपंत.

२ यशवंतराव— ५ बाजीपंत ( कनेरसरशाखा; ) ६ **गंगाधर ऊर्फ गंगोबा-तात्या** मृ. इ. स. १७७३ × १ अन्नपूर्णाबाई २पार्वतीबाई ऊर्फ काकू.

६ गंगोबातात्या— ७ सदाशिवराव ऊर्फ अन्याबा,* ८ कृष्णराव ऊर्फ बापू, ९ **यशवंतराव ऊर्फ दादाजी** मृ.इ. स. १७९९; १० माधवराव ऊर्फ रावसाहेब.*

८ कृष्णराव— ११ खंडेराव ऊर्फ बाबा मृत्यु इ. स. १८१९,

११ खंडेराव— १२ श्रीपतराव; १३ गंगाधरराव ( दत्तक नं. ३० ); १४ सदाशिवराव; १५ विनायकराव ( दत्तक नं. ३१ )

१२ श्रीपतराव—१६ रघुनाथराव; १७ कृष्णराव.

१७ कृष्णराव—१८ रंगराव; १९ गोविंद; २० रामचंद्र; २१ वामन; २२ लक्ष्मण.

१९ गोविंद—२३ काशिनाथ.

२३ काशिनाथ २४—नरहर; २५ नीळकंठ.

२० रामचंद्र—२६ माधवराव.

१४ सदाशिव —२७विनायक.

१६ रघुनाथ—२८विश्वनाथ.

९ **यशवंतराव**—२९ **माधवराव** ऊर्फ रावसाहेब मृ. इ. स. १८१९ × गोपिकाबाई.

२९ **माधवराव**—३० (= १३ ) **गंगाधरराव** ऊर्फ तात्यासाहेब मृ. इ. १८४६ × १ यशोदाबाई मृत्यु ( इ. स. १९१५ ) २ पार्वतीबाई.

३० **गंगाधरराव**—३१ ( = १५ ) **यशवंतराव** ऊर्फ दाजीसाहेब मृत्यु इ. स. १८५५.

३१ **यशवंतराव**—३२ **बळवंतराव** ऊर्फ बाळासाहेब मृ. इ. स. १९०५.

३२ **बळवंतराव**—३३ **माधवराव** मृ. इ. स. १९१०.

३३ **माधवराव**-३४ **यशवंतराव ऊर्फ नानासाहेब**; ३५ **सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब** मु. पुणें.

* नक्कल.

# शुद्धिपत्र.

खालीं महत्त्वाच्या चुकांचें शुद्धिपत्र दिलें आहे.

| पृ. ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- |
| १।१८ | आले | जाले |
| २।२२ | नाना ते | नानाते |
| ४। ४ | कामने | कालाने |
| ४।१५ | दण्याचे | हे देण्याचे |
| ६।१० | यशवंराव | यशवंतराव |
| ६।२९ व ३२ | माधराव | माधवराव |
| ६।३० | वेतन | वेतन व |
| ९। ५ | बारावे | वारावे |
| ११। ६ | भागाचा | भावाचा |
| ११। ९ | दत | दतक |
| १३। ८ | मोकदम | मोकदमांनीं |
| १३।१५ | पवले | पोवले |
| १३।१६ | वाकलवाडी | वाकलवाडी तां मजकूर |
| १३।२८ | माठेरे | मासीर |
| १३।२९ | कटेर | कढेरे |
| १४। ५ | सरवो | सखो |
| १४।२४ | तुम्ही घेणे | तुम्ही |
| १४।२७ | पुर्णमेस टकेचा | पुर्णमेस यात्रेस टके २॥ |
| १६।२१ | वारु | वारुन |
| १७।११ | तुकाजी | तुळाजी |
| १७।२५ | गोदनाक | गोम नाक |
| २०।१६ | ...इतावर | पंचाइतावर |
| २३।१९ | लोह्करामागें | होलकरामागें |
| २३।१९ | फ्याव्याची | वाफ्याव्याची |
| २६। ६ | सुरत अटवीसीं | सुरत अठाविसीं |
| ३१।२५ | पेशजी ला | पेशजी जाग |
| ३१।३२ | मारनुस | मारनुलेस |
| ३३। ५ | येवज रा॥ | येवज स्वा रा॥ |
| ४०।१२ | पा | या |
| ४०।३० | वतनी | वतनी गव |
| ४१।१९ | गबारे | गदरे |
| ४१।२१ | कुलकर्णी | जोसी कुलकर्णी |
| ४८। २ | दिलेमधें | दिलीमर्थे |
| ४९।ले. ३५–शिका | | ले. २:प्रमाणें |
| ५०।ले. ३८–मोर्तब | | ले. ३:प्रमाणें |
| ५१।ले. ३९ | सिकामोर्तब | ले. ५ प्रमाणें |
| ६१। २ | पारमेर | पारने |
| ६२।२४ | शरीभावनेचे | शरीरावनेचे |
| ६३।१७ | आ...सा | आल्सा |
| ६३।२० | वगैरे वाजवी | व गैराजवी |
| ६३।३२ | ली | हालें |
| ६७। २ | आली | आपी |
| २९। २ | सरकारच्या | लौक च या |
| ३१।१७ | धोपडची | धोपची |
| ६७।२८ | सरकाचे | सरकारचे |
| ७०।१९ | येथील | तेील |
| ७१।२४ | जरसी | म्जरसां |
| ७२। २ | आद्रेप्रमाणें | उझेप्रमाणें |
| ७२।१० | उपारि | उरी लि॥ |
| ७४।१२ | मारे | मारे |
| ७४।३० | धार माथा | टमाथा |
| ७५।२२ | तेता | तो |
| ७७।३० | जैसें | नेणे |

| पृ. ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|
| ७९।२१ | ईल | जाईल |
| ८८।२० | मासाने रोज | मासाने देउ |
| ८९।१८ | सीद् | वाटणी सीदे |
| ९४।२२ | साच्यार | सा च्यार |
| ९५। २ | वी | करावी |
| ९५। ३ | जाणार शोध | जाणार हा शोध |
| ९५।१८ | विश्वासरात | विश्वासराव |
| ९[illegible]।२१ | केलेल सर्व | तीर्थरूपांनीं—आपणांस लिहिले आहे त्यावरून कलेल सर्व |
| ९८।२१ | राम चो | राम याचे |
| ९८।१८ | आले | आहे |
| १०२।१ | करून न देणे | करू न देणे |
| १०२।७ | बाद् | बद् |
| ११३।५ | ही | तुम्ही |
| ११३।१ | येकासी | येरासी |
| ११४।२ | करील श्री | करील त्यास श्री |
| ११४।४ | वाजवी | सहसा |
| ११६। ? | पड | पडपेटा |
| ११६।२ | बाा | हक |
| १२०। | १५० | २५० |
| ११।ले. ३२ | | श्रीशाहुराजपदांभोजभ्रमरायितचेतसः विंबात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते |
| १२२। ७ | हीर व वाडी | बहिरववाडी |
| १२३। ६ | कूण तीस शे | येकुण तीसशें |
| १२३।२८ | वाह्लीस | राहिलीस |
| १२४। ४ | ,, | ,, |
| १२७।२९ | बंदोबस्त राखावयाचा | बंदोबस्तास्तव राहावयाचा |
| १२७।२९ | लिहिलात | लिहिला व |
| १२८। ९ | अलख | व अलख |
| १२९। ९ | गुखापा | गुर वापा |
| १२९।१० | अलीकडे | त्या अलीकडे |
| १३०।२४ | जर गोष्ट नाही तर हे | जरी हे गोष्ट नाही तर |
| १३३। ५ | समत | सनम |
| १३३। ९ | आईचा | याचा |
| १३३।१३ | नवसर थला | सरजामप्रत |
| १३३।१६ | सटवाजी | सयाजी |
| १३४।११ | भवगर्भ | भावगर्भ |
| १३६।२३ | भोकरे | भाकरे |
| १३७। ९ | खावयास | यावयास |
| १३७।१२ | पना रुपये | पनास रुपये |
| १३८।१४ | दादाजी यासी | दादाजीपासी |
| १३९।१७ | मास पक्षात येवनाचे | मास पक्षांत लौकरी च येवनाचे |
| १४१।१३ | ते | तो |
| १४३।२,४ | ह्मो | बो |
| १४३। ९ | तिलीगाचे | जोतिलिंगाचे |
| १४४। ८ | रामकृष्णराव | राा कृष्णराव |
| १४४।१४ | ... ... | तयारी |
| १४४।२१ | रावा बापास | राा बापास |
| १४४।२६ | ताकीदा चिरंजीव | ताकिद करावी चिरंजीव |
| १४४।३२ | आखर | आगर |
| १४६। ९ | जिल्हा | दिल्हा |

| पृ. ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|
| १४६। ९ | + + + | चंदेरी |
| १४६। ९ | नरवल | नरवर |
| १४६।१७ | राजेश्री माधोसिंगाकडील फौज जाऊन | राजे मा. फौज व नजीबखानाकडील फौज जाऊन |
| १४७। ५ | लिहिले | लिहिणे |
| १४७।ले. १६६ | श्री | श्रीमोरया |
| १४८।१७ | ता। | रा। |
| १४९।१४ | संताली | संताड |
| १४९।१५ | संताली राजश्री | संताड दूर करून राजश्री |
| १४९।१८ | सरकारच्या | सरकारचा |
| १४९।१९ | संताडियाबरोबर | संताडीयावर |
| १४९।२० | त्यामधे | पामधे |
| १४९।२२ | दरबार | दरबारचें |
| १४९।२३ | पत्री | पत्र |
| १४९।२८ | दोन | दोनसे |
| १५०।१८ | वरात | वराता |
| १५१।२१ | ...... | ता। केले |
| १५१।२१ | ... | निकड केली कीं |
| १५१।२८ | करून दाखऊ | करून मनसबा करून दाखऊ |
| १५१।३० | ... | भोजन |
| १५२।१३ | आलफ | आलफ रुो |
| १५३।१३ | कडेवली... | कडेवलीत पौ |
| १५३।१७ | ९९८९९॥।=। | ९९८९९॥=। |
| १५३।२४ | २५९६॥ | २५९६॥। |
| १५४।२२ | दिमत | हिमत |
| १५४।२३ | सुदामनिम्रो मेटीस | सुदामती प्रो आहोत मेटीस |
| १५४।२६ | पाले बहुत | पाले पाजे बहुत |
| १५५। ६ | मकाजी | जाकाजी |
| १५७। ४ | घृसणेश्वरजीची | घृस्रणेश्वरजींची |
| १५७। ३ | वेरुळची | यरुळची |
| १५७। ४ | पो। | रा। |
| १५७।३१ | पाटीकीचे | पाटिलकीचे |
| १५७।३४ | उपद्वाप | उपद्व्याप |
| १५९। ७ | राजमामान्य | राजमान्य |
| १५९।२२ | तो | ते |
| १६१।२० | ज्या जर्थील | ज्याजथील=ज्यास्ती |
| १६२।१२ | + + + | परंतु |
| १६३।२४ | माजूर | माहूर |
| १६७।१९ | लिहिले | तुम्ही न |
| १६८। ४ | चितसुधाता | चितसुधता |
| १६९।३० | दास | यास हि |
| १७१। ८ | समाराधना येक | समाराधना + + + येक |
| १७१।१५ | सत्वर | सत्वर सदरहू |
| १७३।२२ | + + स | बलिस |
| १७४। २ | विशेष मालगाव | विशेष + + + मालराव |




# प्रस्तावना.



चंद्रचूड दफ्तरांत थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दीपासून तों पेशवाई संपून इंग्रजीशाहीचीं १५।२० वर्षें होईपर्यंतचीं अनेक जातींचीं पत्रें आहेत. रा. वासुदेव शास्त्री खरे यांच्या प्रयत्नानें ज्याप्रमाणें पटवर्धनी दप्तर प्रसिद्ध झालें व पाणिपतानंतरचा दक्षिणेकडील इतिहास उपलब्ध झाला, त्याप्रमाणें चंद्रचूड दप्तराच्या प्रकाशनानें याच काळचा उत्तर हिंदुस्थानांतील इतिहास माहीत होणार आहे. या दप्तरांत मराठी व संस्कृत भाषेंत साध्या किंवा सांकेतिक अक्षरांनीं लिहिलेलीं व हिंदुस्थानांतील सर्व भागांचीच नव्हे तर कधीं कधीं युरोपांतील फ्रेंच राज्यक्रांति व नेपोलियनचीं युद्धें यांची देखील बातमी देणारीं हजारों पत्रें आहेत. मात्र या दफ्तरांतील रुमाल कालानुक्रमानें अद्यापि लागलेले नसून त्यांतील पत्रें बहुतेक रुमालांतून कशी तरी बांधून ठेविलीं आहेत.

कोणी इतिहासज्ञ त्याच कामास लागेल तर दोन तीन वर्षांत हीं पत्रें तो कालानुक्रमानें लाऊं शकेल. पण मला असें करतां आलें नाहीं. फुरसतीच्या वेळीं गेल्या दोन वर्षांत मीं हें दप्तर चाळलें व हजार बाराशें पत्रें निवडलीं. शिवाय, पूर्वीं रा. राजवाडे, प्रो. भानु व श्री. मुजुमदार यांनीं कांहीं पत्रें निवडून ठेविलेलीं होतीं; तीं हि वाचून पाहिलीं आणि कालानुक्रमानें लाविलीं. तेव्हां मला कळून आलें कीं, पाणिपताच्या युद्धानंतरचीं व विशेषतः देवी अहिल्याबाईच्या कारकीर्दींतलीं च पत्रें या संग्रहांत पुष्कळ आहेत. तीं प्रकरणशः लावणें शक्य आहे. पण त्यांतील अनेक व्यक्तींचा पूर्वापर संदर्भ लक्षांत येण्यास मल्हारराव होळकरांच्या कारकीर्दीची देखील माहिती मिळविणें आवश्यक आहे. शिवाय, चंद्रचूड घराण्यांतील सुप्रसिद्ध व्यक्ति जी गंगोबा तात्या तिचा मल्हाररावांच्या कारकीर्दीशीं निकट संबंध असल्यामुळें हीं पूर्वकालीन पत्रें आधीं हातीं घेणें अगत्याचें दिसलें.

अशा रीतीनें मल्हारराव होळकरांच्या मृत्युपर्यंतचा एक छोटा ऐक खंड तयार करण्याचा संकल्प मंडळाचे चिटणिसांच्या संमतीनें करून कामास प्रारंभ केला. पण त्या च वेळीं दप्तर चाळण्याचें काम चालू होतें व अर्धें अधीक पुस्तक छापल्यानंतर चंद्रचूड दप्तराचे नऊ दहा नवे रुमाल मंडळाकडे आले व त्यांत मल्हाररावाच्या कारकीर्दींतले कित्येक चांगले कागद माझ्या पहाण्यांत आले. अर्थात् त्यांचा संग्रह या भागांत करणें अगत्याचें असल्यामुळें, नवीं पत्रें सांपडतील तसतशीं ठिकठिकाणीं घातलीं. यामुळें पत्रें कालानुक्रमानें छापलीं गेलीं नाहींत, पुष्कळ मागें

पुढें झालीं आहेत. हा अव्यवस्थितपणा पासून होणारा त्रास चुकविण्यासाठीं या खंडांतील पत्रें कालानुक्रमानें लावलीं असतां त्यांचा क्रम कसा घ्यावा लागेल हें मीं स्वतंत्रपणें दाखविलें आहे.

मल्हाररावांच्या कारकीर्दीतलीं पत्रें या दफ्तरांत फार कमी आहेत व आहेत तीं देखील विस्कळित आहेत. यामुळें त्यांच्या साहाय्यानें एखादें प्रकरण स्वतंत्रपणें लिहितां येणार नाहीं. तथापि इतरत्र उपलब्ध असलेल्या माहितींतील उणिवा भरून काढण्यास मात्र या पत्रांचा उपयोग चांगला होण्याजोगा आहे.

तथापि केवळ मल्हाररावांच्या हालचालींकडे च लक्ष देऊन या खंडांतील पत्रांची निवड केली नाहीं. चंद्रचूड घराण्याचा इतिहास व तत्कालीन सामाजिक व आर्थिक परिस्थिति यांचें स्पष्टीकरण होण्यास जीं पत्रें उपयोगी पडतील असें दिसलें त्यांपैकीं कांहीं पत्रांचा नमुन्यादाखल यांत समावेश केला आहे. उदाहरणार्थ, चंद्रचूड घराण्यांतील अनेक पुरुषांनीं संपादन केलेल्या वृत्त्या, इनामें व सरंजाम यांच्याविषयींची माहिती देणारीं आज्ञापत्रें व महजर या दफ्तरांत पुष्कळ आहेत. त्यांपैकीं थोडे च येथें दिले आहेत. गंगाधर यशवंत ऊर्फ गंगोबा तात्या चंद्रचूड यांचें सविस्तर चरित्र पुढील भागांत द्यावयाचें आहे; पण येथें छापलेल्या पत्रांचा पूर्वापर संदर्भ कळण्यासाठीं गंगाधर यशवंताच्या चरित्राची रूपरेषा देणें अगत्याचें आहे.

थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत खेड तालुक्यांत निंबगाव येथें बाजी यशवंत व गंगाधर यशवंत हे दोन बंधु चार पैसे कमावून वतनें व वृत्त्या विकत घेत होते. पण या भावांचें बालपण कशा स्थितींत गेलें व त्यांचा बाप कोणता धंदा करीत होता तें निश्चित करण्यास कांहीं साधन नाहीं. तथापि, थोडासा द्रव्यसंचय होतां च वतनें व वृत्त्या मिळविण्यासाठीं त्या काळचे लोक किती उत्सुक असत याची कल्पना या दफ्तरांत आढळणाऱ्या अनेक महजरांवरून चांगली येण्याजोगी आहे. चंद्रचूड घराण्यांतील अनेक पुरुषांनीं व मल्हारराव होळकरांसारख्या सरदारांनीं देखील पाटिलकी, देशपांडेपण, जोशीपणाची वृत्ति वगैरे संपादन करण्यासाठीं वतन-दारांच्या सभा व पंचाइती भरविल्या यांची माहिती देणारे शंभर सवाशें कागद या दफ्तरांत आढळले. पण ते एका च नमुन्याचे असल्यामुळें त्यांपैकीं फक्त थोडे मास-ल्यासाठीं येथें दिले आहेत. विसाव्या शतकांत ज्याप्रमाणें बँकांत पैसे ठेऊन त्या-पासून मिळणाऱ्या व्याजावर व्यवहार करणें हा शहाणपणाचा व स्थैर्यनिदर्शक मार्ग गणला जातो त्याप्रमाणें पंधराव्या शतकापासून अठराव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत महा-राष्ट्रांत उद्योगी व महत्त्वाकांक्षी पुरुषानें वतनें आणि वृत्त्या संपादन करून राजकारणांत शिरण्याचा त्या वेळचा शिष्टसंमत मार्ग होता. सरदाऱ्या व जहागिरी राज्यक्रांतीबरोबर लयास जात किंवा उदयास येत. पण वतनें अनेक शतकेंपर्यंत कायम राहतात, असा अनुभव आल्यामुळें त्यांविषयींची आसक्ति समाजांत दृढमूल झाली होती. या प्रवृ-त्तीस अनुसरून दोघां चंद्रचूड बंधूंनीं वतनें व वृत्त्या मिळविण्यास आरंभ केला

नाहीं. याप्रमाणें वतनदार बनल्यानंतर वडील भावानें फारशी हालचाल केली नाहीं. पण धाकट्या भावाची म्हणजे गंगोबा तात्याची महत्त्वाकांक्षा मात्र वाढत्या प्रमाणावर होती. त्यानें दरबारांत शिरून मल्हारराव होळकरांची फडणीशी मिळविली. गंगोबास 'श्रीमंत राजश्री पंत प्रधान याचे तरफेनें फडणीस' नेमण्यांत आलें व रामाजी यादव यास 'राजश्री मलारजी होलकर सुभेदार याचे तरफेन खासनिसी कुल लिहिणियाचा रोजगार' देण्यांत आला. परंतु, या दोघांत बेबनाव उत्पन्न झाला. ही बातमी चारचौघांना कळल्यामुळें त्यांनीं मध्यस्ती करून मिळकतींपैकीं शेंकडा ५५ गंगाधर यशवंतास व ४५ रामाजीपंतास असें ठरवून दिलें; व ही यादी मल्हारराव होळकरांच्या शिक्यानिसी झाली. गंगोबास पुणें दरबाराचा पाठिंबा होता व त्याच्या तर्फे त्रिंबक विनायक दरबारांत खटपट करण्यास तयार होता. यामुळें "येथील कैद्-कानूप्रमाणें रा रामाजी यादव वर्ततील तरी उत्तम आहे न वर्तत तरी तुम्ही येथे येणें जे आज्ञा कर्तव्य ते करून आपले समाधान असो देणे" असें बाजीराव बल्लाळाचें पत्र गेलें होतें. यामुळें गंगोबाशीं तडजोड करणें रामाजीपंतास प्राप्त होतें. पण ही तडजोड कायम टिकली नाहीं; व शेवटीं रामाजी यादवास अधिकारभ्रष्ट व्हावें लागलें. बाजीराव बल्लाळाची कारकीर्द संपली तेव्हां गंगोबा, पेशव्यांच्या तर्फें होळकराजवळ फक्त फडणीस म्हणून वागत होता. पण नानासाहेबांच्या कारकीर्दींत त्याचें वजन वाढून तो महत्त्वाचा पुरुष होऊन बसला. शके १६७४ पासून शिंदे व होळकर यांचें वैमनस्य वाढून तें मिटविण्यास काय तोड काढावी या अडचणींत पेशवे असल्यामुळें गंगोबा सारख्या कर्त्या पुरुषास आपलें महत्त्व वाढविण्यास चांगली संधी मिळाली. या सरदारांची दिलजमाई करण्यासाठीं राघोबा निघाला होता; त्याची व गंगोबाची गांठ पडली आणि त्यानें 'निष्ठेनें कितेक मनसुबे करावयाचें' अभिवचन दिलें, यामुळें नानासाहेबांस 'बहुत संतोष जाला.'

शके १६७५ च्या सुमारास मल्हारजी होळकरांकडे पुणें दरबारची कोणकोणतीं कामें अडून राहिलीं होतीं याची माहिती लेखांक १५ व १६ या दोन यादींवरून मिळण्याजोगी आहे या वेळीं मोगलाशीं नुकता च तह झाला होता व दिल्लीकडील बादशहाचीं पत्रें आल्यामुळें तिकडे फौज पाठविण्याचें निश्चित झालें होतें. इतक्यांत मल्हाररावानें मोगलांचे कित्येक किल्ले घेतले व ही कलागत उत्पन्न करून तो दिल्लीस जाण्यास निघाला. या कामांत मल्हारराव व गंगोबा हे एकविचारानें वागत असावे असा नानासाहेबांचा तर्क होता. त्यामुळें त्यांनीं गंगोबास रागानें पत्र लिहून कळविलें कीं "मोगलासी इमान दिल्हे असता किल्ले घेणें सर्व प्रकारें योग्य नव्हे दुसरियानें लबाडी केली तरी तुम्ही ताकीद करावी उफराटे तुम्ही च बेमानी करूं लागलें हे सहसा योग्य नाही इकडे कलह लाऊन तुम्ही हिंदुस्थानास जावें हे सहसा कामाचें नाही इकडील नीट करून स्वस्थचीत्तपणे जावें [ हा ] उत्तम पक्ष." ( ले. १२८ ).

नानासाहेबांनीं हें पत्र रघुनाथरावाच्या सांगण्यावरून पाठविलें होतें. कारण मोगलाच्या मनांतून एक वेळ उत्पात करून दिली जहागीर परत घ्यावी अथवा कांहीं तरी आपलेसें करावें असें असून मोगलाकडे " मल्हारबाचें राजकारण आहे त्याच्या सूत्रें किल्ले घेऊन आपण हिंदुस्थानास जातात इकडे मोगलानें सल्ला बिघडावा " असा एकंदर व्यूह रचलेला आहे; तेव्हां गंगोबास व मल्हारबास नानासाहेबांनीं पत्रें पाठवून भेटीस आलें च पाहिजे, असें लिहिण्याबद्दल रघुनाथरावानें नानासाहेबांस कळविलें होतें. ( राजवाडे खंड १ पृ. ११–१३ पहा ).

या वेळीं आपण बजावलेल्या कामगिरीचें वर्णन स्वत: गंगोबानें गणेश दीक्षित पोंड्रिक बरे यास पाठविलेल्या एका पत्रांत केलें आहे ( ले. ३३ ). "दैवीयोगें व तुमचे आशीर्वादें करून श्रीमंताचा व राजश्री सुभेदाराचा सारख्याचा प्रसंग उत्तम रीतीनें जाहाला उपरांतिक अवरंगाबादेच्या येवनाचा सख्याचा प्रसंग हि येथे तुमच्या च आशीर्वादेंकरून उत्तम संपादून दिल्हा दक्षेणेच्या सख्याचा योग श्रीनें चांगला केला."

यानंतर पांणपताच्या युद्धापर्यंत मराठ्यांच्या उत्तर हिंदुस्थानावर ज्या तीन स्वाऱ्या झाल्या त्यांत गंगोबा हजर होता.* शके १६८१ च्या कार्तिकांत गिलच्या लाहोर प्रांतीं आला तेव्हां साबाजी पाटील व तुकोजी होळकर मागें हटत शुक्रताल-पर्यंत आले. तेव्हां गंगोबा मल्हारराव होळकरांबरोबर जयपुराकडे होता. होळकरानें या वेळीं जयपुराकडे गुंतणें बरें नव्हे, 'जयपुरचें पारपत्य येथास्थित मनोदयाप्रमाणें, उभयता सरदार एकत्र असालेया, होऊन येईल'; याकरितां जयपुर प्रांतीचा निर्गम करून दिल्लीकडे होळकरांनीं यावें असें जानराव वाबळे यांनें गंगोबास कळविलें ( ले. १३७ ). त्याप्रमाणें होळकरांचें कांहीं सैन्य उत्तरेकडे गेलें. शेटियाजी खराडे दोन चार हजार फौजेनिशीं अबदालीच्या तोंडावर गेला. त्याच्या बरोबर गंगोबाचा पुतण्या (विनायक बाजीराव ?) व आनंदराव ( रामाजी यादवाचा मुलगा ) हे सरदार मदतीस गेले होते. गंगोबा व मल्हारराव या आघाडीत नव्हते, कांहींसे मागें राहिले होते. या वेळीं अबदालीनें पस्तीस कोसांवरून येऊन अचानक छापा घातला व मराठ्यांच्या हाताखालीं असलेल्या सात आठ हजार फौजेचा धुवा उडविला. यांतून 'विरळा कोणी पळून जाऊन वाचला असला तर असेल.' ( ऐ. ले. सं. नं. १७ व १९ )

यानंतर भाऊसाहेबांनीं अबदालीचें पारिपत्य करण्यासाठीं जी इतिहासप्रसिद्ध मोहीम केली त्या वेळीं गंगोबानें काय कामगिरी केली ह्याचा पत्ता लागला नाहीं. पण पाणिपतच्या समरांगणांतून मल्हारराव परत आला तेव्हां त्याच्याबरोबर गंगोबा होता. या वेळीं नानासाहेब शिरोंजेवर होते. त्यांनीं सटवोजी जाधवरावास पत्र पाठविलें कीं

* म. इ. सा. खं. ६ ले. ३४१.

'तुम्ही व राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री नाना पुरंदरे ऐसे मिळोन गोहदवाल्याचा बंदोबस्त करणें.' त्यावरून हे तिथे गोहदेस शह देऊन बसले ( खं. ६ ले. ४०९ ). यानंतर गंगोबा जाटाशीं बोलणें करण्यासाठीं मथुरेस गेला होता ( खं. ६ ले ४१४ ).

यापुढें लौकर च म्हणजे १६८३ च्या ज्येष्ठ व. ६ रोजीं नानासाहेब मरण पावले; व निजामानें पुण्यावर स्वारी करण्याची तयारी केली. यामुळें उत्तरेकडील सर्व कारभार सोडून मराठ्यांना आपलें घर संभाळण्याकडे लक्ष देणें भाग पडलें.

हें घर संभाळण्याचें काम राघोबाकडे आलें आणि तो तर या कामास अत्यंत अयोग्य होता. नानासाहेबांच्या कारकीर्दींत कर्ज केलें असलें तरी अनेक प्रसंगीं शौर्य गाजवून त्यानें पंजाबपर्यंत मराठ्यांचें नांव सर्वतोमुखीं केलें होतें. पाणिपत येथें भाऊसाहेबांना यश आलें असतें तर उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांचा अंमल प्रथम स्थापित करण्याचें श्रेय राघोबास मिळालें असतें. पण तो सर्व च ग्रंथ आटपून राघोबास भाऊबंदकींत लक्ष घालावें लागलें, तेव्हां त्याची धांदल उडाली. त्याच्या आयुष्यक्रमास या वेळेपासून अगदीं निराळें वळण लागलें. हें आनंदीबाईच्या आगमनानें लागलेलें असो किंवा स्वतःच्याच अकलेनें प्रादुर्भूत झालेलें असो. राघोबास पेशवाईचीं सूत्रें आपल्या हातीं घेण्याची अनावर इच्छा झाली व या महत्त्वाकांक्षेच्या पायीं त्याच्या हातून अनेक अपराध घडले यांत संशय नाहीं.

भाऊसाहेबांच्या मदतीसाठीं नानासाहेब उत्तरेकडे निघाले तेव्हां निजामानें देशीं दंगा करण्याची तयारी केली. त्यास दाबांत ठेवण्याच्या कामगिरीवर दादासाहेबांची योजना करून नानासाहेब उत्तरेकडे गेले व तेथून परत येऊन पुण्यास वारले. तेव्हां निजामानें उघडपणें युद्धाची तयारी चालविली. त्यास तोंड देण्यासाठीं दादासाहेबास देखील सैन्याची जमवाजमव करणें प्राप्त होतें. शके १६८३ च्या पावसाळ्याअखेर मराठ्यांची सगासरी सत्तर हजार फौज जमा जाहली. पण ही फौज जमण्यापूर्वी दादासाहेब नागनल्याचा घाट उतरून माहूरपर्यंत गेले. तेव्हां ' थोड्या फौजेनिशीं तुम्ही मोगलावर गेला यामुळें तो आटपणार नाहीं उलट तो पुण्यावर फौज पाठवील व चोहोंकडे फंदफितूर वाढून फजीती होईल. ' अशा अर्थाचें पत्र गोपिकाबाईनें दादासाहेबांस पाठविलें होतें. त्याचें उत्तर लिहितांना राघोबानें जे उद्गार काढले आहेत त्यावरून राघोबाच्या अंतःकरणांत अद्याप कलीचा प्रवेश झाला नसावा, असा तर्क करण्यास जागा आहे. "आम्ही तीर्थरूप नानासाहेब व भाऊसाहेब यांचे शागीर्द आहों लागभाग पाहून च जें करणें तें करितों उतावळी करीत नाहीं असें करितां होणें ईश्वराचे हातीं" असें आश्वासन देऊन युद्धपद्धतीसंबंधानें रघुनाथराव म्हणतो "भोसले व गाइकवाड व मल्हारबा येणार आहेत भोसले तरी लौकर च येणार आहेत मातबर जमा होईतोपर्यंत सफेजंगाची लढाई करीत नाहीं चांभूजी नाईक व आणीक पथक मातबर आहेत त्याजकडून गनिमी तऱ्हेने झुंजवून दोन महिन्यांत मोगल हि दबेल व आमची फौज हि फार जमा होईल

पौषमासी अथवा माघमासी थोरली लढाई होईल ऐसें योजिलें आहे." मोगलाचें पारपत्य करणें अत्यवश्यक आहे असें दाखविण्यासाठीं रघुनाथराव म्हणतो "गडबडीमुळें चार किल्ले गेले तरी कांहीं चिंता नाहीं. उभयता तीर्थरूप मातबर होते त्यांचा दबाव तुटला याजमुळें हालीमाजी जाहाली लोकांचे मतें दबलत सावरणार नाहीं म्हणोन लबाड्या चौंकडे शत्रूनीं केल्या परंतु अशा गडबडीवर जाऊं नये एक मोगलाचें पारपत्य जाहाले म्हणजे चार आभाळें उठलीं आहेत हीं विरतील." तथापि अडचणीची वेळ ओळखून मोगलाशीं तह केल्यास काय होईल असा गोपिकाबाईचा प्रश्न होता. त्याचें उत्तर देतांना रघुनाथराव लिहितो "ही गोष्ट कदापि व्हावयाची नाहीं. दबून सलूख केला तरी तो वरसास बोकांडी बसेल यास्तव लबाडी फिरोन न करी असें शासन केलें पाहिजे वडिलीं दम न सोडाना पुण्याची आशा सोडावी डोंगरावर च राहावें नाचण्या वऱ्याची भाकर खावूं परंतु मोगलास दमास आणू जर मोकळें सोडिलें तरी वरसास सवकेल." ( ऐतिहासिक टिपणें भाग २ पृ. २६।२७ ).

रघुनाथरावाच्या मनाप्रमाणें काम होण्यास भोसले व होळकर यांनीं मराठी सैन्यांत दाखल होणें आवश्यक होतें. याप्रमाणें जानोजी भोसले मार्गशीर्षांत येऊन पोंचला व मोंगलाचा पराभव करण्याच्या कामीं त्यानें चांगली मेहनत घेतली. ( ऐ. ले. सं. नं. ५२ ). मोगलाचा शह जवळ येत चालला तेव्हां होळकरांनीं मोठ्या मजलींनी येऊन पोंचावें म्हणून त्या बोलावण्यासाठीं स्वतः श्रीमंत च जाणार होते; परंतु "दाटी जाली यास्तव बनलें नाहीं. तरी सुभेदार कांहीं परके नाहींत. वडीलपणें या वेळेस येऊन संरक्षण करणें हे च त्यास योग्य आहे, ... मोगलाचें प्राबल्य जाल्यास परिणाम कसा हे हि आपल्यास कळत च आहे" वगैरे मजकुराचें पत्र गंगोबाच्या नांवें आलें होतें ( ले. ५३ ). परंतु होळकर या वेळीं देशीं येऊन पोंचले नाहींत.

इकडे मोगल टोकयांचें लिंग फोडून, चांभारगोंद्याची नगरी करून व अनेक ठिकाणीं गोवध करून उरळीपर्यंत आला. परंतु मोगलाच्या या अत्याचारामुळें त्याच्या बाजूची हिंदू मंडळी खट्टी झाली होती. त्यांनीं पुणें दरबाराशीं तह करण्याचा विचार केला. रामचंद्र जाधवराव याचे मार्फत पुणेकरांचा वकील मोगलाकडे गेला. पण मोगलानें त्याची बेअब्रू केली. तेव्हां रामचंद्र जाधवराव मोगलाकडून रुसून निघाला. त्यास सेनापतिपद देऊं करून मराठ्यांनीं ठेऊन घेतलें. जाधवरावानें आपणाबरोबर निजामाचा भाऊ मोगलअली यास हि आणिलें होतें.

या वेळीं मराठ्यांचें सैन्य सवा लाखापर्यंत जमलें होतें; व मोगलाच्या सैन्यांत वर सांगितल्या प्रमाणें फूट पडली होती; यामुळें त्याला तह करणें भाग पडलें. या तहा अन्वयें मोगलअली व जाधवराव यांचा चाळीस लक्षांची जहागीर निजामाकडून देण्यांत आली. ( खंड १० पत्रांक २ ).

ही हकीकत येथें विस्तारपूर्वक देण्याचें कारण 'सर्व प्रकारें अनुकूल परिस्थिति असून देखील सत्तावीस लाखांचा मुलुख देऊन राघोबानें निजामाशीं तह केला' असा मजकूर या तहसंबंधीं बहुतेकांनीं लिहिला आहे; त्यास आधार ग्रांडफच्या च वाक्याचा दिसतो ( Vol. II p. 166 ). पण हें विधान बरोबर नाहीं. निजामअलीखान याजपासून चाळीस लक्षांची जहागीर घेऊन सला केला असें माधवराव बल्लाळ स्वतः लिहितो ( खं. १० पत्रांक २ ); आणि प्रस्तुत खंडांतील ले. १३९ वरून त्यास दुजोरा मिळतो.

या युद्धांत शेवटीं दादासाहेब कुचराई करीत असून 'माधवराव पेशवे तमाम लोकांचा दिलासा करितात सर्वांची ममता त्यांच्या पायाशीं फार आहे.' असा उल्लेख आढळतो ( ऐ. ले. सं. नं. ५२ ). यावरून दादासाहेब व सखाराम बापू यांनीं या सुमारास बेकी पक्ष उपस्थित केला असून निजामास सत्तावीस लक्षांचा मुलूख देण्याचा गुप्तपणें करार केला असण्याचा बरा च संभव आहे. यासंबंधीं अधिक माहिती चंद्रचूड दप्तरांत मिळणें शक्य आहे. महिपतराव कवडे या वेळीं मोगलाच्या सरहद्दीवर होता; त्याचीं बरींच पत्रें चंद्रचूड दप्तरांत आहेत. त्यांपैकीं चार पांच च या खंडांत आलीं आहेत.

यानंतर सखाराम बापूस कारभार सोडून घरीं बसणें भाग पडलें; आणि त्रिंबकराव मामा व बाबूराव फडणीस यांनीं सर्व राज्यकारभार चालवावा, कर्नाटकची मोहीम करून मिरज पटवर्धनास द्यावी आणि हैदराचें पारपत्य करावें असें ठरलें. हा ठराव गोपिकाबाईनें केला व त्यास दादासाहेबांनीं वरकरणी मान्यता दिली. पण लौकर च बाबूराव आणि त्रिंबकराव यांना दादासाहेबांचा विश्वास न पटल्यामुळें सर्वजण पुण्यास परत आले. गोपिकाबाईच्या आग्रहावरून त्रिंबकराव मात्र पुनः माधवरावाच्या मदतीस कर्नाटकांत गेला.

दादासाहेब पुण्यास आल्यापासून पुनः सखाराम बापूच्या तडाक्यांत सांपडले. गोपिकाबाईची इच्छा बाबूराव फडणीसाच्या तंत्रानें दादासाहेबांनीं कारभार करावा अशी होती. पण तें दादासाहेबांस पटेना. या वेळीं मल्हारराव होळकर देशीं आले होते. त्यास आपणाकडे ओढून घेण्याची दोन हि पक्षांनीं खटपट केली. या सुमारास ज्येष्ठांत माधवराव कर्नाटकची स्वारी आटोपून पुण्यास आले. तेव्हां दरबारांत दोन हि पक्षांचीं भांडणें चांगलीं विकोपास गेलीं होतीं. हरप्रकारें करून दादासाहेबास ठेऊन त्यांचें व तडजोड करावी अशी माधवरावांची फार इच्छा. त्यांनीं व त्रिंबकरावांनीं दादासाहेबास सखाराम बापू व पुरंधरे यांच्या कचाट्यांतून सोडविण्याचें ठरविलें. त्रिंबकरावानें दादासाहेबांची गांठ घेऊन त्यांची कानउघाडणी केली आणि ' दौलत बुडून माझा अंतानें सासर फोडून घेतां ! '' असें बजावलें व बरा च युक्तिवाद सांगितला. तेव्हां रघुनाथरावानें शुद्धीवर येऊन ''मी काय करूं ? चौघे जण मला नाना प्रकारचे कुतर्क सांगोन 'निघावें' म्हणतात यामुळें मी बोलिलों'' अशी कबुली दिली. यानंतर माधवरावानें हि राघोबाचे पाय धरून राहण्याबद्दल

विनंती केली. शेवटीं राघोबाची खात्री होऊन तो दरबारांत आला आणि " माधवराव धनी, त्रिंबकराव कारभारी. सर्वांनीं यांच्या विचारें वर्तावें " असें बजावलें. तेव्हां 'बहुत उत्तम ' असें मल्हारजी होळकर म्हणाले. पण गंगोबा चंद्रचूड यांनीं प्रश्न केला कीं, 'दोन फळ्या जाल्या त्याची गत काय ! ' तेव्हां दादासाहेबांनीं उलट प्रश्न केला 'आतां वेड्यासारखा पुसतो काय!' हे शब्द ऐकून दादासाहेबांच्या पक्षांतील मंडळीचीं ' गात्रें विस्कळित ' जालीं.

पुणें दरबारांतील या वेळची ही सविस्तर हकीकत 'इचलकरंजी दफ्तरांतील' नं. ६६ च्या लेखांकांत आलेली आहे त्यावरून मल्हाररावानें एकी करण्याचा च प्रयत्न केला असें दिसतें. तथापि या प्रयत्नाचा उपयोग झाला नाहीं. दादासाहेब पाषाणास जातों, योगाभ्यासासाठीं नर्मदातीरीं जातों, अशा अनेक सबबी सांगून व पायां पडणाऱ्या माधवरावाच्या विनवणीकडे दुर्लक्ष करून नाशीकच्या वाटेनें निघाले आणि औरंगाबादेकडे मोंगलाचें साहाय्य मिळतां च ते परत फिरले. या प्रकरणाचा शेवट घोडनदीच्या लढाईंत होऊन माधवराव दादासाहेबांच्या स्वाधीन झाले.

यानंतर दादासाहेबांनीं प्रतिपक्षास म्हणजे माधवरावाच्या पक्षास सामील असलेल्या अनेक सरदारांच्या जहागिरी काढून घेऊन त्यांच्यावर सूड उगविण्याचें धोरण पत्करल्यामुळें हे सरदार मोंगलास मिळाले; आणि त्यांच्या च सल्यानें जानोजी भोसल्यानें देखील या वेळीं मोंगलाशीं 'साठा चाळीशी'चा तह करून पुण्यावर स्वारी करण्याची तयारी चालविली. हा सर्व प्रकार चालला होता तेव्हां दादासाहेब व माधवराव मिरजेकडे गुंतले होते. त्यांना मोंगल व भोसले यांच्या सैन्याशीं झगडण्याची तयारी करणें अगत्याचें आहे असें दिसून आलें. सखाराम बापूच्या सल्यानें गनीमी पद्धतीचा या वेळीं आश्रय करण्याचें ठरलें; आणि गनिमी पद्धतींत कसलेल्या मल्हाररावाची सर्वांना आठवण झाली. या प्रकरणीं ले. ५४ मधील माहिती महत्त्वाची आहे. त्यावरून मल्हारबा व गंगोबा यांनीं 'मोंगल बुडवावा' आणि मोंगल बुडाल्यास या कामगिरीबद्दल त्यांना 'दाहा लक्षाची जाहगीर द्यावी' असें ठरलें. याशिवाय 'मुख्यत्वेंकरून जानोजी भोसले यानीं मोंगलाशीं सलूख केला म्हणून आम्हांस मनसबा प्राप्त जाला. पुढें भोसल्याची रदबदली करूं नये' हें वाक्य लक्षांत ठेवण्याजोगें आहे. त्यावरून भोंसले व मोंगल यांचें संगनमत झाल्यामुळें मुख्य अडचण उपस्थित झाली, तेव्हां भोसल्याच्या वतीनें रदबदली करण्याची इच्छा मल्हाररावानें धरूं नये याविषयीं विशेष कटाक्ष दिसतो.

मराठी [1] राज्यावर या वेळीं ओढवलेल्या संकटांशीं झगडण्याची जबाबदारी सखाराम बापूच्या शिरावर येऊन पडली; आणि ती त्यानें चांगल्या प्रकारें बजावली. दोघे हि श्रीमंत त्याच्या सल्यानें वागण्यास तयार होते मल्हाररावास बोलावणें करण्यासाठीं माधवरावांना

[1] Seir mutaqherin. Vol. 3 page 398 पहा.

पाठविण्याचा त्याचा विचार होता आणि याबद्दल इषारतीदाखल गंगोबाकडे त्यानें एक पत्र लिहिलें होतें. त्याचें उत्तर मल्हारजीनें सखाराम बापूच्या नांवें पाठविलें असून तें संदिग्ध शब्दांत लिहिलेलें आहे; व 'गंगाधरपंत पाठविले आहेत याची तुमची भेट होईल. हे सर्व वृत्त विदित करतील' असा गंगोबावर हवाला दिला आहे. पण शेवटीं 'सर्व प्रकारें भरवसा तुमचा आहे' व 'मनसुबियाच्या कार्यास त्वरेस मोल आहे' अशीं दोन वाक्यें आहेत! (ले. १४३). हा मनसुबा कोणता हें निश्चित करणें कठीण आहे. पण यानंतर अतिशय 'त्वरेनें' म्हणजे चौदा मजलींत मराठी सैन्यानें मिरजेहून औरंगाबाद गांठली आणि मोगलाच्या मुलखांत धुमाकूळ माजविला. याशिवाय मोगलाचा भाऊ बसालतजंग यास फोडून मराठ्यांकडे आणण्याचें काम गंगोबाकडे सोंपविण्यांत आलें होतें व तें हि त्यानें चांगल्याप्रकारें बजावलें. शके १६८३ च्या अधीक आषाढांत गंगोबा बसालतजंगास घेऊन मराठ्यांच्या लष्करांत सामील झाला (ले. ६८–७०).

अशा गनीमीनें हैद्राबादेपर्यंत मोगलाच्या मुलुखांतून खंडणी घेत घेत मराठे येत असतां त्यांना मोगल व भोसले यांनीं पुणें जाळल्याची हकीकत समजली. तेव्हां ते अतिशय संतापले आणि गनीमी काव्याची पद्धति सोडून, समरांगणांत मोगलांशीं दोन हात करून त्यांचा सूड घेण्यासाठीं मराठे उत्सुक बनले. या उत्सुकतेस मूर्त स्वरूप देण्याचें श्रेय माधवरावांनीं राक्षसभुवनच्या लढाईंत घेतलें. या वेळीं 'चिरंजीव रायांनीं मेहनतींत व शिपाइगिरींत कमी केलें नाहीं. आम्हांपेक्षां अधीक जाहाले ...... त्यांचा कर्तेपणाचा भरवसा आम्हास आला' अशी कबुली दादासाहेबांनीं दिली आहे. सारांश, या वेळेपासून माधवराव अल्पवयी पोर नसून कर्ता पुरुष आहे असें ठरून गेलें.

यानंतर मोगलांशीं तहाची वाटाघाट करण्याची वेळ आली तेव्हां देखील मराठ्यांच्या तर्फे गंगोबा हैद्राबादेस वकीली करण्यास गेला होता. त्याच्या खटपटीनें शेवटीं तह घडून आला व निजामाकडून एकंदर ब्याऐंशी लक्षांचा मुलूख मराठ्यांस मिळाला.

या वर्षीं मोगलानें पुणें जाळून महाराष्ट्रांत जो धिंगाणा घातला त्याचें वर्णन दुगारी वगैरे च पत्रें या खंडांत आलीं आहेत. त्या संबंधीं एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्याजोगी आहे, ती ही कीं, शके १६८५ मध्यें ज्येष्ठ महिना अधीक नसून आषाढ अधीक होता. दीक्षित, पिल्ले, मोडक वगैरे सर्व जंत्रीकारांनीं ज्येष्ठ अधीक दिल्यामुळें इतिहाससंशोधक चांगले चकले आहेत. ऐतिहासिकलेखसंग्रहांत या वेळचीं पत्रें छापतांना रा. वासुदेवशास्त्री खरे यांनीं अधीक महिना पत्रांत आला असेल तेथें अधीक ज्येष्ठ अशी कल्पना करून मोडकांच्या जंत्रीवरून इंग्रजी मित्या ठरविल्या आहेत व नुसता ज्येष्ठ असा उल्लेख असेल तेथें (अधीक) हा शब्द गाळून संगति लावण्याचा प्रयत्न केला आहे. पण नं. १६० च्या

पत्रांत यापैकीं कोणता च उपाय न चालल्यामुळें " यांत तिथीसंबंधानें काय घोटाळा झाला आहे समजत नाहीं." अशी शास्त्रीबोवांना टीप देणें भाग पडलें. ( ऐ. ले. सं. पृ. ४९३ टी. १ ) या खंडांतील ले. ६२ पासून ७० पर्यंतच्या पत्रांवर मिल्या घालतांना माझा हि असा च घोंटाळा झा.ा. पण ले. ७० च्या पत्रांत 'अधीक आषाढ वद्य त्रयोदसी' असे शब्द आढळले तेव्हां हें कोडें उकललें. सध्यां उपयोगांत असलेल्या जंत्र्या कामचलाऊ आहेत यांत शंका नाहीं. पण अधीक महिन्याचें यांचें गणीत मध्यमगति हिशेबांत घेऊन केलेलें असतें. स्पष्टगति हे जंत्रीकार घेत नाहींत. अर्थात् अधीक महिन्याचा घोटाळा होण्यास वाव राहतो. यामुळें चूक फार तर दोन महिन्यांची होण्याचा संभव असतो हें खरें. पण शके १६३६ मध्यें अधीक आषाढ होता असें जंत्रीकार म्हणतात व पेशव्यांची शकावली ( राजवाडे ) पृ.२५ वर 'अधीक भाद्रपद साबान महिन्यांत आला होता' असें म्हटलें आहे. यावरून जंत्र्यांतील माहिती चार महिन्यांनीं चुकली आहे असें म्हणावें लागेल ! सारांश जुने कागद व जुनीं पंचांगें पाहून अधीक महिन्यांचा निर्णय होईल तेव्हां च तो पूर्णपणें विश्वसनीय मानतां येईल; तोंपर्यंत चालू जंत्र्यांतील माहिती निरुपायास्तव मान्य करावयाची इतकें च.

मोगलांशीं तह झाल्यानंतर गंगोबा पुण्याहून मुलीच्या ( मथुराबाईच्या ) लग्नासाठीं नाशिकास गेला. हें लग्न शके १६८५ च्या फाल्गुन शुद्ध १४ स झालें. या वेळीं दरबारांत उपस्थित झालेलीं चौथाईच्या हिशेबाचीं प्रकरणें मिटविण्याचें काम मल्हाररावानें गंगोबाकडे सोंपविलें होतें. यामुळें दादासाहेबांचे व गंगोबाचे अधून मधून खटके उडत ( ले. ८९ ). त्याचप्रमाणें माधवराव दादासाहेबांकडे सर्व व्यवस्था सोंपवून कर्नाटकच्या स्वारीस निघाले होते. त्यांनीं जानोजी भोसल्यास आपणाबरोबर येण्याविषयीं निकडीचे निरोप पाठविले. परंतु इंग्रजांनीं बंगाल्यांत कासमअल्लीचा पराभव केल्यामुळें, "पूर्वीं ठरलेल्या तहाअन्वयें, या वेळीं मला कासमअल्लीच्या मदतीस गेलें पाहिजे; अर्थात् माधवरावांच्या स्वारीबरोबर आपणास हजर राहता येत नाहीं, याबद्दल पेशवे ' विशाद मानतील तरी प्रसंगीं तुम्ही ( = गंगोबा ) आहा. करेल त्या प्रकारें निराकरण करून मर्जी बहाल राहे तें गोष्ट करावी ' ( ले. ८८)." असें जानोजीनें लिहिलें होतें. यावरून गंगोबाचें वजन या वेळीं पुणें दरबारांत चांगलें च असावें असें ठरतें.

माधवराव कर्नाटकच्या स्वारीस गेले ते तिकडे दीड वर्ष राहिले. पुण्याकडे कारभार–दरबारास दादासाहेब धनी होते. त्यांची आवरशक्ति बेताची असल्यामुळें कर्ज वाढत चाललें, चुगलखोरांचें प्रस्थ माजलें आणि 'मी स्नानसंध्या करून राहतों मला ही दगदग नको' अशा अर्थाचे उद्गार दादासाहेबांच्या लिहिण्यांत येऊं लागले. तरी हि माधवरावांनीं "मजला आपण वडील असतां दौलतेची व कर्जाची व नांवलवकिकाची किमपि चिंता वाटत नाहीं वडील जें करणें तें करतील च ऐसें जाणून निश्चिंत आहें"

असें आश्वासन दिलें; आणि त्याबरोबर च "दौलतेचा बंदोबस्त केला म्हणजे यांत च सर्व स्नानसंध्येचें फल आहे" ( म. इ. सा. खं. १४ पत्रांक ५६) ही मार्मिकपणाची राजनीति चुलत्यास सांगण्यास कमी केलें नाहीं. सारांश, दादासाहेबांस पूर्णपणें मोकळीक दिली तरी त्यांच्या हातून दौलतीचा बंदोबस्त होणें शक्य नाहीं अशी माधवरावांची खात्री होत चालली होती. तथापि वडिलांचा आपल्या हातून अपमान होतां कामा नये असें अद्याप त्यांना वाटत होतें; आणि या च दृष्टीनें या कर्नाटकाच्या स्वारीत माधवराव दादासाहेबांशीं वागत होते. परंतु गंगोबाच्या चरित्राशीं या स्वारीचा संबंध पोंचत नसल्यामुळें त्यासंबंधींची हकीकत येथें देण्याचें कारण नाहीं.

मुलीचें लग्न होतां च गंगोबा उत्तर हिंदुस्थानांत गेला; तो तीन वर्षें तिकडे च होता. त्यानें या अवधींत अनेक उलाढाली केल्या. त्यांचें अनुसंधान ध्यानांत येण्यासाठीं दिल्लीकडील पूर्वीची थोडी हकीकत सांगणें आवश्यक आहे.

शके १६८१ मध्यें अबदाली दिल्लीकडे चालून आला तेव्हां गाजुद्दीन वजीरानें अलमगीर बादशहास ठार मारून कामबक्षाचा पुत्र शहाजहान यास पादशाहा केलें. नंतर अबदालीनें दिल्ली घेतली. तेव्हां या शहाजहानास कैद करून त्यानें अलमगीराचा मुलगा अल्लीगोहर ( जो दिल्लींतील भानगडीमुळें पळून पाटण्यास गेला होता ) यास बोलावणें पाठविलें. परंतु तो आला नाहीं. पुढें भाऊसाहेबांनीं दिल्ली घेतली. तेव्हां त्यांनीं हि अल्लीगोहरास बोलावलें, पण स्वतः न येतां त्यानें आपल्या मुलास म्हणजे जवानबख्तास भाऊसाहेबांकडे पाठविलें. त्यांनीं या शाहाजाद्यास वलीअहद केलें म्हणजे यौवराज्याभिषेक केला व अल्लीगोहर यास शहाअल्लम असें नांव देऊन त्याच्या नांवचे शिक्के सुरु केले. पानिपतच्या युद्धानंतर अबदाली दिल्लीस आला तेव्हां त्यानें शहाअल्लम बादशहास दुसऱ्यानें बोलावणें पाठविलें; पण दिल्लीस मराठ्यांचा अमल बसेल किंवा अबदालीचा च कायम राहील याबद्दल जबरदस्त संशय असल्यामुळें शहाअल्लमानें दिल्लीस येण्याचें साफ नाकारलें. कारण, पाणिपतास मराठ्यांचा पराभव झाला तरी अबदालीच्या राज्यांत बंडाळी माजली असल्यामुळें हिंदुस्थानांत राहण्यास त्याला सवड नव्हती; आणि चोहोंकडे उत्तर हिंदुस्थानांतील मराठ्यांचा उठत चाललेला अंमल परत बसविण्यासाठीं मल्हारराव होळकर व गंगोबा जोराची खटपट करीत होते; आणि त्यांना यश येण्याचा बरा च संभव होता.

दिल्लीच्या पादशाहीसंबंधानें भाऊसाहेबांनीं केलेली व्यवस्था च मान्य करून अबदाली परत स्वदेशीं गेला. मात्र त्यानें राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें नजीबाच्या हातीं दिलीं होतीं.

अबदालीची पाठ फिरतां च सुरजमल जाटानें मोठ्या सैन्यानिशीं दिल्लीवर चाल केली. या वेळीं गंगाधरपंत चंद्रचूड दीड हजार फौजेनिशीं जाटाबरोबर होता

( म. इ. सा. खं. १ ले. २८८ ) जाटानें गाजुद्दीखानास वजीरी देववून व त्याचें नांव पुढें करून नजीबाच्यीं ठाणीं ताब्यांत घेण्याचा सपाटा चालविला. तेव्हां नजीबास युध्दाची तयारी करणें भाग पडलें. त्यानें जेनगराचा राजा माधोसिंग यास अनुकूल करून घेतलें. पण उलटपक्षाची तयारी फार मोठी होती. गंगाधरपंत, जाट, सुजाउद्दवला व गाजुद्दीखान यांनीं मोठें सैन्य जमवून कोळेवर तळ दिला. नजीबखानाचा म्हणजे रोहिल्याचा तळ पाणिपतावर होता. जाटांना यशाची खात्री होती. पण एका लहानशा चुकीमुळें सर्व डाव उलटला तो असाः--

जाट व रोहिले यांचीं सैन्यें युद्धासाठीं सज्ज होऊन राहिलीं; इतक्यांत सुरजमल जाटास शिकारीस निघण्याची लहर लागून फक्त दोनतीनशें निवडक लोक बरोबर घेऊन तो जंगलांत शिकारीस गेला. ही बातमी गुप्तहेरामार्फत नजीबास कळतां च त्यानें सैदू नांवाच्या विश्वासू सरदारास पांचशें लोकांनिशीं त्या जंगलांत पाठविलें. सैदूनें सुरजमलावर पाळत ठेऊन अचानक हल्ला केला; आणि जाटांचा पराभव च नव्हे तर कत्तल केली. अशा प्रकारें सुरजमल्लाचा अंत होतांच त्याचें शिर भाल्यावर रोंऊन तें सैदूनें नजीबास नजर केलें. नजीबानें तो भाला निशाणा प्रमाणें सैन्याच्या अग्रभागीं रोवून सुरजमल्लाच्या मृत्यूची बातमी जाटाच्या सैन्यास कळविली. त्याबरोबर जाटाच्या सैन्याचा धीर खचून तें पळत सुटलें. अर्थात् नजीबाच्या सैन्यास जय मिळाला.

यानंतर नजीब दिल्लीस परत गेला. पण सुरजमल्लाचा मुलगा जवाहीरमल्ल यानें मराठ्यांचें वीस हजार सैन्य मदतीस घेऊन दिल्लीस वेढा दिला. या वेळीं नजीब चागला पेंचांत सांपडला होता. पण मल्हाररावानें त्याच्याशीं तह केल्यामुळें तो वांचला. हा तह करणें कोणत्या कारणामुळें मल्हाररावास इष्ट वाटलें तें नक्की समजत नाहीं. पण नानासाहेबांच्या मृत्यूनंतर मराठ्यांचें राज्य बुडविण्यासाठीं निजामानें चालविलेल्या तया-रीच्या बातमीमुळें मल्हाररावानें हा तडजोड करण्याची घाई केली असावी असें वाटतें. तथापि या प्रसंगीं मराठ्यांच्या सैन्यांत फार मतभेद झाला असावा असा ले. १५५ वरून तर्क करतां येतो.* तथापि कोणत्या हि कारणामुळें कां असेना पण मराठ्यांनीं नजीबाशीं या वेळीं तडजोड केल्यामुळें जवाहिरमल्ल जाटास तोंडघशीं पडल्यासारखें झालें व त्याला हि नजीबाशीं तह करण्यावांचून गत्यंतर राहिलें नाहीं.

यानंतर मल्हारराव व गंगोबा दक्षिणेंत मोंगलाशीं चाललेल्या युद्धांत हजर होते. तेथें त्यांनीं बजाविलेली कामगिरी मागें सांगितली च आहे. मोंगलांचा लढा आटो-पतां च गंगोबा व मल्हारराव शके १६८६ च्या प्रारंभीं पुनः उत्तर हिंदुस्थानांत गेले. त्यांनीं राजपुतान्यांतील राजेरजवाड्यांकडील खंडणी वसूल केली आणि नजीबाशीं

* या लेखांकाची मिती १६८६ पौष शु. १ अशी दिली आहे ती चूक असून १६८३ पौष शु. १ अशी पाहिजे.

बिघाड होऊं न देतां अंतर्वेदीच्या बंदोबस्तासाठीं अनूपशहरीं जाऊन सुजाउद्दवल्याशीं सख्य केलें; आणि तेथून प्रयागाकडे कूच केलें. बंगालचा सुभेदार कासमअल्ली यास इंग्रजानीं हांकून लावल्यामुळें तो हि या वेळीं काशीकडे आला होता आणि त्याला मराठ्यांच्या साहाय्याची अपेक्षा होती. बादशहा देखील सुजाउद्दवल्याकडे च होता. तेव्हां सर्वांनीं मिळून इंग्रजावर चाल केली. परंतु इंग्रजांनीं त्यांचा पराभव केला आणि होळकराच्या फौजेस यमुना उतरून पलीकडे येतां येतां पुरेवाट झाली.

यानंतर मल्हारराव व गंगोबा यांनीं सर्व हकीकतीचीं पत्रें पुण्यास पाठवून मदत मागितली. त्याप्रमाणें फौज तयार झाली. त्याचें आधिपत्य दादासाहेबांनीं पत्करलें. या फौजेंत सदाशिव गंगाधर ऊर्फ अन्याबा हजर होता. ( ले. १९७ ) या सुमारास भोसले बिघाड करतील असें लक्षण दिसूं लागलें. तेव्हां माधवराव व दादासाहेब यांनीं मोगलास अनुकूल करून घेऊन भोसल्यास शह दिला. यामुळें त्याचा निरु-पाय होऊन त्यानें पेशव्यांशीं सल्ला केला.

हें प्रकरण आटोपतां च दादासाहेब हिंदुस्थानच्या स्वारीस निघाले. या वेळीं दक्षिणेकडील बंदोबस्त केल्यावांचून दादासाहेबांनीं उत्तरेस जाऊं नये असें माधवरावांचें म्हणणें होतें ( ले. ९७); परंतु तें न ऐकतां दादासाहेब निघाले. इकडे होळकराच्या सैन्यानें दतिया, वोडसे वगैरे बुंदेलखंडांतील ठाणीं हस्तगत करून झांशीस वेढा दिला; व तो किल्ला सर करून विश्वासराव लक्षुमण याच्या स्वाधीन केला. नंतर मराठ्यांचें सैन्य गोहदच्या वेढ्यासाठीं चाललें. या गोहदच्या जाटानें गेल्या चार पांच वर्षांत मराठ्यांचा अमल उठवून टाकला होता; यामुळें त्याचा बंदोबस्त झाल्यावांचून इतर संस्थानिकांवर दहशत बसण्याजोगी नव्हती. जाटांनीं देखील आपल्या मदतीस शीखांना आणलें होतें. यामुळें त्यांची तयारी चांगली होती. दोन ही सैन्यांची गांठ श. १६८८ च्या अर्धांक चैत्रांत जाटवाड्यांत पडली. प्रथम मराठ्यांचा जय झाला. परंतु शत्रुसैन्यानें सांवरून पुनः निकराचा हल्ला केला. तेव्हां मराठ्यांच्या सैन्यानें शिकस्त खाल्ली. होळ-करांच्या आघाडींत वाबळे, घुळे वगैरे सरदार होते. त्यांना 'दुसरें पाणिपत' झालें. ( ले. १०२ ). मल्हारराव व गंगोबा मागें वीस कोसांवर होते. त्यांनीं पुनः शत्रूवर चाल करण्याची तयारी केली. दादासाहेब देखील सैन्यासह होळकरांच्या लष्करांत सामील झाले. पण मल्हाररावांची प्रकृति या वेळीं एकदम बिघडून झांशीनजीक अल-मपूर येथें वैशाख शुद्ध ११ स पावणेदोन प्रहर दिवसास त्यांस देवाज्ञा झाली.

मल्हाररावांच्या मृत्यूमुळें 'दक्षिण हिंदुस्थानचें छत्र गेलें' असें म्हणून बहुतेकांनीं हातपाय गाळले. दादासाहेबांना गोहदकराचें पारपत्य करतां आलें नाहीं; आणि शेवटीं [illegible] परत देशीं येणें त्यांना भाग पडलें. पण याच अवधींत माधवरावांनीं हैद्र-अलीवर तिसरी स्वारी करून त्याचा पूर्ण मोड केला व ते विजयी होऊन पुण्यास आले

होते. यामुळें दादासाहेबांना आपल्या नाकर्तेपणाबद्दल विशेष च वैषम्य वाटलें. पण त्याचा दोष त्यांनीं स्वतःकडे न घेतां आपणास माधवरावांनीं मनापासून पाठपुरावा केला नाहीं यामुळें उत्तर हिंदुस्थानांतील मसलत सिद्धीस गेली नाहीं, असा पुकारा केला. या वितुष्टाचें पर्यवसान घोडपच्या लढाईत झालें.

पाणिपताच्या लढाईनंतर भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांचीं नांवें धारण करून बंड माजविणारे तोतये बरे च होऊन गेले. पैकीं जनकोजीच्या तोतयाचा उल्लेख करणारीं दोन पत्रें या खंडांत आलीं आहेत. या तोतयांवर विचारी मुत्सद्यांपैकीं कोणी हि फारसा विश्वास ठेवला नाहीं. बायाबापड्या कचित फसत; आणि कांहीं दिवस बंडखोरांची पोळी पिके. यामुळें तोतयांचीं पत्रें आणणाऱ्या जासुदांना दरबारांत शिवीगाळी सोसावी लागे; आणि 'कचेरींत थट्टा होई कीं, स्वर्गद्वार मोकळें झालें. ज्या बायकांचे पुरुष वारले असतील, त्यांनीं डोई वाढवावी !' ( म. इ. सा. खं. १ ले. ३०० ).

शके १६८७ च्या पौषापासून १६८८ च्या फाल्गुन (ले. ११०-१२६) पर्यंतचीं सतरा पत्रें चंद्रचूड दफ्तरांतील नसून त्या रा. पां. न. पटवर्धन यांच्या संग्रहीं असलेल्या नकला आहेत. हीं पत्रें माधवराव पेशव्यांनीं लिहिलेलीं असल्यामुळें व त्यांत महत्वाची माहिती असल्यामुळें त्यांचा संग्रह या खंडांत केला आहे.

याशिवाय पानिपतच्या पराभवानंतर उत्तरेकडील अंमल उठला तरी पुनः तो लौकर च प्रस्थापित होइल या आशेवर जाटाच्या मार्येत शिरून 'जयद्रथाचें दुःख सांगावयास अभिमिन्याने जीव ठेवला होता तद्न्यायें' ग्वालेरींत गुप्तपणें बसून मराठ्यांच्या सैन्याची मार्गप्रतीक्षा करणारा बचाजी रंगनाथ ( पृ. ७८ ), मल्हारराव मरण पावताच 'आतां शोक करावयाचा प्रकार नाहीं सरदारीचा विचार दौलत चालली पाहिजे यास्तव विवेक करून कामाकाजात चित घालुन ...... वडिलांची कीर्ती आहे त्याजपेक्षां तुम्ही अधीक संपादन कराल यांत च तुमचा लौकिक आहे,' वगैरे सुंदर उपदेश आपल्या मुलास करणारी ( ले. १०८ ) देवी अहिल्याबाई आणि गंगोबा हिंदुस्थानांतून देशीं येणार असें कळतां च घरची व्यवस्था चोख राहिली पाहिजे, "तमचास गलाठा द्रष्टीस पडल्यानंतर तीर्थरूपाची मर्जी राहणार नाहीं", "तीर्थरूप आलियानंतर तुमची आमची फजिती न होय ते करणें" असें घरच्या कारभाऱ्यास बजावणारा यशवंत गंगाधर ( ले. १७६ ) वगैरे अनेक ऐतिहासिक व्यक्ति या खंडांतील पत्रांच्या साहाय्यानें वाचकांच्या अधिक परिचयाच्या होतील.

या खंडांतील पत्रें वाचतांना चंद्रचूड घराण्यांतील सात आठ व्यक्तींचें परस्परांशीं असलेलें नातें लक्षांत ठेवलें पाहिजे. बाजी यशवंत हा गंगाधर यशवंताचा म्हणजे गंगोबा तात्याचा वडील भाऊ. या बाजी यशवंताचा मुलगा विनायक बाजीराव. गंगाधरास दोन बायका; वडील बायकोचें नांव अन्नपूर्णा ऊर्फ बाई; धाकटीचें पार्वती

ऊर्फ काकू. बाईस दोन मुलगे; सदाशिव ऊर्फ अन्याबा आणि कृष्णराव ऊर्फ बापू. काकूस देखील दोन मुलगे होते. वडील मुलाचें नांव यशवंत गंगाधर उर्फ दादाजी आणि धाकट्याचें माधवराव ऊर्फ रावसाहेब. बाजी विठ्ठल ऊर्फ बाजीपंत मामा हा गंगोबाच्या धाकट्या बायकोचा भाऊ. अन्याबा व बापू यांच्या मनांत बाजीपंताबद्दल म्हणजे सावत्र मामाबद्दल बराच राग होता. गंगोबाचे व अन्याबाचें देखील फारसें जमत नव्हतें; यास कारण गंगोबाची धाकट्या कुटुंबावर विशेष मर्जी होती हें असावें. मोगलानें पुणें जाळलें त्या वेळीं चंद्रचूड घराण्यांतील बायकामंडळीवर कठीण प्रसंग आला होता. गंगोबा, अन्याबा वगैरे पुरुष मंडळी हैद्राबादेकडे गुंतलेली, दादाजी वगैरे मुलें लहान आणि त्यांत च गंगोबाची धाकटी स्त्री आजारी पडून मरण पावली. यामुळें अन्नपूर्णाबाईवर चोंहोंकडून आकाश कोसळल्यासारखें झालें होतें. तथापि तिनें मुळींच हिंमत खचूं दिली नाहीं; इतकें च नव्हे तर 'देशांत थोर अनर्थ जाला. कितेक स्त्रियांच्या इजती घेतल्या,' 'इकडे अतिशय गलबल जाली आहे' 'चिठीचें कार्य ( हुंडी पटून पैसे मिळण्याचें ) होत नाहीं' वगैरे हकीकत लिहून देखील शेवटीं आपल्या संरक्षणासाठीं लोकर निघून येण्याबद्दल या बाईनें मुलांना न लिहितां 'बहुत सावधपणें बुधीनें वर्तणूक करोन शरीर संरक्षण करणें' असा शांतपणें उपदेश केला आहे (ले.७७). अन्नपूर्णाबाईची या खंडांतील पत्रें वाचलीं म्हणजे दीडशें वर्षांपूर्वीं महाराष्ट्रांतील स्त्रिया धामधुमीच्या प्रसंगीं सुद्धां किती धैर्यानें वागत असत याची साक्ष पटते.

राक्षसभुवनच्या लढाईनंतर गंगोबा मुलीचें लग्न आटोपून उत्तरेस गेला तेव्हां त्यानें सर्वांत धाकट्या मुलास म्हणजे माधवरावास बरोबर नेलें व यशवंतरावास म्हणजे दादाजीस अहिल्याबाईकडे दरबारी काम संभाळण्यास ठेविलें. उत्तर हिंदुस्थानांतील या स्वारीचीं बहुतेक पत्रें या धाकट्या माधवरावानें लिहिलेलीं आहेत. यशवंत गंगाधर ऊर्फ दादाजी हा चंद्रचूड मंडळींपैकीं चांगला व्युत्पन्न व बुद्धिमान् पुरुष होता. सावत्रपणाच्या नात्यामुळें उत्पन्न झालेल्या घरगुती तंट्याचा निकाल लावण्याचें काम दादाजींकडे असे "तुम्ही शास्त्रज्ञ आहां, तुमचे सांगितले कोणी मोडणार नाहीं" असें कृष्णराव गंगाधर दादाजीस लिहितो ( ले. १५५ ). याचें कारण अन्याबास आवरण्याचें काम दादाजींखेरीज इतर कोणास हि करतां येण्याजोगें नव्हतें. हा दादाजी विद्वान तर होताच; पण त्याबरोबर च त्यास परिस्थितीचें यथार्थ ज्ञान असून कोणती गोष्ट शेवटास जाईल आणि कोणती फसेल हें ओळखण्यास लागणारें व्यवहार-चातुर्य हि त्याच्या ठिकाणीं होतें. दादासाहेबांनीं उत्तर हिंदुस्थानांतून परत आल्यावर माधवरावांशीं तंटा सुरू केला तेव्हां गंगोबानें माधवरावाचा पक्ष सोडून एकदम दादासाहेबांकडे प्रयाण केलें. तेव्हां हें तुमचें करणें चुकत आहे, शेवटीं माधवरावांचा च पक्ष विजयी होणार असें वारंवार स्पष्टपणें दादाजींनीं कळविलें होतें. सारांश, परिस्थिति बदल-

त्यामुळें गंगाबाच्या हातून चुका होऊं लागल्या. पण दादाजी विचारी असल्यामुळें त्यानें माधवराव व अहिल्याबाई यांचा पक्ष सोडला नाहीं. यामुळें घोडपच्या युद्धानंतर थोडीं वर्षें चंद्रचूड घराण्यावर अडचणीची परिस्थिति आली होती तरी ती बाजूस सारून दादाजीला आपल्या घराण्यास ऊर्जित दशा प्राप्त करून देतां आली.

या खंडांत इंग्रजांचे उल्लेख चार पांच ठिकाणीं आले आहेत. त्यांवरून त्यांचा जम बंगाल्यांत व अंतर्वेदींत या वेळी बसत चालला होता हें स्पष्ट दिसतें. इतकें च नव्हे तर मराठ्यांनी जाटांशीं सलूख करावा म्हणजे त्यांना कांहीं गांव वगैरे देवविण्यांत येतील वगैरे सल्ला फिरंग्यांचे वकील उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांना देऊं लागले होते. ( ले. १६४ ). एकंदरींत हिंदुस्थानचें साम्राज्य कमावण्याची कल्पना या सुमारास इंग्रजी मुत्सद्यांच्या मनांत घोळूं लागली होती. इ. स. १७६७ मध्यें अलेक्झांडर डाऊ यानें जो हिंदुस्थानचा इतिहास लिहिला आहे त्यांत असें स्पष्ट विधान केलेलें आहे कीं, "It is apparant that the immense regions of Hindustan might be all reduced by a handful of regular troops. Ten thousand European infantry, together with the sepoys in the Company's service, are not only sufficient to conquer all India, but with proper policy, to maintain it for ages, as an appendage of the British Crown."

इंग्रजी कंपनीच्या चालकांना हा उपदेश पटून त्यांनीं दिल्ली व हैद्राबाद येथील राजकारणांत लक्ष घालण्यास सुरुवात केली; आणि दोन हि ठिकाणीं त्यांनीं एकदम छाप पाडली. ही गोष्ट माधवरावांच्या लक्षांत पूर्णपणें आली. 'फिरंगी जबरदस्त' असल्यामुळें 'नबाब नाइलाज होऊन सलूखास कबूल जाहले;' पण हा सलोखा टिकाऊ नव्हे ही गोष्ट माधवरावांनीं च एका ठिकाणीं नमूद केली आहे (ले. ११८). याशिवाय, बंगाल प्रांत तर इंग्रजांच्या हातीं सर्वस्वीं आला होता. तेथून एक घर पुढें सरकून क्लाइव्हनें मोगली साम्राज्याचा नामधारी वजीर म्हणजे औधचा नबाब कसा ताब्यांत घेतला व मल्हारराव होळकर आणि शीख जाट यांच्या झगड्यांत शिरून आपलें प्यादें कसें पुढें ढकललें याची हकीकत सर जॉर्ज फॉरेस्ट यांच्या नवीन क्लाइव्हचरित्राच्या दुसऱ्या खंडांत ( सहाव्या भागांत ) आलेली आहे. ही हकीकत मराठी पत्रांतील मजकुराशीं ताडून पाहणें अगत्याचें आहे. पण यासंबंधीचीं आणखी पत्रें चंद्रचूड दफ्तरांत सापडण्याचा संभव असल्यामुळें हें काम पुढील खंडाच्या विवेचनांत केलेलें बरें.

हनगंडी,
आषाढ शु० ५ इ.

दत्तात्रेय विष्णु आपटे.

# चंद्रचूड–दफ्तर

## चूडा १ ली

ले. १* श्री.

शेवेसी खंडेराव कृष्ण विज्ञापना ऐसी जे कैलासवांसी गंगोबा तात्या आमचे आजे यास स्त्रिया दोघी पैकी जेष्ट स्त्रीसं पुत्र दोन वडील सदासिव गंगाधर व धाकटे कृष्णराव गंगाधर व कनिष्ट स्त्रीस पुत्र दोन येशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर हे दोघे वये करून हि धाकटे च ऐसे असता गंगोबा तात्यां याणी आपले जातीनिसी सेवाचाकरी सरकारची वहुता प्रकारे करूनं श्रीमंताची मर्जी संपादून साठ पासष्ट हजाराचा सरंजाम व होळकराकडील फडणीसी संपादिली त्यात सरजाम इनामतीदाखलं खाऊन स्वामीच्या राज्यांत पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनभवति असावे अशा सरकारच्यां सनदां आहेत ऐशास तात्या विद्यमान असता निमेनीम वाटणी ठरवून त्या अन्वये वहिवाट चालत होती नंतर श्रीमंत कैलासवासी माधवराव साहेब याणी तात्यापासूनं क्रिया घेतली असतां श्रीमंत कैलासवासी दादासाहेब याजकडे सखारामं बापूचे मसलतीने मिलाले हा दोष धोडपचे स्वारी उपरांत तात्यावर आणूनं रावसाहेबं याणी सर्वस्व अपहार करूनं वंदी टेविले उपरांत कटोऱ्याचे स्वारीहून सिध्धटेकचे मुकामी स्वारी आली त्या काळी तात्याची व मुलांमाणसाची मुक्तता होऊन सरजाम सोडावयाची आज्ञा जाली आणि अपराधाबाबद तीस लाख रुपये खंड ठराविला त्यापैकी वस्तवानी सुध्धा चवीस लाख रुपये पावती जाली बाकी साहा लाख राहिले त्याचा उगावा करून देऊन सरजाम मोकला व्हावा तो थोरले माधवराव साहेब यास देवाज्ञा जाली नंतर पुरंधरचे वेलेस सखारामपंत कुलं यखत्यार पुढे आले ते समई तात्यावर पेशजी पेच आला तेव्हा त्याजला सरकारातून पुरसीस जाला की हे कृत्य तुमचे बुधीने जाले नाही कोणाचे उपदेशाने जाले ते सागावे असे पुसत असता तात्यानी जे केले ते आपणं च केले असे आपणांवर घेऊन बापूचं दस्ताऐवजी चिठ्यां होत्या त्या दूर टेऊन बापूवर उपकार केला होता ते कागदपत्रं येसवंतराव गंगाधर याणी व त्याचे मातुल बाजी विठलं

---

* येथें दिलेले पहिले तीन लेखांक कालानुक्रमाच्या दृष्टीनें पाहूं जातां बरेच पुढे छापणें योग्य होतें. परंतु या ग्रंथांत ज्या घराण्यासंबंधीचे कागदपत्र यावयाचे आहेत त्या चंद्रचूड घराण्यांतील प्रमुख व्यक्ति कोणत्या होत्या व त्यांचे परस्पराशीं नातें कोणत्या प्रकारचें होतें हें दाखविण्यासाठीं–म्हणजे विषयपरिचय करून देण्यास सोईचीं असल्यामुळें–हीं पत्रें येथें प्रारंभीं दिलीं आहेत.

बापूचे परम इष्ट होते त्यांणी बापूस दाखऊनं साहा लक्षांपैकी काही ऐवज पावोन बाकी ऐवज राहिलां तो बापूंनी माफ करूनं सरंजाम सोडून दिल्हा त्या काळी पूर्वील सनदां होत्या त्या गलाठल्या ऐसा गैरवाका समजं बावयाचे कारणं पूर्वील सनदां काही कृष्णरावं गंगाधर याजकडे होत्या परंतु कांहीं दाखलां नाहीं ऐसे समजाऊनं येसवंतराव गंगाधर यांचे च नावानें सनदां करूनं घेतल्यां पुढे मागे बंधूस विभागं न द्यावां याजकरितां येकल्यांचे च नावे सनदा करूनं घ्यावयाचां पर्याय केला त्याकाळी सदासीव गंगाधर आम्हात कर्ते पुरुष मुखत्वे जेष्ट चागले दरबारी असे असतां ते तात्या असतां च मृत्यं पावले होते जेष्ट म्हणावयासं कृष्णराव गंगाधर च राहिले हे सौम्य स्नानसंध्यासील होते आणि तात्यांची मुक्तता श्रीमंतापासून जाल्यावर येशवंतराव गंगाधर व त्याचे मातुल बाजी विठल हे उभयता येकरूप होऊन तात्यासी द्वेष केला त्यांचे च काही चालू देत ना येसे होऊन तात्या कृष्णराव आमचे तीर्थरूप याजकडे येऊन आमरणांत होते दौलत आलीं त्या काळी कनिष्ट स्त्रीवर प्रीति विशेष होती हा अनुभवं लौकीक विदित च आहे ये विसीचे पर्याय वडिलापासून हि आमच्यां वडिलाकडे होते परंतु सेवट काली हे च पुत्र त्याच्यां कामास आले असे असतां तात्यानी दौलत मेलविली तत्प्रयुक्त श्रम आले ते आम्ही भोगावे आणि त्याणी संपादन केले ते येशवंतराव गंगाधर याणी च अनभवावे ऐसा निरणयं धर्मशास्त्रीं व लौकिक योग्य असल्यासं उपायं नाही परंतु तात्या जिवंत असतां निमेनीम वाटंणी करून देऊन जेष्ट बिभागं आम्हाकडे व कंनिष्ट विभागं त्याजकडे चालत आलां ते वहिवाटीचे कागदपत्रं यादीं बुदीं तात्यांचे वेलेच्यां असतीलं परंतु पुरंधरचे साली बापूस हि आमचे तीर्थरूपं कृष्णंराव गंगाधर याणी पुसले असतां तुम्हीं घरात समजा म्हणोनं ताकीदी करीत बाजी विठलं व दादाजी मिलोन आमची पायंमली करूनं काही चं न देता नाना प्रकारे सबबं सागोन भय हि नाना ते रीतीने हस्तें परहस्तें घालूनं पाच हजाराचे गाव अडसेरीदाखल भिकणे दिल्हे ते हि न मान्यं करावे तरीं आपणासं वसीलां नाही व उतपातीं हि फार नवते निद्रव्यं कुटुंब पदरीं भक्षावयाचे मानसिक ऐसे संकट आणि राज्यात प्रभुत्व काय ते मिलोन कारभारी त्याची कृपां त्याणी चं दृढतर संपादन केली होती आणि फिर्याद सांगावयांस हि स्थल नाहीं त्यात माधवराव गंगाधर याणी हि सिंदे याच्यां दिवाणगिरीचां रोजगार केला तो हि बलवंतर पक्ष नानाफडणीस याजवरं आणि दादाजींनी कृपां संपादिली होती आणि आमचे तीर्थरूपं याचा हि कालं जालां त्या संधीत माझे हि वयं लाहानं बाल्य अवस्था असे पर्याई दिवसं न आले त्यांस स्वामीचा भाग्योदयं समय पाहूनं आम्हासं उमेद होऊन उद्योग त्याकाळी च करावयासं प्रारंभ करूनं नाना फडणीस याची भेट घेतली आणि वर्तमान समजाविले की सरंजाम सुटल्यां तागाईत दादाजीकडे आमचां विभागांचां ऐवजं यावा व हालीं पूर्ववत प्रमाणे आमचां निमे विभागं देवावा पूर्वी विभागं जाले चं आहेत आम्हांपैकी सदासिव गंगाधर वारले त्याचे आम्हां चं आणि माधवराव गंगाधर दुसऱ्या पर्यायापैकी वारले त्यासं दादाजी गंगाधर

येकटे च येकूण निमेनीम वाटणी बरोबर त्यास हाली दादाजी हि वारले त्यास पुत्र येक चहु वर्षाचा आहे व आम्ही जेष्ट विभागांपैकी येकूण दोघे चं आहो त्यापैकी निमेनीम वाटणी आमची असे दादाजी असतां च नानास समजाविले होते त्यास नानानी कचे वर्तमान समजुनं घेऊन दादाजीसं बहुत निशेध केला कीं तुम्ही मोठे शास्त्रज्ञ अत्यंत प्रउढ शाहाणे असे म्हणवीतं असतां हे असे पर्याय आणि तुमचे पुतणे कैसे आहेत अैसे पुसत असतां तुम्ही आम्हाजवळं त्यात काही अैवज नाही असे रीतीचे वाके आम्हांस समजावीत गेला तो विशय आता चं आम्हासं समजलां ते श्रीमताकडे हाली फिर्याद जाले असतां तुमची व आमच्या कर्ण्याची शोभा काय दिसेल अतःपर तुम्ही घरातं समजोन आम्हासं समजवां नाही तर ठीक नाहीं असी ताकीद केली होती ते हि आपले जागां बहुत विसमयं करीतं की आज तागाईत नानाची कृपां आम्हीं संपादिली त्याचे फलं हे च कपालास आले असे बोलत तो हि पर्याय आम्हास समजल्यावरं आम्ही नानासं सागितलां तेव्हा नानानी सागितले कीं बरे कार्य चितां आहे मी च श्रीमंतासं समजाउनं तुमचे कामाचा बंदोबस्तं करून देववीनं म्हणोनं आमची खातरजमां करीत च गेले परंतु त्याचे स्वामीसी आम्हाविसीं बोलणे होऊन आमचा विभागं आम्हासं पावावां हां प्रालब्धयोग त्या काळीं आमचा उभां न राहिलां श्रीमंत राजश्री अमृतराव साहेब यांजकडूनं हि स्वामीस समजावावे म्हणोनं बहुत प्रेत्न केला त्यांणी हि नादीचं लाऊनं स्वामीपर्यंत आमचां योग पडूं च न दिल्हां असे च्यार वर्षे स्वांमीची कृपां संपादन करावी या उदेस्ये खराब जालो प्रस्तुत प्रारब्धयोग पुणियाचे मुकामीं स्वामीची भेट घेऊन काही संकळित वर्तमान विनंति केल्यापासून स्वामीच्या सेवेत आहो त्यास आज बेवीसा वर्षाचा आमच्यां वाड्याचां अैवज दादाजी गंगाधर याजकडे राहिला आहे त्याचां निरणयं होऊन पैका आमचा यावां आणि हाली आमचे विभागांची यथांन्याये निमेनीमं वाटणी पूर्ववत प्रमाणे करून यावी नाही तरीं बेवीस वर्षे आम्हाकडे येकंदर सरंजांम व फडणीसीं चालवावी मग पुढें निमेनीम विभाग करून त्यांचा विभाग त्यास व आमचा आम्हांस देविला पाहिजे

ले. २ श्री ३

सात वंद रास

यादि राजश्रि कृष्णराव गंगाधर व यशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर चंद्रचूड जोसी व कुलकर्णी मौजे निंबगांव ताा खेड वगैरे त्रिवर्गांचे वाटणीचा जाबता विद्यमान वाो राजश्रि सकंभट जोसी वेर्सीकर व वाो राजश्रि रंगजोसी जुंनरकर शके १७०१ विकारी नांम सवछरे पौष शुध्य १० दशमी मुकांम निंबगांव ग्राा समानीन मया व आलफ संन ११८९

कैलासवासी गंगाधर यशवंत तात्या यांस श्रीमत कैलासवासी माधवराव बलाल पंतप्रधान यांनी कारभाराचे पेचामुळें सर्वस्वें आपहरण करून आटकेंत ठेऊन पुढें कांहीं येका कामेने साहा लक्ष रुो खंड बांधून मुक्तता केली ते समई संसार बेगमीस इनांम व जागीर मिलोन खेडीं दिल्हीं रुो ४०००० चालिस हजाराचे कमाल बेरजेंची तीं खेडीं खंडास येवज द्यावयास ठिकांण नांहीं तेव्हा सरकारांत ज्याचे फाजील होतें त्यांचे हवाले तात्यानी घेऊन त्यांस खेडीं दरोबस्त लाऊन दिल्हीं होतीं त्यावर तात्यांचा काल जाला उपरांतिक राजश्रि यशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर या उभयेतानीं श्रीमंतांचे दरबारी नेहमीं राहूनं श्रम सायास व दरबार समंधी वगैरे खर्च वेच करून श्रीमंताची कृपा संपादून सदरहु खेडीं ज्या ज्या फाजिलदाराकडें गुंतली होतीं त्यांस खेड्यापौ वसूल पावला तो वजा होऊन बाकी त्याचें देणे हवाल्या बा राहिलें होतें ते सरकारांत पूर्ववत प्रमाणें लागु करून देऊन खेडीं सोडविलीं त्याबदल नवें कर्ज व तात्याचें हातचें जुनें कर्ज मिलोन देण्यांचा मुबलक भरणा जाला तो कृष्णराव-गंगाधर व यशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर या त्रिवर्गानीं येथाविभागें देणें वारुंन सदरहु खेडीं येथाविभागें वांटून घ्यावीं त्यास राजश्रि कृष्णराव गंगाधर दण्याची वांटणी द्यावया विषई मांन्य जाले नांहीत तेव्हा विचार करितां देण्यामुळें आंश त्रिवर्गास हि आजन्म प्राप्त होत नांहीं येसे पुर्तेपणें ध्यानास आलें त्यावरुंन पाहाता कैलासवासी तात्याचे हातचें दरोबस्त देणें व दरबारखर्च वगैरे खेडीं सोडावया निमित्त खर्च पडला तो कुल उभयेतां यशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर हे राज्यद्वारीं उपायें करून सदरहु देण्याचा निर्वाहा करावया जोगे येसी योग्यता त्याची पाहून दरोबस्त देणें उभयंताकडें लाऊनं चालसा हजाराचे खेड्यापौ जागिरींची खेडीं मौजें गोंदी पो आंबड व कों नेवासें बुा पाो मजकूर हे दोन्हीं गांव पंचविस हजाराचें बेरजेचे मात्र करार करुंन दिल्हे आसेत तर सदरहु कर्ज उभयेतानी वारावें त्या कर्जासीं व जागिरीच्या दोन्हीं गांवासीं कृष्णराव गंगाधर यांस समंध नांही येसें ठराऊन बाकी इनांमी पंधरा हजाराचे बेरजेचीं खेडीं राहिलीं तीं व्रत्ति दाखल याचा विभाग भाऊपणियाप्रमाणें आसावा यास्तव सदरहु पंधरा हजाराचे बेरजेची इनांमी खेडीं येणे प्रो बितपसील

७५२१ ॥।≈ ताा खेड सरकार जुंनर पाौ देह
२५९६॥≈ मौजें निंबगांव खेरीज मुकासा करून आमलं इनांम
२५९२॥ मौजें कनेरसर खेरीज मुकासा आंमल इनांम
९०१ मौजें गोगार्वी खेरीज मुकासा करून आमंल इनांम
१४३१॥। मौजें पुर येथील आमंल दरोबस्त इनांम

७५२१॥।≈ देह ४

२४५८॥० पो कडेवलीत पौ देह

१६९६॥० मौंजे गणेंगांव ता श्रीगोंदे दरोबस्त
७६२ मौजे सांगवी ता पांडे पेडगाव येथील
मोगलाई आमंल

२४५८॥० देह २

३७६८।~ पो नेवासें पो देह बमये सरदेशमुखी दरोबस्त
३२३५॥~॥ मौजें दहींगांव
५३२॥~॥ मौजें रांजणी

३७६८।~ देह २

९५० मौजें हिवरे चोंढाळें पो आंबड दरोबस्त आमंल

१३७ मौजें मांडकी पो उत्रांण प्रा खानदेश येथील सरदेशमुखीचा आंमल

१४८३५॥।÷ देह १०

यास्ति वांटणी त्रिवर्गाची बिा

कृष्णराव गंगाधर हिंसा येक

१२९८।~॥ मौजें निंबगांव निमें व कुरण खेरीज मुकासा
१४३१॥। मौजें पूर दरोबस्त व इनांम
१६९६॥ मौजे गणेंगांव दरोबस्त व कुरणसुधां
७६२ मौजें सांगवी येथील मोगलाई आमंल

५१८८॥~॥ देह ३॥

यशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर हिंसे दोन

१२९८।~॥ मौजें निंबगांव निमें खेरजि मुकासा

२५९२॥ मौजें कनेरसरखेरीज मुकासा

९०१ मौजे गोसासी मोकासाखेरीज करून वाकी गांव दरोबस्त व कुरण व इनांम सुधा
३७६८।~ पो नेवासें पौ देह २ बमये सरदेशमुखी दरोबस्त
३२३५॥~॥ मौजें दहींगांव
५३२॥~॥ मौजें रांजणी

३७६८।~

यासिवाये

१ मौजें निंबगांव येथील घरवाडा दरोबस्त हादी प्रो पागेसहित कृष्णराव गंगाधर याजंकडे आहे तो त्याचा त्यांजकडे करार असे कलम

१ इनांम जमीन मौजे पूर येथील जे आहे ते दरोबस्त व मौजें निंबगाव येथील गणेशबाग तो दरोबस्त कलम

२ येकूण कलमें दोन

९५० मौजें हिंवरे चोंढाले पो आंबड
१३७ मौजें मांडकी पो उत्राणं प्रां खानदेश येथील सरदेशमुखीचा आमंल

१६४७८॥· देह ६॥०

यासिवाये

१ मौजें निंबगाव ता खेड येथील घरवाडा दरोबस्त पागेसहित हादी प्रो येशवंराव व माधवराव गंगाधर यांजकडे आहे तो यांचा याजकडे करार असे कलम

१ मौजे गोसासी येथील इनांम व कुरंण दरोबस्त कलम

१ मार्तंडबाग इनामीं मला मौजे निंबगांव येथील चालत आल्या प्रो चालवावा कलम

३ येकूंण कलमें तिन

१४८३५॥। ÷ कलमें ५

खेरीज कलमें

१ मौजें निंबगांव ता खेड येथील येवज मुकासा खेरीज करून दरोबस्त वसूली येईल त्या पौ उपाधे यांसि नेमणूक दरोबस्त गांवचे जमेंपौ सालावाद ३०० रुो तीन सें देत जावें येणे प्रा

१५० रामंभट सुदामें
१५० धोंडभट सुदामें

३००

कलम

१ मौजे निंबगांव ता खेड येथील हकमींचा दरोबस्त कारभार येशवंतराव गंगाधर व माधराव गंगाधर यानीं करीत जावा यांजकडून कारकून कारभारास जो राहील त्याचे वेतन वसूलाचा प्यादा त्याचा मुशारा येशवंतराव व माधवराव यानीं द्यावा मौजे मजकूरचा आकार जो होईल तो येन जमां व शिवाये जमां खंड फुरोई वगैरें करणें ते येशवंतराव व माधराव यानीं करून वंचना न करितां मौजे मजकूरचा हिंसा निमें कृष्ण-

राव गंगाधर याजला देत जावा येशवंतराव व मांधवराव गंगाधर गांवी नसल्यास उभयेतांकडील कारभारी जो राहील त्यानें कारभाराचें वर्तमान कृष्णराव गंगाधर यांचे कानांवर घालीत जावें कृष्णराव यानीं आपल्यास जो कारभार पुसत जाईल त्यास रुकार देत जावा दिकती काढूं नयेत व निंबगांव समंधी नवीन कागद पत्र वतनी वगैरे इत्कीया उपर करणें तो त्रिवर्ग बंधूचे नावांचा करीत जावा कारकून उभयेतांकडील राहील त्यानें निखालसपणें कारभार करावा तफावत पडली तर उभयेतानीं द्यावी कलम

१ परराज्यामुळें व हली मार्जा व चोरा चिरठ्यामुळें वगैरे गांवाच्यां रखवालीस सिबंदी खर्च वगैरे पडेल तो कृष्णराव गंगाधर याचें विद्यमानें करून किरकोल गांव समंधी परभारां साधल्यास साधून घ्यावा नं साधेल तो निंबगांवच्या संमाईक यैवजापौ निमेनीम खर्ची घालीत जावा कलम

१ जोतीष व कुलकर्णाचीं वतनाचीं खेडीं आहेत येणे प्रो वितपसील

४ ता खेड सरकार जुनंर पौ देहे ४ च्यार दरोबस्त पौ
निमें जोतीष व कुलकर्ण
१ मौजें निंबगांव
१ मौजें कनेरसर
१ मौजें पूर
१ मौजे गोसासी
---
४

१ मौजें खडकी ता माहाळुंगे सरकार जुनंर येथील जोतीष दरोबस्त
१ मौजें वडगांव नजीक कांबळी ता आंळे सरकार जुनंर येथील दरोबस्त पौ निमें जोतीष व कुलकर्ण
१ मौजें गणेगांव ता श्रीगोंदे येथील जोतीष व कुलकर्ण दरोबस्त
१ मौजे कोनंबे पौ सिंनर येथील कुलकर्ण दरोबस्त
२ मौजें वडझिरें व मौजें गोंदे पौ नासीक येथील कुलकर्ण दरोबस्त
---
१०

येकूंण दाहा गांवचें वतन पौ राजश्री बाजी यशवंत बाबा यांचा निमें हिंसा जाऊन बाकी निमें हिसा राहिला तो कृष्णराव गंगाधर व यशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर यानीं येथा विभागें साव्हा प्रो आनंमवार्थे कलमं

१ पुण्यांतील घर वाडा दरोबस्त येशवंतराव व माधवराव गंगाधर यांजकडे दिल्हा आसे त्या घरवाड्यासी कृष्णराव गंगाधर यांचा समंध नाही कलम

१ घर वाडे येकंदर येणे प्रॉ

१ शहर जुनंर येथील
१ मौजें नायेगांव पो नासीक येथील
१ श्री कासी क्षेत्र येथील
१ श्री पंढरपूर येथील
१ महेश्वर येथील
१ मौजे वाफगांव ताा खेड येथील
१ मौजे गणेगांव ताा श्रीगोंदे येथील
—
७

यासिंवाये वतन समंधी ज्या गांवीं जीं घरें असतील तीं व घराच्या जागा असतील त्या येथाविभागें तीघानीं वाटून घ्यावें व लागवड खर्च वगैरे द्यावा कलम

१ मौजें वाफगांव ताा खेड येथील सेत सनद बाा सेत आहे तें येशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर याजंकडे दरोबस्त कलम

१ मौजें नायेगांव पो नासीक येथील इनांम जमीन आहे ते निमें राा बाजी येशवंत बाबा याचा हिंसा वजा होऊन बाकी निमें येथा विभागें घ्यावें कलम

१ मौजें वरूडें ताा खेड व मौजें मांडवगण फराख्यांचे ताा कडें येकूण दोन गांवच्या वतनामुळें तीर्थरूपानीं खर्च केला आहे ते खेडीं साधलियासिं पुढें खर्च वेच पडेल तो येथा विभागें तिघानीं देऊन येथा विभागें वाटणी घ्यावी अथवा पेशजीच्या खर्चाचे रुा माघारे आले तर येथा विभागें घ्यावे कलम

१ पंधरा हजाराचीं इनामीं खेडीं तीनं जागां येथा विभागें कृष्णराव गंगाधर व येशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर यांस नेहमीं वाटून दिल्हीं असेत त्याजवर काल कम सरकारांतून वगैरें कर्जपटी आदी करून लाहाणं मोठी हरयेक तोहमंत आली तर त्याचें निवारणा विषई प्रयेत्न ज्याचा चालेल त्यानें करून परिहार होईल तेथवर करावा सोहलत पडल ते येथा विभागें त्रिवर्गांचीं असे निवारण न होये त्या पक्षीं जें पडेल तें येथाविभागें त्रिवर्गानीं घ्यावें कलम

१ मौजें केसुंदें प्रॉ माल्वा हा गांव कैलासवासी गंगाधर येशवंत तात्या यांचे कारकीर्दीचा संपादित होता तो वडिलांच्या कसाल्यापासून चालत नवतां तो हलीं कृपा करून श्रीमंत राजश्रि तुकोजी होलकर सुभेदार यानीं कृष्णराव गंगाधर यांजला दिल्हा आहे तो कृष्णराव गंगाधर यानीं आनभवावा त्या गावांसी दादाजी व माधवराव याचा समंध नाहीं कलम

१ कैलासवासी सदासिव गंगाधर यांजकडे भगवंत भैरव थेथे यांचे रुपये पंचवीस हजार होते ते माधवराव गंगाधर यांचे विद्यमानें वारलें आहेत त्याचा समंध कृष्णराव गंगाधर यासीं नाहीं व तलेगांवकर माहाजन याचें कर्ज देणे आहे तें येशवंतराव व माधवराव यानीं बारावें माहाजन याचा समंध कृष्णराव गंगाधर यांजकडे नाहीं काल कम थेथें व माहाजंन यांचा लढा पडला तर त्याचा जाबसाल दादाजी व माधवराव यानीं करावा कृष्णराव यासीं समंध नाहीं उभयेताकडील खते निघालीं तर रद असे यासिंवाये सदासिव गंगाधर यांचे देणे व मागणे व त्यांचे मिलकतीचे मारवाडचे खेडें मौजें गांगवा प्रांं मारवाड त्याचा समंध दादाजी व माधवराव यांजकडे नाहीं व त्यांचा जाबसाल पडेल तो कृष्णराव गंगाधर यानी करावा कलम

१ कैलासवासी गंगाधरपंत तात्या जिवंत असतां च श्रीमंत राजश्रि तुकोजिबावा होलकर सुभेदार यांजकडील दिवाणगिरी व फडणीसीं व जागीर व इनांम व आसाम्या वगैरे व श्रीमंत राजश्रि पेशवे यांजकडील इनामती व जागिरीचीं खेडीं गेली होतीं तीं तात्याचा काल जाल्यांनंतर त्यांजमागे राजश्रि येशवंतराव व माधवराव गंगाधर यानीं श्रीमंत पेशवे यांचे दरबार आर्जेऊन व मुबलक खर्च वेच करून स्वपराक्रमांने होलकराकडील दिवानंगिरी व फडणीसीचा जींर्णोधार केला व जागीर व इनांम चालीस हजार स्याचे बेरजेच्या खेड्यासिवाये श्रीमंताकडील व होलकराकडील पेशजीच्या जुन्या इनामंती व जागिरी पौ व नूतन श्रीमंत पेशवे याच्या सरकारातून व होलकर यांच्या दरबारातून संपादिलें आहे ते व नूतन संपादितील त्यांसी व गंगाधर येशवंत तात्याचे हातचें कर्ज वांम लोकाकडें मागणें यासीं कृष्णराव गंगाधर यांस समंध नाहीं. कलमं

१३

कलमें १८

येकूंण आठरा कलमें वांटणीच्या वगैरे ठरावाचीं करार करूनं दिल्हां आसेत येणे प्रा त्रिवर्गानीं वर्तणूक करावी अंतर करूं नये

बिा पांडुरंग व्यंकटेश जोसी व कुल्कर्णी उपनांम क्षीरसागर मौंजे वाफगांव ता खेड सरकार जुनंर [ हा दोन ओळीचा मजकूर मुळांत उजव्याबाजूस आडवा लिहिलेला आहे ]

मदरहू यादी प्रमाणें कृष्णराव गंगाधर मान्य आसों

मदरहू यादी प्रा येशवंतराव गंगाधर व माधवराव गंगाधर मान्य आसों.

साक्ष

मकंभट वेसीकर जोसी प्रां संगमनेर [ बालबोध अक्षरें ]

बाजी विठ्ठल पा। उपनाम देव निसे मोकदम मौजे देहीवडी पा। कंडे

नरसिंगराव विनायेक चंद्रचूड जोसी कुळकर्णी मौजे निंवगाव ता। खेड वगैरे

गोविंद बाजीराव चंद्रचूड जोसी कुलकर्णी मौजे निंबगाव ता। खेड वगैरे केशव बाजीराव चंद्रचूड जोसी कुलकर्णी मौजें निंबगांव ता। खेड वगैरे

रंग जोसी शहर जुन्नर [ बालबोध ]

मुद्गल जोशी सोलापूरकर तागे [बालबोध]

बाबूराव बचाजी कुलकर्णी मौजे वेस ता। देपूर प्रां संगमनेर

गणेश खंडो यदके

---

**ले. ३** श्रीगजानन

यादि खंडराव कृष्ण यांचा बाका जे आमचे आजे कैलासवासी गंगाधरपंत तात्या होलकर बहादर यांचे दिवाण याणी इनामी गाव व वतन मिळविलें त्यास स्त्रिया दोघी वडील स्त्रीस पुत्र सदासिवराव व कृष्णराव व धाकटे स्त्रियेस दादाजी व माधवराव व व्यंकटराव येकूण पुत्र पाच याचे वेगळ चार तात्यानी करून देऊन फारखत्या शके १६७८ त केल्या त्यावर व्यंकटराव धाकटे स्त्रियेचा त्याचा निर्वंश जाहाला त्यावर तात्यानी पुन्हा पांच विभागाचे च्यार विभाग करून चवघा पुत्रास शके १६८६ दिल्हे ते विभाग घेऊन वडील स्त्रियेचे उभयेता पुत्र येकत्र राहिले त्या प्रो धाकटे स्त्रियेचे पुत्र हि येकत्र च राहिले नंतर आमचे चुलते वडील स्त्रियेचे पुत्र सदासिवराव यांचा निर्वंश जाला सबब दादाजीनी पुन्हा कज्या करून चौ विभागाचे तीन विभाग शके १७०१ चे वेली करून येक विभाग आमचे तीर्थरूप कृष्णराव यास देऊन दोन विभाग दादाजी व माधवराव याणी घेऊन येकत्र राहिले तदनंतर माधवराव शके १७०८ चे सालीं मरण पावले त्यास पुत्र नाही त्यांची बायको होती ती विभागाकरिता भाडत होती परंतु दादाजीनी त्या बाईस दत घेऊ न देता व विभाग इनामगावचा वगैरे न देतां माधवराव यांचे वाटणीचे इनाम गाव व वृति आपणाकडे च ठेऊन त्या बाईस नेमणूक करून दिल्ही ती बाई आज परियंत होती ते पांच सात वर्षे जाली मरण पावली त्याचा विभाग आम्हांस यावयाचा तो दादाजीचे पुत्र सुरळीत न देत सबब आम्ही रा। सदासिव माणकेश्वर याश मार। समजाविला त्याणी श्रीमंत बाजीराव साहेब याचे कानावर घालून आमचा विभाग आम्हांस

दवविण्याविशीं दादाजीचे पुत्रास वगैरे पत्रें दिल्ही तीं पत्रें मानीनात पुढें प्रयत्न व्हावा तों राजकारणामुळे आमची दाद लागली नाहीं अलीकडेस कुंपणी सरकाराचे अमलांत बडे साहेब याचे कानावर हा मार घातला दर्यात्फी व्हावी तो दादाजीचे पुत्र माधवराव मरण पावले त्यास पुत्र नाही त्यांची बायको मात्र आहे त्यावरून आर्ज कीं मागील क्रमाप्रमाणें बुडाले भागाचा विभाग आमचा आम्हांस साहेबानी देविला पाहिजे व ते बाई दुसरियाचा दतपुत्र घेणार म्हणौन यैकिले त्यास दतपुत्र होणें तो आमचे पुत्राखेरीज दुसरियाचा होत नाहीं अैसा शास्त्रसिध्धात रार्बासन साहेब यानी सर्व शास्त्रचापासून लिहून घेतला च आहे ये विशीं वाईस ताकीद व्हावी बाई दत न घे तर इनामी गाव वतने याची मालकी आम्हाकडेस असावी याप्रो आमचे देशात मामूल वहिवाट चालत आहे यावर साहेबाचे मर्जीस येईल त्याप्रो दर्यात्फी होऊन आज्ञा व्हावी आज्ञेप्रमाण आम्हांस चालणे प्राप्त बुडाले भावाचे विभागाचे गावावर यैवज अनामत करण्याविशीं आम्ही चिठ्या केल्या आहेत साहेबास कलावे

---

**लेखांक ४**

१६५६ कार्तीक शु. ८
१६३४ आक्टोबर २४

( फारसी सिंका व एक ओळ फारसी मजकूर )
( इनाम कमिशनचा सिका व नंबराचा आंकडा ७३४२ इंग्रजी )




तुळजाजी सुभानजी हाडे देसमूख सा जुनर [ हीं अक्षरें उजव्या बाजूस आडवी लिहिलीं आहेत ]

महजरनामा अज करार व तारीख ७ माहे जमादिलाखर ते रोजी बहजुर
हाजीर मजालसी
शरीयेत पन्हा काजी सयेद
साले महमद हजरत
देशमुख व देशपांडीये सार जुनर
तुळजाजी सुभानजी हाडे देसमुख
सां जुनर

राजमुद्रा राजश्रि तुको गोविंद हवालदारा ता खेड

त्रिंबक हरी देशपांडीये सार मार

गोत मोकदमानी ता देहाये मार मजकूर मोकदमानी देहाये ता पाबल

दमा सरवाई व भगवंत कृष्ण व त्रिंबक हरी देसपांडीये मार जुनर [ या दोन

म्हासजी पाा जाधव मोकदम मौजे
कोा पाबल ताा माार चादडोहो
निा नागर सेटियाजी पाा
निमे मोकदम
मळजी जाधव
पाा कादलकर
निमे मोा
निा नागर

बिा खंडो सोनाजी 
देशपाडे ताा माार बिा खंडो
बाबाजी पाा व मुधोजी सोनाजी देश-
भागवत मोा मौजे पाडे ताा माार
लाखणगांव ताा माार
निा नागर

बिा रामाजी कृष्ण कनकोजी वाा
जोसी कुलकर्णी खंडोजी पाा
मौजे माार जाधव मौजे
ब्रामणी निा
मोकदम मौजे देव- नागर
गौउ ताा बिा बाबूराउ
आवजी गुा
निा नागर देसपाडे सार

माार

बिा रामाजी कृष्ण
जोसी कुलकर्णी मौजे माार
रभाजी पाा ढगे
मोा मौजे आफटी
ताा माार
निा नागर


ओळी उजव्या बाजूस आडव्या लिहिल्या आहेत ]

मोकदमानी देहाये ताा खेड मोकदम व चौगुले सेटे कोा खेड ताा माार
निा नांगर


बिा खडो सोनाजी देसपाडीये ताां पा-
वल साा [ मज ] कुर
मोकदम मौजे वाफगाउ ताा मजकूर
खंडोजी बिन म- जयराम नीलकठ
ल्हारजी पाा होळ. ब्राम्हण चौथाई
कर निमे मोकदम मोकदम पाटील


बिा गोविद
रघुनाथ जोसी हणमाजी वाा रा-
कुलकर्णी मौजे याजी पाा सुखे
मजकूर हिसा ८ मोा
मोकदम मौजें पिंपळगौड
निमे दोडकर निमे मोहिते


बिा बाबाजी माणकेश्वर जोसी कुल-
कर्णी मौजे माार माहदजी वाा आ-
बाजी कराळा चौगुला मौजे माार

सिवजी पा सिवला मौजे बोढ निा-
नागर



बिा बावूराऊ आवजी गुा
देशपांडे सार
मार
मोकदम देहाय ता आवसरी
जावजी पा हिंगे मो हिसे ३ चावजी
पा मो आवसरी बुा
ता मार
निा नागर



बिा तुको गोविंद कुलकर्णी
मौजे मार

मकाजी वा भिकाजी पा चौधरी मोक-
दम मौजे खरपुडी निा नागर



बिा सखो बनाजी जोसी व कुलकर्णी
मौजे मजकूर मोकदंम मौजे रेटलु (?)
निा नागर



बिा बावूराव आवजी गुमास्ते देशपांडे
सरकार मार
मोकदम मौजे रेटवडी
निा नागर



बिा सखो बनाजी जोसी कुलकर्णी मौजे
मार आनसोजी पां पवले मो मौजे वा-
कलवाडी
निा नागर 

बिा येसाजी कृष्ण जोसी व कुल-
कर्णी मौजे मार

प्रो चाकण निा येसाजी कृष्ण जोसी व कुलकर्णी
मौजे मार

मौजे कालोस
१ देवजी पा वलद रखमाजी पा मो
पोवले निा नागर 

मौजे दावडी
१ दमाजी पा मो गाइकवाड
निा नागर 

१ जानोजी सिवदेव जोसी व कुलकर्णी
१ संताजी वलद गोमाजी आरगडे
चौगुले

३

१ दमाजी पा पोवले मौजे खरपुडी
प्रो मार

१ येसाजी पा गाडेगा
१ बिा रंगो आनंत कुलकर्णी जोसी
१ माहेरे चवगुले
१ नारायण भट दिक्षित उपनाम कटेर
[ हीं अक्षरें बाळबोधींत आहेत.]
मो मौजे सोळु

१ बाळोजी रूपाजी पाा मोा निाा नागर

१ सरवो बालाजी मौजे मार

—

२

यशवतराव वाा त्रिंबकराव
देशमुख ताा पवन मावल

माहदजी पाा ठाकूर

मोरोजी गोडसे चवगुले

भवानजी वाा भिवाजी पाा सिवले मोा
को सिवले

निाा नागर

बिाा बाबूराव आवजी गुो देशपांडे
सरकार जुनर

सुाा खमस सलासीन मया अलफ सन ११४४ कारणे महजरनामा लिहून दिधला येसा जे बाजी येशवंत व गंगाधर येशवंत उपनाम चंद्रचूड आजहद देशपांडीये सार मजकूर यांणी हाजीर मजालसी हुजूर येऊन जाहीर केलें कीं म्हाळसाबाई कुच मल्हार रघुनाथ आत्रे अत्रगोत्री खुर्द जोसी कुळकर्णी मौजे निवगौड नागाना ताा खेड सार मजकूर इने आपले खुष रजावंदीने मौजे मारचे कुलकर्ण व जोसपण दरोबस्त पैकीं निमे वतन आम्हांस खुश खरीदी दिल्हें आहे व म्हाळसाबाई रुबरु आहे त्यांस करीणा पुसोन निमे वतनाचा महजर करून दिल्हा पाहिजे त्यावरून म्हाळसाबाईस हकीकत पुसली कीं निमे वतन मौजे मजकूरचें काये सबब दिधलें आहे याची हकीकती तपसीलवार जाहीर करणे त्याजवरून म्हाळसाबाईने करीणा जाहीर केला कीं आपले कदीम वतन कुळकर्ण व जोसपण मौजे मजकूरचें आहे त्यास आपले पोटीं पुत्रसंतान नाहीं व वौंशात हि कोन्हीं वारीस नाही वृत्ती चालवायासि व पांढरींची चाकरी करावयांसि कोन्ही नाही आपला वृधापकाळ शरीराचा भरवसा नाहीं श्रींमाहायात्रेस जावयाचा उदेग धरिला आहे परंतु आनकुळता होउन न ये वृत्तीमुळें चहूंकडून नाना प्रकारचें कशाले या करितां लाइलाज जाणौन आपले खुश रजावंदीने राजी होऊन मौजे मजकुरचें कुळकर्ण व जोसपण दरोबस्त पैकीं निमे वतन बकिमती रुो २००० दोन हजार घेऊन बाजी येशवंत व गंगाधर येशवंत यांसि खुश खरीद दिधलें आहे व निमे वतन लक्षुमण गोविंद उपनाम टल्ल आपला जावाई यांसि दान दिल्हें आहे त्याचे दानपत्र आलाहिदें करून दिधलें आहे बाजी यशवंत यांसि निमे वतन दिधलें आहे त्याचें खरीदखत आल्हादे करून दिधलें आहे ते मनास आणून भोगवटीयास महजर करून दिधला पाहिजे त्यावरून खरीदखताचा मजकूर तपसीलवार मनास आणून व म्हाळसाबाईस हकीकत लाफर बाके पुसोन निमे वतनाचा महजर तुम्हांस करून दिधला आसे खरीद खताचा मजमून आं की

खरीदखत सके १६५६ आनंद नाम संवत्सरे आस्वीन वद्ये १ प्रतिपदा ते दिवसीं राजश्री बाजी येशवंत व गंगाधर येशवंत उपनांम चंद्रचूड आजहद देशपा सार जुनर यांसि म्हाळसाबाई कुच मल्हार रघुनाथ अत्रे अत्र गोत्री खुर्दे जोसी कुल कर्णी अष्टाधिकारी मौजे निबगौड नागना ता खेड सार मार सुा खमस सलासीन मयां आलफ सन ११४४दोन कारणे खरीदखत लेहुन दिधलें यैसें जे मौजे मजकूरचे कुळकर्ण व जोसपण आपलें पुरातन वतन आहे त्यास आपले पोटीं पुत्रसंतान नाही व वौंशात हि कोन्हीं नाही येका जिवानसीं आपण राहिलों पुढें वृत्ती चालवावयासि व पांढरीची चाकरी करावयासि कोन्हीं नाही वौंशवृर्धीची नाउमेद जाली पुढें आपली वृधाप आवस्ता कांही दानधर्म कांही तीर्थ यात्रा करावी कोठे तटाक कूप बांधावा कांही जन्माचें सार्थक करावें व माहायात्रेस हि जावयाचा हेत आहे व संसारामुळें कर्जवाम हि जालें आहे व नाना-प्रकारचे कशाले वृत्तीमुळें आपल्याच्याने सोसवतनात आपणा मागें रिणापासून मुक्त करावयांसि हि कोन्ही नाही सर्व प्रकारें निराश्रित जाणौन तुमच्या घरास येऊन गळां पडोन तुम्हांस वजीद होऊन आपण आपले खुष रजावंदीने मौजे मजकूरचे कुलकर्ण व जोसपण दरोबस्त पैकीं निमेनीम व वडीलपण तुम्हांस देऊन बकिमती रुो २००० दोन हजार तुम्हांपासून घेऊन खुश रजावंदीने निमे वतन तुम्हांस दिधलें आसे व घर ठाणा मिरासचा आपला कदीम आहे त्यापैकीं उजवे बाजूस तुम्हांस दिधली आसे तेथे इमारत बांधोन सुखरूप नादणे व कुळकर्णाचा मुशाहिरा व हक उत्पन कुल बरोबरीने निमे तुम्हांस दिधले आसे व निमे कुलकर्ण व निमे जोसपण आमचा जावाई लक्ष्मण गोविंद उपनाम टलु यांसि दान दीधलें आहे त्यांचें दानपत्र आलाहिदें करून दीधलें आहे त्याप्रो उभयेतानी वृत्ती आनभऊन सुखरूप लेंकराचे लेंकरीं वौंशपरंपरा आर्जोनी करणें कुळकर्णाचा मुशाहिरा बिन मल्ता टके ६० साठ मो रुो २४ चोवीस व गला खंडी ३ तीन येणेप्रमाणें आहे तो निमे तुम्हीं घेणें व निमे लक्ष्मण गोविंद यांसिं देणें व जोसपणाचें बलुत व हक उत्पंन होईल तें निमे तुम्हीं घेणें व निमे लक्ष्मण गोविंद घेणे कुलकर्णाचे व जोसपणाचे मान बिा

कुळकर्णाचे मानबा

१ दिवाणाचा सिरपाव पाटलामागें

१ दिवाळीदसरा वाजविणे व न्हाण पाटलामागें

१ तेलियाचें तेल दररोज दर दुकान ॥ ॥ ॥ १

१ माळियाची सेव सबजी पाटला मागें

१ चांभाराचा जोडा

१ कोलियाचें पाणी पाटलामागें निमेप्रो

४ श्री मार्तंडजीचे देउळचें हक उत्पंन

१ माही पुर्णमेस टकेचा

१ भंडार प्रसाद पाटलाचे निमे

१ आसने आदितवारी माहिन्यात येकवारी पाटलामागें तूप ध्यावें

१ माही पुर्णमेस यात्रेचे दिवशीं मिठाई पाटलाचे निमे प्रो

४

१ लांकडांची मोळी सणाची येक
१ शाईस तेल व कागदास रुमाल जे
लागतील ते गावकरियानी द्यावे
—
८

१ तांबोलियापासून पाने पाटील घेतील
त्याची निमे
—
५

१३

जोसपणामुळें हक उत्पन
१ बलुते
१ देउळी भंडार प्रसाद बलुत्या बा
१ इनाम सेत थळ साडे बारामणी जमीन बिघे २५
—
३

सदरहुप्रमाणे कुळकर्णाचे मान तेरा निमे तुम्हीं घेणे व निमे लक्षुमण गोविंद यांसि देणे व जोसपणामुळें हक उत्पंन होईल तें निमे तुम्हीं घेणे व निमे लक्षुमण गोविंद यांसि देत जाणें व इनाम जमीन बिघे पंचवीस आहे ती त्यापैकीं निमे तुम्हीं घेणें सदरहु कुळकर्ण व जोसपणा दरोबस्त पैकीं निमे तुम्हास दिधले व मानपान हक उत्पंन वगैरे लवाजीम निमेप्रमाणें घेऊन सुखरूप वौंशपरंपरा भोगवटा घेणें व आपला मिरासेचा घर ठाणा कदीम आहे त्यापैकीं निमे उजवे बाजूस तुह्मांस दिधला आसे व निमे डावे बाजूस लक्षुमण गोविंद यांसि दिधला आसे उभयेंतानी आपलाल्या जागीयावरी इमारत बांधोन नांदणे यांसि आपण हिला हरकत करून तरी आपणास श्री कुलस्वामीची व पूर्वजाची शपत आसे अगर आपले वौंशांत कोन्हीं उभा राहून वारिसा करील त्यासि आपण वारू तुम्हांसी संमध नाहीं हे खरीदखत लेहून दिधले हीं

सदरहु खरीदखताप्रमाणें मजमुन मनास आणून मौजे मजकूरचें कुळकर्ण व जोसपण व कुळकर्णाचा मुशाहिरा व मानपान व हक उत्पंन वगैरे लवाजिमे दरोबस्त पैकीं निमे तुम्हांस दिधला आसे याचा महजर भोगवटियांसि करून दिधला आसे येणेप्रमाणें मौजे मजकूरचें निमे वतन अनभऊन सुखरूप लेंकराचे लेंकरी वौंशपरंपरा वर्तनी करून भोगवटा घेणे हा महजरनामा लिहिला सही

बदस्तूर ( र )बाबूराव आवजी गुमास्ते देसपांडिये सरकार जुनर

साक्ष पांढरी मौजे मार
रामजी पा। वा। मलजी
पा। मो। सिंदे
नि। नागर

थलकरी कुणबी
१ गोंदजी वा। दावजी राउत
१ खंडोजी वा। सावजी राउत
१ मोरोजी वा। जानोजी राउत
१ दुलबाजी वा। कान्होजी सातपुते

पाटिलाचे भाउबंद

१ मोही बाई कुच सभाजी
पा सिंदे

१ सुताजी वा गोंदजी पा सिंदे
१ जानोजी वा दावजी पा सिंदे
१ कृष्णाजी पा वा रंगोजी पा सिंदे
१ रत्नाजी पा वा सिंदे
१ संताजी वा दावजी पा सिंदे
१ तुळाजी पा वा सयाजी पा सिंदे
१ तुकाजी पा वा तान्हाजी पा सिंदे
१ गोमाजी वा विठोजी पा वाटेकर
चौगुले
१ राणोजी वा संतोजी पा सिंदे
१ तान्हाजी पा वा जानोजी पा सिंदे
१ मानकोजी वा विठोजी पा सिंदे
१ दुलबाजी वा मवाजी
पा सिंदे
१ बावजी वा गोंदजी सिंदे
१ राणोजी वा संताजी सिंदे
कुडालकर
१ सटवोजी वा संकराजी सिंदे
१ म्हांसजी वा सिंदे

१ मल्हारजी वा मालजी मराठ ?
१ मल्हारजी वा तांबे

१ हरजी वा बाबाजी राउत
१ तुकोजी वा दादजी तेली
बारा बलुते

| देउळकरी | गावकरी |
|---|---|
| देवाजी वा दावजी भगत निा पंचारती | दादजी वा जाखोजी सुतार लोहार निा किंकरे |
| कुसाजी वा रामपरणा गुरव निा गाडु | सुभाना वा म्हा |
| मल्हारजी वा भिकाजी वाग्या निा घोळ | वजी परीट निा मोगरी |
| पुा गावकरी बलुते महार | जोमाजी वा बापू महाळा न्हावी निा अरसा |
| नाग नाक वा साव नाक महार मेहत्रे सोनवणी निा बिळादोर | रूपाजी वा सट वाजी कुंभार निा चाक |
| खंड नाक वा गोंद- नाक माहार सोनवणी | सुभाना वा बंगोजी चांभार निा ईग |
| खंडनाक वा हेनाक महार सोनावणी | भैराळ वा गोविंदा गुरव निा मांदल |
| | काळराउत वा दाद राउत गांव- |

लेखांक ५ श्री. १६६१ मार्गशीर्ष व० ११
१७३९ दिसेंबर १५.

० श्री ०
राजा शाहु नरप-
ति हर्ष निधान बा-
जीराव बळाळ
मुख्य प्रधान

वतनपत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वास निधी राजमान्य राजश्रि बाजीराउ पंडित प्रधान ता। बाजी येसवंत व गंगाधर येसवंत उपनाम चंद्रचूड गोत्र विष्णुवर्धन निसें जोंसी कुलकर्ण देहाये
मौजे कनेरसर मौजे गोसासी मौजे पुर
१ १ १
ता। खेड सा। जुनर सु॥ आर्बैन मयां अलफ तुम्ही का। पुणे याचे मुकामी हुजूर येऊन विनंती केली की सदरहु ती गावचें निमे जोतीष व निमें कुलकर्ण विठल रायाजी उपनाम अत्रें गोत्र अत्री याचें होते त्याणी आपले खुश रजावंदीनें आम्हांस विकत दिल्हें त्याचें खरीदखत आहे ते मनास आणुन वतनपत्र करून दिल्हे पाहिजे म्हणोन त्या वरून खरीदखताचा मजमुन बि॥ तपसील

खरीदखत शके १६६१ सिधार्थी नाम संवत्छरें श्रावण शुध प्रतीपदा बुधवार ते दिवसी राजश्री बाजी येसवंत व गंगाधर येसवंत चंद्रचूड गोत्र विष्णुवर्धन जोंसी कुलकर्णी मौजें निबगाव ता। खेड सा। जुनर यांसि विठल रायाजी अत्रें गोत्र अत्रि जोंसी कुलकर्णी मौजे कनेरसर व मौजे गोसासी व मौजे पुर ता। मजकुर सु॥ आर्बैन मयां अलफ सन हजार ११४९ कारणे खरीदखत लिहोंन दिल्हे यैसे जे देहाये मारनें जोतीष व कुलकर्ण पिढी दर पिढी आपलें आहे त्यास सदरहु वतनामध्यें निमे वतन जोतीष कुलकर्ण आपलें दरोबस्त आहे व निमे मध्यें आपलें भाउ राघो दादाजी व मल्हार आवजी व भगवंत आवजी व जैराम येसाजी व शिवराम येसाजी या सदरहु जणाची निमें तक्षीम आहे यैशास आपलीयास दिवाणचें वगैर कसालें बहुत पडिलें यामुळें व पोटामुळें कर्जवाम बहुत जहालें ज्याचा पैका देणे त्याणी बहुतसी निकडी केलीं त्यास द्यावयास यैवज नाही व आपलें पोटी संतान नाही माहायात्रेस जाऊन जन्माचें सार्थक करावें हा हेतु चितात परतु कर्जदार जाऊ न देत तेव्हा आपण विचार केला की सदरहु तीन गावीचें जोंतीष कुलकर्ण आपली वृती आहे हे येखाद्यास द्यावी आणि त्याज पासून पैका घेऊन लोकाची देणीं वारावी आणि माहायात्रेस जावे यैसा निश्चय करून ती गावीच्या मोकदमास व समाकुल पाटरीस विच्यार पुसोन त्याच्या मतें व आपल्या विच्यारे तुम्हापासी

येऊन तुमच्या गला पडोन तुम्हास बहुत प्रकारें वजीद होऊन आपण आपल्या आत्मसंतोषे खुश रजावंदीने देहाये मजकूरचें जोतीष व कुलकर्ण आपली निमे तकसीम दरोबस्त फ्रोख्त दिल्ही आणि तुम्हापासून सदरहु निमे वतनाची किमत करार रुपये ६००१ अक्षरीं सा हजार येक सदरहु आपण आपलें पदरी घेऊन आपली निमे तकसीम ती गावचें जोतीषपण व कुलकर्ण खुश रजावंदीने तुम्हास दिल्हे असें तरी तुंम्ही देहाये मजकूरच्या जोतीषणाचा व कुलकर्णाच्या हकलाजिमा व कुलकर्णाच्या मुशाहिरा व बलुते व मानपान व सिरपाव आपल्ये निमें तकसिमेच्या घेत जाणें देहाये मजकुरी आपले निमे तकसिमेची घरे व वाडे आपली आहेत त्यावरी राहोन तुम्ही व तुमचें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें आपलें निमे वतन देहाये मजकूरचें जोतीष व कुलकर्ण सुखरूप अनुभवीत जाणें यास कोण्ही आपलये वंसीचा हिला हरकत करील त्यास वेतालीस पूर्वजांची व वाराणसीत पातक केल्याची शफत असें हे खरीदखत लिहोंन दिल्हे असे बिा ॐ

सदरहु प्रमाणें खरीद खताचा मजमून मनास आणून सदरहु ती गावचे निमे जोतीष व कुलकर्ण निमे तुमचे दुमाला करून हे वतनपत्र सादर केले असें तरी तुम्हीं व तुमचें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने ती गावीचे कुलकर्ण निमे व जोतीष निमे पान मान हक लाजीमे व मुशाहिरा व घर सदरहु खरेदी खताप्रमाणें अनभऊन सुखरूप राहाणें वतन समधे तुमचें माथा सेरणी रुपये *स्वराज्य व मोगलाई व सरदेशमुखी व सावोत्रा कुलबाब व कुलकानु करार रुपये ९०० नवसें केले असेत सदरहूची उगवणी करुंन वतन अनभऊन सुखरूप राहाणें जाणिजे छ २४ रमजान आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

---

लेखांक ६ श्री.

१६६१ भाद्रपद व० ११
१७३९ सपटंबर १७

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री
गंगाधर येशवंत गोसांवि यांसी

सेवक बाजीराव बलाल प्रधान नमस्कार सुा आर्बैन मयाव आलफ तुमचे वर्तमान सविस्तर रा त्रिंबक विनायेक यांणी अगोदर सांगितले होते सांप्रत ही निवेदन केले येणेंयास येथील कैद कानु प्रमाणें रा रामाजी यादव वर्तेतील तरी उत्तम

---

* येथून अक्षराचें वळण निराळें आहे.

आहे न वर्तत तरी तुम्हीं येथें येणें जे आज्ञा कर्तव्य ते करून आपले समाधान असो देणें जाणीजे छ २४ जमादिलाखर बहुत काय लिहिणे.

लेखन
सीमा

---

लेखांक ७

१६६९ मार्गशीर्ष व० ७
१७४७ दिसेंबर १३

श्री.

॥ मा अनाम देशमुख व देशपांडे ता पाबल प्रांत जुनर यांसि बालाजी

श्री
राजा शाहु नरप
ति हर्षनिधान बा
ळाजी बाजीराव
मुख्य प्रधा
न

बाजीराव प्रधान सुहूर सन समान अर्बैन मया व अलफ मल्हारजी बिन खडोजी पाटील होळकर मोकदम निमे मौजे कोरेगांव ता मजकूर यांणी हुजूर येऊन विदित केले कीं मौजे मजकूरचे मोकदमी बदल पूर्वी श्रीमंत कैलासवासी राउ यांचे कारकीर्दीस बावजी पाटील गव्हाणे व बिठोजी पाटील गव्हाणे आपल्यामध्यें आपण कजिया करून हुजूर आले श्रीमंतास वर्तमान निवेदन केले त्याजवरून इनसाफ... ..., इतावर सोपाला पञ्चाइताचे मते निर्वाह जाला जे बावजी पाटील निमे मोकदमीचा खावंद व बिठोजी पाो निमे मोकदमीचा खावंद या प्रमाणे इनसाफ मुलें करार जाहाला असीयास बिठोजी पाटील दरोबस्त मोकदमी करीत असतां त्याणे निमे मोकदमी म्हसाजी बीन बहीरजी फडतरे यास विकीली त्यास बावजीने बिठोजीसीं भाडावयाचा मजकूर चितात आणिला तेव्हां आपल्यापासी खर्चवेच करावयास नाहीं खर्चवेच पडेल तो तुम्ही देणे आपली मोकदमी साधेल त्यापैकी वडीलपण निमे मोकदमी तुम्हास देऊ धाकुटपण निमे मोकदमी आपण करूं येसी बोली जाहाली होती त्यास इनसाफमुले बावजीची मोकदमी निमे करार जाहाली त्याणी निमेपैकी निमे मोकदमी म्हणजे च्यार गावची चौथी तक्षीम वडीलपण आपणास दिली चौथी तक्षीम बावजीकडे

राहिली त्यास विठोजी पो गव्हाणा याणे अर्ज केला जे आपली निमे मोकदमी करार जाली ते आपण आधीं व म्हसाजी फडतरे यास देऊन चुकलो याज उपरि आपल्यास कालींत व पादरीत जागा नाही तरी कृपाळु होऊन आपली स्थापना केली पाहिजे त्याजवरून बावजीचे चौथी तक्षीमपैकीं निमे तक्षीम विठोजीस म्हणजे गावची आठवी तक्षीम दिल्ही आठवी तक्षीम बावजीकडे राहिली याप्रमाणे पेशजी निर्वाह होऊन कागद पत्र चौघास हि करून दिल्हे त्या प्रमाणें वरीस दोन वर्षे चालिले आपल्या चितात आले जे विठोजीची निमे मोकदमी फडतरे यास विठोजीनें दिल्ही त्याची स्थापना फडतरे याकडे असावी बावजी पो निमेचा खावंद त्याचे वडीलपण वतन आपल्याकडे सदरहु प्रमाणे लागले असतां विठोजीस बावजीच्या वाटयांत सिरो द्यावे हे गोष्ट फटकाल आहे ऐसे चितांत आणून परस्परें फडतरे याचा व आपला कलह लागला याजमुले आज तागाईत दाहा बारा वर्षे मानपान कांहीं चालला नाहीं त्यास महीपतजी बिन म्हसाजी फडतरे व बावजी बिन सटवाजी पो व विठोजी पो गव्हाणे यांणी कुलकर्णी व चौगला यास बरोबर घेऊन आपल्याकडे मौजे वाकगांव ता। खेड येथे आले आणि महिपतजी फडतरे म्हणो लागले जे तुमचा आमचा कलह लागला यांत उतम नाही पुढे लेकराचे लेकरीं चालिले पाहिजे याजवरी पाहातां निमे तक्षीममध्यें आपण व गव्हाणे असावे व निमेमध्ये तुम्हीं व बावजी गव्हाणा याणे असावे त्यास तुमचे निमेपैकी चौथी तक्षीम विठोजीस दिल्हीं ती आपल्याकडे ज्याजती आलियामुले तुमचे आमचे न चालिले हा अर्थ चितांत आणून आपले निमेपैकी चौथी तक्षीम तुम्हाकडे दिल्ही येकूण विठोजी व आपण निमे जाहालो तुम्ही व बावजी निमे जाहलेस व बावजीस आठवी तक्षीम व विठोजीस आठवी तक्षीम येकूण चार गावची चौथी तक्षीम उभयेताकडे करार आहे बाकी तीन तक्षीमा राहिल्या त्यांत तुमची निमे व आपली निमे या प्रमाणे समजोन तुम्हीं व आम्हीं चालावे यात उतम आहे यास आपण आपले रजावंदीने व पादरीचे व भावाच्या गुजारतीनें रजावंद आहो त्यास आपण त्याजसी बोलिलो जे आम्हांसीं ज्याप्रमाणे बोलता त्याप्रो गोत मेलऊन करार मदार जाहाला म्हणजे तुमचे आमचे चालिले जाईल ऐसे बोलिल्यावर मौजे मजकूरच्या पारी गोत जमा करून आपण व फडतरे व बावजी व विठोजी गव्हाणे ऐसे गोतापासी जाऊन सदरहु वर्तमान सांगितले तेही गोताच्या चितास आले की हे गोष्ट उतम जाहाली किलाफ होता तो गेला मग गोतानी आज्ञा केली जे ज्याप्रमाणे समजलेस त्याप्रमाणे कागद करणे त्यावरून महिपतजी बिन म्हसाजी पाटील फडतरे यांनी आपल्यास पत्र दिल्हे आहे ते पाहून व रुबरु हि त्यास व गव्हाणि यास पुसून साहेबी सरकारचे पत्र मोगलाटयास करून दिल्हे पाहिजे म्हणोन विदित केले व महिपतजी पाटील फडतरे यानी पत्र दिल्हे ते मजुर केले व महिपतजी पो फडतरे व गव्हाणे आणून उभे केले त्याजवरून पत्राचा व फडतरे व गव्हाणे याच्या जबानीचा मजकूर मनास आणता मौजे मजकूरचे चौगला पाटीलकी पैकी निमे

पाटिलकी फडतरे व फडतरे याचे निमे तक्षिमेत चौथा नर्साम विठोजी गव्हाणे व निमे पाटीलकी वडीलपण मल्हारजी विन खंडोजी पो होलकर याचे निमे तक्षिमेत बावजी गव्हाणे याप्रमाणे समजोन महजनामा जाला पहिले मानपान पान पेशजीचे निवाडपत्रांत लिहिले च आहेत त्यापैकी हाली तिहीं मानाचा फेरफार जाहाला वरकड मान पेशजी प्रो च करार जाले हे जाणून हे आज्ञापत्र तुम्हास सादर केले असे तरी सदरहु प्रो आपलाले विभागाचा उपभोग करून मानपान घेतील

वितपसील

मल्हारजी विन खंडोजी पो होलकर

१ नाव आधी होलकर मागून फडतरे नागर होलकरास पुसोन फडतरे यानी करावा

१ सिरपाव होळकरानी व फडतरे यानी बराबर घ्यावे

१ टीला आधी होलकरास मागून फडतरे यास लावावा

१ विडा आधी फडतरे मागे होलकरानी घ्यावा

१ पोल्याचे वैल आधी होलकर त्यामागे विठोजी गव्हाणे याणी आणावे

१ दसरियाचे वाजविणे आधी फडतरे मागे होलकराचे

१ दिवालीचे वोवालणे आधी होलकर मागे फडतरे

१ होलीची पोली पेशजी होलकरानीं व फडतरे यानी बराबर बांधाव्या यैसा करार होता हाली होलीची पोली होलकराचे घरचे आधी वाजवीत कि-टोवा मुज्याचे पाराजवल आणावी मागोन फडतरे याचे घरची पोली

महिपतजी विन म्हसाजी पाटील फडतरे

१ नाव आधी होलकर मागून फडतरे नागर दोघापासून करवावा यैसा करार होता हाली नाव होलकराकडे आधी नागर होलकरास फडतरे यानी पुसोन आपले हातें करावा

१ सिरपाव होलकरानी व फडतरे यानी बराबर घ्यावे

१ टीला होलकरामागे फडतरे यास लावावा

१ विडा आधी फडतरे मागे होलकरानी घ्यावा

१ सिरालसेट फडतरे व बावजी गव्हाणे याणी बराबर न्यावा यैसा पेशजी करार होता हाली सिरालसेट विठोजीस देऊन हरिजागर आधी होलकरानी पुजा करावी मागे फडतरे यानी करावी

१ दसरियाचे वाजवणे आधी फडतरे मागे होलकर

१ दिवालीचे वोवालणे होलकरामागून फडतरे

१ होलीचे पोली पेशजी होलकरानी व

वाजवीत किटोबाचे पाराजवल आणून दोन्ही पोल्या बरावर नेऊन उभयेतानी लाऊन पुजन बरावर करावें

१ दिवाणात भेट होलकरानी ठेवावी

१ दसरियाचे दिवसी आवटियाचे पूजन होलकरानी करावे कोल्यानी पाणी आधी फडतरे याचे वरी घालावे मग होलकराचे घरी घालावे

फडतरे यानी बरावर नेऊन बांधाव्या यैसा करार होता हाली होलीची पोली होलकराचे घरची आधी वाजवीत किटोबा मुंज्याचे पाराजवळ आणावी मागून फडतरे याचे घरची पोली वाजवीत किटोबाचे पाराजवळ आणून दोन्ही पोल्या वाजवीत नेऊन उभये तानी नेऊन लाऊन पुजन बरावर करावे.

१ हरी जागर पेशजी विठोजीकडे होता त्यास सिरालसेट देऊन हरी जागर घेतला हरी जागराची पूजा आधी होलकरानी करावी मागून फडतरे यानी करावी.

१ चाम्हाराचे जोडे दोन येक होलकर व येक फडतरे

१ फ्याव्याची मोली आधी होलकर मागें फडतरे

१ गुढ्याचे पाडव्याचे दिवसी पातडे फडतरे याचे घरी वाचावे

१ गावात थेर भोरीप होईल त्यास त्याग फडतरे यानी आपले हाते टाकावा

१ कोल्याचे पाणी आधी फडतरे त्या मागे होलकर

१ चाम्हाराचे जोड दोन येक होलकर व येक फडतरे

१ फ्याव्यांची मोली लोहकरामागे फडतरे

बावजी बिन सटवाजी पो गव्हाणा तक्षीम आठवी

१ गणेश दोघा गव्हाणियानी बरावर न्यावे

१ गवरी दोघा गव्हाणियाच्या बरावर न्याव्या

१ तोरणे गरु आवघ्या आधी बावजीकडे

१ सिरालसेट फडतरे व बावजीकडे होता तो हली विठोजीकडे देऊन हरीजागर घेतला सिरालसेट बावजीनि व विठोजीनें बरावर न्यावे

विठोजी बिन येसजी पो गव्हाणे आठवी तक्षीम

१ गणेश दोघा गव्हाणियानी बरावर न्यावे

१ गवरी दोघा गव्हाणियानी बरावर न्याव्या

१ पोळ्याचे बैल आधी होलकर मागे विठोजी गव्हाणे यानी आणावे

१ सिराळसेट वावजी गव्हाणे व फडतरे याकडे होता तो विठोजीस देऊन हरीजागर होलकर व फडतरे याजकडे करार केला सिराळसेट दोघा गव्हाणियानी बरावर न्यावे.

१ संक्रातीची सुघडे अवघ्या आधी विठोजी गव्हाण याजकडे द्यावी

५

या खेरीज हक उत्पन्न चौघानी आपल्याले विभागा प्रो घ्यावे

१ इनाम रुके ८६
१ मोकदमाचे धल असेल ते
१ सेव माल्याची
१ वाण्याचे दुकानास सुपारी येक
१ माल्या कोष्ट्याचे मागास आटफळे येक
१ नदीचा उतार
१ रावता महार होलकर व फडतरे

७

१ मोकदमीचे वाडे
१ तेल्याचे घाण्यास तेल वजन ८८। पाऊसेर
१ धनगराचे मागास चवाळे येक
१ वराडाचा खोवऱ्याचा वाटा
१ वाण्याचा वोटल
१ रानातील पारध
१ तावोलियाचे दुकानास पाने १३ तेरा.

७

सदरहु प्रमाणे मानपान चौघानी आपलाले ध्यावे हक उत्पन्न लिहिले आहे हे व याखेरीज कदमी असतील ते व जदीद होतील ते चौघानी तक्षीमप्रो घेऊन तहनाम्या प्रमोजीब वतनाचा उपभोग कालांत व पाढरीचा करावा याप्रो मल्हारजी विन खंडोजी पो होलकर यास आज्ञापत्र सादर करून हे पत्र तुम्हास लिहिले असे तरी तुम्ही सदरहू मोकदमीचे वतन होलकर व फडतरे व हरदु गव्हाणे यास विभाग प्रो देतील मानपान यांस व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवणे या पत्राची प्रत लेहून घेऊन हे पत्र भोगवटियास होलकराजवळ परतोन देणे जाणिजे छ २१ जिलकाद आज्ञा प्रमाण

लेखन सीमा

श्री

लेखांक ८

१६७२ आषाढ शु० ६
१७५० जून २८

राजश्री मल्हारजी होलकर व राजश्री जयाजी
सिंदे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्हाकडे नजर बा तालुका माधोसिंग साल मारापासून दरसाल रुपये ५०००० पनास हजार करार केले असेत दरसाल सरकारांत सदरहू रुपये पावते करून पावलियाचा जाब घेणें तेणे प्रमाणे मजुरा असेत या खेरीज राजश्री महादजी आबाजी यांज बावत नजर दरसाल रुा १०००० दहा हजार पेसजी करार केले आहेत त्याप्रमाणें पावीत जाणें पावल्याचा जाब घेणे तेणे प्रमाणे मजुरा असेत जाणिजे *रा छ ४ साबान सुा इहिदे खमसैन मया व अलफ बहुत काये लिहिणें

लेखन
सीमा

श्री
राजा राम नर
पति हर्ष निधान
बाळाजी बाजीरा
व मुख्य प्रधा
न

---

लेखांक ९

१६७२ आषाढ शु० ११
१७५० जून २८

श्री.

राजश्री मल्हारजी होलकर व राजश्री ज-
याजी सिंदे गोसावी यांसि

*ॐ. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणें विशेष प्रां गुजराथ पैकी सुरत आठावीसी सरकारांत ठेऊन बाकी प्रांत मजकूर कुल पैकी निमें सरकार व निमे

* येथून अक्षराचें वळण निराळें आहे.

उभयता तुम्हीं याप्रमाणे करार केला असें सुरत माहांल आठावीसी खेरीज करून दरोबस्त प्रा मजकूर पौ समाईक राजेश्री माहादाजी अंबाजी यासि खेरीज रुपयें ८००००० आठ लक्ष पैकी सरकार हिशाचे यैवजी रुपये ४००००० च्यार लक्ष व तुमच्या हिशापैकी रुपये ४००००० च्यार लक्ष द्यावे बाकी यैवज निमें तुम्हीं घेणे व निमें सरकारांत देणे सुरंत अटवीसीं पैकीं तुम्हां उभयेतांस माहांलं येक लाख रुपयांचा द्यावयाचा करार केलां असे जाणीजे छ ४ * सावान सुा इहिदे खमसैन मयां व अलफ बहुत काये लिहिणे

लेखन सीमा

० श्री ०
राजाराम नर
पति हर्षनीधान
बाळाजी बाजीरा
व मुख्य प्रधा
न

---

**लेखांक. १०** १६७२ आषाढ शु. ६
१७५० जून २८

श्री

राजश्री मलहारजी होलकर व राजश्री
जयाजी सिंदे गोसांवि यासि

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री बालाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणें विशेष तुम्हाकडें प्रां बुंदी व पानेणवे वगैरे प्रांत मजकूर येथील चौथाईचे अमलाचा मक्ता सालमजकुरां पासून सांल दरसांल रुा ७५००० पाउण लक्ष करार केले असेत सदरहु प्रमाणें सांल दरसाल सरकारांत पावते करून पावलियाचें जाब घेणे तेणेप्रमाणे मजुरां असेत जाणिजे + छ ४ साबान सुां इहिदे खमसैन मयां व अलफ या खेरीज राजश्री माहादाजी अंबाजी

---

* येथून अक्षराचें वळण निराळें आहे.

यांजबाबत दरसाल साये १५००० पंधरा हजार करार केले असेत पावते करीत जाणें जाणिजे रा छ मजकूर बहुत काय लिहिणे *

०श्री~
राजाराम नर
पति हर्षनिधान
बाळाजी बाजीरा-
व मुख्य प्रधा
न

लेखन
सीमा

वार

---

१६७२ श्रावण शु. ३
१७५० जुलै २५

श्री

*लेखांक. ११

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री बापूजी नीलकंठ कमाविसदार पा सुजालपूर गो यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुा इहीदे खमसेन मया व अलफ मौजे त्रिंगलपुर ता मंगलाज पो मजकूर हा गाव पेशजी वाटणीच्या समई वजा करून रोहिल्यानी आपले तर्फेने राजश्री गंगाधर यशवंत दिमत राजश्री मल्हारजी होळकर यांस दिल्हा आहे. त्याप्रो गांव यांजकडे चालत आहे त्याप्रमाणे तुम्ही मौजे मजकुरास ताकीद करून गांव चालत आल्याप्रमाणे चालवणें तुम्ही नव दीगर न करणे जाणीजे

छ० २ रमजान आज्ञाप्रमाण

लेखन
सीमा

---

* या च तारखेचें बाळाजी बाजीरावानें मल्हारजी होळकर व जयाजी सिंदे यांना लिहिलेलें दुसरें पत्र आहे. त्यांत निराळा मजकूर आहे तो असा–" प्रांत बुंदी व पा नेणवे वगैरे प्रांत मजकूर येथील फडणिसी राजश्री माहादाजी अंबाजी यांस सांगोन वेतन सालीना रुपये ३००० तीन हजार करार केले असेत सरकार मंदल्यां सिवाय साल दरसाल पावतें करीत जाणे "

श्री.

लेखांक १२ १६७२ श्रावण शु. ५
१७५० जुलै २७

० श्री ०
राजाराम नर-
पति हर्ष निधान
बाळाजी बाजीरा-
व मुख्य प्रधा
न

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान तो मोकदम मौजे त्रिंगलपूर तो मंगलाज पा सुज्यालपुर सुा इहीदे खमेसन मया व अलफ मौजे मजकुर पेशजी वाटणीच्या समई रोहिल्यानीं आपले तर्फेने राजश्री गंगाधर येसवंत दिा राजश्री मल्हारजी होलकर यास दिला आहे, त्याप्रों हुजरून करार करून दिला असे. तर मारनिलेसी रुजू होऊन अमल सुरलित देणे जाणिजे. छ० ४ रमजान आज्ञा प्रमाण पत्राप्रो वसुल देणें उजूर न करणें

लेखन
सीमा

बार

---

ले. १३ श्री १६७४ आषाढ शु. ९
१७५२ जुलै ८

राजश्री मल्हारजी होलकर गोसावि यांसि

छ. अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष चिरंजीव दादाची तुमची भेट जाली याचा निष्ठेने कितेक मनसुबे करावयाचा आर्थ लिहिला त्य वरून बहुत संतोष जाला ऐसीयास प्रस्तुत सविस्तर चिरंजीवाचे पत्री लिहिले आहे त्या प्राो फौज जमा करावी आम्ही हि लौकरच फौजेची तयारी करून बाहेर निघतो

ज्यात नफा इमानास उतम त्या प्रो मोगलाचा गुंता उरकून सरकारच्या कामास लागावें दिलीकडील वगैरे मनसुबे ढीग आहेत. यास्तव लौकर फौज जमा करावी म्हणून चिरंजीवानी लिहिले त्या प्रो कर्तव्य ते करूं देशी मराठी फौज आलियावर जमव्हावयास विलंब लावीत तथापि बहुत ताकीद तयारीची करितो छ. ७ रमजान बहुत काये लिहिणे

० श्री
राजा शाहु नर
पति हर्ष निधान
बाळाजी बाजीराव
प्रधान

लेखन
सीमा

---

ले. १४ श्री १६७४ मार्गशीर्ष वद्य १४
१७५३ जानेवारी ३

राजश्री महिपतराव कवडे
गोसावी यांसि

छ. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नों बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद सुां सलास खमसैन मयां व अलफ राजश्री जानोजी ढमढेरे व परसराम सितोले व उदाजी सीतोले याणी हुजूर विदित केले कीं पा बेटावद प्रांत खानदेश येथील तहे करून सनदा पाठविल्या आहेत त्या प्रमाणें घेत नाहीं जाजतीं उपसर्ग लावितात म्हणुन त्या वरून हें पत्र सादर केले असे तरी पुर्वील तहे करून सनदा पाठविल्या आहेत त्या तहे प्रमाणें चालणें दुसरे परगणियांची खंडणी करणें ते गांवगना जीवन पाहून परगणीयांची पाहणी करून जमाबंदी करणें आदा मसाला रोज खुराख व बटा मन माने तैसा घेतात त्यास पहिलें पासून ढमढेरे व सीतोले घेत असतील त्या प्रो घेणे त्यांचा तहे असेल त्या तहे प्रो तुम्ही ही घेणे जाजती उपसर्ग न देणें परगणा उज्याड न होय ते करणें जाणिजे छ २७ सफर

० श्री
राजा शाहु नर
पति हर्ष निधान
बाळाजी बाजी
राव प्रधान

लेखन
सीमा

पो छ २ रबीलाखर
मुा सुलतानपुर.

---

लेखांक १५

शके १६७५
इ. स. १७५३

श्री

यादी कामे निा राजश्री मलारजी होलकर वगैरे सुा आर्बा खमेसन मया आलफ सरकार श्रीमंत राजश्री पंतप्रधान

गुजराथ येथील करार पेशजी जाहला आहे त्या प्रा करार करून द्यावें कलम १

सुरत आठाविसी पैकी एक लाख रुपयेचा माहाल पैकी जयाजी सींदे नीमे नीमे होलकर या प्रो करार कलम १

मोगलाचे किल्यापैकी आसामिया मशारनिले

१ किले चांदवद
१ किले ईद्राई
—
२

दोन किल्याचे हवलदारी मात्र सांगाव्या बरकड बंदोबस्त सरकारातून करावा. कलम १

मोगलाकडील किले घेतलेआहेत त्याज पैकी मातबर किले आहेत ते पांच सात सरकारांत ठेऊन बाकी देऊन मोगलाचा सला करावा सैद लस्कर खान व जानबा यांचा इमाव चितापासून अमच्या वकीलाच्या विद्यमानें करावा कदांचित फिरोन त्याणें लबाडी केली तर आवघी यांसी मिलोन परिछीन बुडवावा आक्रित्रिम जसा राहिले तसा संदेह सोडून करावे १

पा चांदवड येथील किलेजातचा सरंजाम व विठल सिवदेऊ याजकडे कदीम गांव सुा ९ नव आहेत ते खेरीज करून बाकी गांवच्या मोगलाईच्या सनदा दरोबस्त द्याव्या करार कलम १

चांदवडचे गांव दिल्हे आहेत त्याजपैकी येक गांव दीड हजार तनख्याचा सरकारांत ठेवावा १

किलियाचा बंदोबस्त दरोबस्त सरकारांतून चितास येईल तसा करावा कलम १

किल्याच्या जागीरा आहेत त्यास सरकारांतून कमावीस ज्यास सांगणें त्यास सांगून त्याकडून यैवज किल्यास देवावा १

बोराडीचे मल्हारबानी घेतलें ते सरकारांत ठेवावें पवारास न द्यावें. कलम १

खावंदाचे आज्ञेत वर्तावें

कलम.
१

पा ५१ प. ४१

मोगलाकडील राजकारण अगर हरयेक जागा राजकारणे खावंदास सांगोन

गंगाधर येशवंत

१ किले मार्कंडेय येथील सबनीसी

आज्ञाप्रो करणे तर करावी १

राघो लक्ष्मण.

१ देवगाव प्रो नेवासे द्यावयाचा करार पेशजीच जाला होता तो दिल्हा नाहीं सबब हालीं सनद येथून दिल्ही

१ किले राजदेहारच्या किल्याची सुभेदारी.

२

दोन कलमे.

बालाजी बावाजी केतकर याणी दोन-वर्षे धोडपेसाठीं मेहेनत केली सबब यास किले कांचना येथील सबनिसी करार केली कलम १

खंडो मोरेश्वर यासी किले कांचनाचे कारखानविसीची फडनिसी १

बोराडीचे ठाणें सरकारांत ठेवावें मार-निलेकडेही न द्यावे व पवाराकडेही न द्यावे सरकारांत ठेवावें

१ किले रामसेजेची फडनीसी सब-नीसीची.

२

दोन असामिया द्याव्या करार.

रामाजी यादव

१ गांव दीडा हजाराचा पेशजीच्या गावापैकीं

१ किले देहरची फडनिसी

२

दोन कलमे.

विठल सिवदेऊ

१ चांदवड मल्हारकडे दिल्हे त्याचा मुबदला पाटोद्याची कमावीस द्यावी.

करार.

१ किले धोपडची सबनिसी

१ किले कांचना येथील जागीरीची कमावीस

३

---

ले. १६ श्रीमार्तंड शके १६७५

इ. स. १७५३।१७५४

यादी निा राजश्री मल्हारजी होलकर सुा आर्बा खमसैन मयां अलफ

प्रांत गुजराथ येथील करार पेशजी ^जे।ला आहे त्याप्रो हिसा द्यावा सुरत अठावी-सीपैकी येक लाख रुपयांचे माहाल द्याव-याचा करार आहे त्या प्रो द्यावा त्या-पैकीं नीमे जायाजी सिंदे निमे मार नुले याप्राो कलम

सुरत आटावीसांत करार आहे तरीं ला-खाची ध्यावी नाहीं तरीं आटावीसांखेरीज

प्रो चांदवड येथील किलेजातचा सरंजाम व राजश्री विठल सीवदेव यांचे गांव सुमार नवगाव खेरीज करून बाकी गांवची मोगला-ईच्या सनदा दरोबस्त द्याव्या सरदेशमुखी सरकारची सरकारांत आहे त्याप्रो करार करून द्यावे येणे प्रो करार,

मोगलाचे किलापैकीं हवाले मारनुं ल्स

बावाची आठाची जाऊन बाकीपैकी निम्मे मात्र द्यावे
किता चांदवडचे गांव मोगलाई बाब दिल्हे आहेत त्यापैकी येक गाव दीड हजारा रुपयाच्या तनख्याचा सरकारांत ठेवावा. कलम
१

१ चांदवड
१ इंद्राई
२

दोन किल्याचे हवालदारी सांगावी वरकड बंदोबस्त सरकारांतून करावा येणे प्रो करार

सरकारांत दीडा हजाराचा ठेवावा.

बोराडीचे ठाणे सरकारांत ठेवावे. मार तुलेकडेही न द्यावे व सदर पवाराकडेही न द्यावे सरकारांत ठेवावे १
सरकारांत ठेवावे येणे प्रो करार

---

ले. १७ श्री १६७५ चैत्र शु. १५
१७५३ एप्रील १७

राजश्री पिराजी ढंमढेरे बावाळा मुतालीकी किळे चांदवड गो

छ. आखडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर रामराम सुा सलास खमसैन मया आलफ राजश्री विनायक बाजीराव इत [बारीं] जाणून यासि किळे मजकूरची सबनिसी करार करून सागितली आसे तरी सबनिसीचे कामकाज किळे मजकूरचे मशारनिलेच्या हाते घेऊन वेतन रुपये ७०० सातसें देविळें आसेंत नेमणूक येवजी पावणें मजुरा आसेत छ १२ जमादिलाखर हे विनंति+

*
श्री म्हळसा
कांत चरणी त
त्पर खडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर:

मोर्तब
सुद

---

\+ यानंतर ७ रजब रोजीं ' किले राजदेहरची सबनिसी गोविंदराव बाजी यांस सांगितल्याबद्दल ' मल्हारजी होळकरानें किल्लेदारास कळविलें आहे.

* पत्राच्या पाठीवर शिक्का आहे तो असा आहे. यांत ' म्हाळसा ' च्या जागीं 'म्हळसा' आहे व ' चरणी ' या शब्दांतला ' ण ' मोडी वळणाचा आहे.



ले. १८ श्रीशंकर १६७५ वैशाख वद्य १

तीन बंद १७५३ मे १८

सन ११६०

हिसेब ऐवज रा राजश्री तात्या.

इा सके १६७२ प्रमोद नाम संवत्सरे ता चैत्र वद्य १२ शके १६७५ श्रीमुख नाम संवत्सरे

---

रुो

| | | |
|---|---|---|
| २०००० | | गुा मसुकचंद मोतीरामबद्दल. |
| | | १०००० १०००० |
| ५८९५ | | शके १६७३ ऐवज हुंडी औरंगाबाद |
| | ३००० | किता हुंडी रोकड |
| | २८९५ | किता हुंडी अटीची रोकड वजा वटा रुा. |
| | ५८९५ | ३००० १०५ |
| ६९७५ | | हुंडी काळपीची शके १६—( फाटलेले ) |
| | | भाद्रपद सुध १२ |
| ६७९० | | हुंडी रतनजी सुंदरजीची रुपये |
| | | ३००० ४००० |
| | एकूण | सात हजार वजा वटा रुो । रु. दर सदे ३ प्रमाणें रुो. २१० |
| ७२०० | | गुा राजश्री बाळाजी शामराज शके १६७२ |
| | | भाद्रपद शुद्ध ९. |
| | १७०० | किता |
| | ५५०० | किता |
| | ७२०० | |
| ९९०१३।॥० | | ऐवज टोक रामपुराहून. |
| | ६०००० | ऐन मुद्दल |
| | २९०१३॥।० | व्याज मुशारा वगैरे कसर |
| | ८९०१३।॥० | |
| | ५००० | किता कसर |
| | ५००० | किता कसर समाइक कारकून. |
| | ९९०१३।॥० | |

| | |
|---|---|
| २०४ | गुा. खंडोपंत आलिगावकर सके १६७५ |
| १२६०७७॥।० | |
| ७२०० | देणे वेदमूर्ती राजश्री गण+(कागद फाटला आहे)दीक्षित खरे बा। बालाजी शामराज सके १६७२ भाद्रपद सुध ९<br>१७०० किता<br>५५०० किता<br>७२०० |
| १३९॥० | हुडणावळबद्दल. ऐवज कालपी रु. ६९७५ हुडी दर सदे रु. २ प्रमाणे सके १६७२ |
| ९४७५ | देणे सके १६७२ गणेश दीक्षित खरे<br>२५०० किता.<br>६९७५ किता.<br>९४७५ |
| ४००० | देणे रा। गोविंदराव सखाजी सके १६७३ |
| २००० | देणे राजश्री बाजी यसवतबद्दल लग्न सके |
| ३५२७१ | देणे विष्णु महादेव सके १६७४ |
| ११००० | देणे राजश्री सकंभट वेशीकर हस्तें बालाजी शामराज सके १६७४ |
| १०००० | देणे राजश्री गणेश दीक्षित खरे सके १६७४ बा। देणे बुळे. |
| ८०० | देणे वेदमूर्ती रा। खडभट चितले |
| २५०० | हुंडी औरंगाबादेची त्र्यंबक कोंडदेव सके १६७३ |
| ८२३८५॥० | |
| ७११ | राजश्री रामाजी यादव यानीं हुडी केली रुपये पंचेतालीसपैकी रुा. १५००० त्याज बाबद मार निलेकडे यैवज जाजती पडला त्यास प्रा. टोक रामपुरा खुर्द यैवजी कसर कारकुनी पैकी घेतले. |
| ८३०९६।॥० | |

बाकी तागाईत वैशाख वदि. २ मु॥ नायेगाव
रुपये ६२९८१।.

| | |
|---|---|
| १५०० | गु। कृष्णाजी हरी केतकर मिती जेष्ठ शुध १ |
| १०००० | गु। बालाजी सामराज मारफात धोंडजी ( ना ) गुा सर्कभट |
| ० | |
| ५१८॥। | नावे गंगाधर यशवंत भरतीमुळे |
| ७५००० | |

पाउण लाख रुपये गंगाधर यसवत याचे लेहणे रा बाळाजी महादेव बोक याज कडे जाले ते सदरहू पंचाहत्तर हजार बद्दल देणे रा मलाररराव होलकरजीने रां धोंडाजी नाईक नवाले यांचे येथें नासिकचे दुकानीं बा चिटी रा मलारराव यांचे नावे मिती वैशाख वद्य १ शके १६७५ श्रीमुख नाम संवत्सरे मुा नायेगाव फा (र) क झाले असे कोणी कोण्हाकडे राहिले नाहीं चिटी पत्र जावसाल जे आसतील ते परस्परे रद्द आसेत चूकभूल निघेल ते द्यावी घ्यावी हे लिहिले सही

सही ———

---

ले. १९ श्री १६७५ वैशाख व. ९
१७५३ मे २६

राजश्रियाविराजितराजमान्यराजश्री गंगाधर येशवंत स्वामी गोसावी यांसि पोष्य बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशललेखन करणे विशेष मोगलाचा आमचा तह जाहला[1] तेव्हां तुम्ही व राजश्री मल्हारबा होतच जे होणें ते तुमच्या सान्याच्या विचारे च जाहाले ऐसें असतों मागणाचे किले मल्हारबानी व किरकोल लोकानी घेतले त्यास किल्याच्या जागिरा सरकारात जफ्त जाहाल्या तेव्हा किले गावयास काही अगाद आहे ऐसे नाहीं सहजात

---

१ हा तह सलाबतजंग व पेशवे यामध्यें सहा महिन्यापूर्वी [ १७५२ नोव्हेंबर ] झाला होता. व त्याप्रमाणें नगर व खानदेश जिल्ह्यांतील बहुतेक जहागीर व अंमल व पुणें जिल्ह्यापैकीं कांहीं भाग प्रांत जुन्नरपैकीं जागीर पेशव्यास आली. [ राजवाडेकृत पेशव्यांची शकावली पृ. १२७ पहा ]. या मोगलप्रकरणासाठीं मल्हारराव अश्विनापासून पौषापर्यंत [ १७५२ आक्टोबर–१७५३ जानेवारी ] नानासाहेबांच्या बरोबर होता. [ म. इ. सा. खंड ६ पृ. ८६।८७ पहा ].

येतील व आले परतु आम्ही त्यासी करार केला तो करार लटका होऊन आपल्याकडे अंतर येते याजकरिता हे गोष्ट न करणे उचित त्यास किले घेतले तेव्हा इमानास अंतर आले मोगलाचे मनांत विकल्प जाहला तो दूर करून करारावर नजर देऊन आपले वजनाने त्यास किले देऊन तह पका करावा अथवा या गोष्टीवर मोगल न आइके तरी जो विचार करणे तो सारियाने एकमते करून करावा झुजावे मोगल नाहीसा करावा दोहीतून जो विचार करणे तो केल्यासिवाय न जावे आम्ही हि येतो याप्रो मल्हारबास व तुम्हास येक दोन पत्रे लिहिली असता मल्हारबा गेलेच म्हणोन वर्तमान आहे तुम्ही मात्र नासिकाजवळ आहा त्यास आधी तो मल्हारबा जवल असल्यास त्याणीच माघारे लक्ष प्रकारें यावें आणि आम्हीं हि आटा चहू दिवसी पुणियास येता उपरांतीक जो विचार उचित तोच करु जर हे गोष्ट न बनली त्याचे येणे न जाहाले तरी तुम्ही जवल आहा पत्र पावताच काण्हे गोष्टीचा उजुर न धरिता जलदीनें स्वार होऊन पुणियास येणे तुम्हासि या गोष्टीचा विचार आचार बोलणे तो बोलोन तुमची रवानगी केली जाईल तरी सत्वर येणे आम्हीं कुरुंदवाडा नजीक कृष्णाउतरतीरी आलो सौभाग्यवती मातुश्री+ जिजाबाई किरकोळ कामासाठी भेटीस आली एका दो रोजी जातील श्रीमंत् माहाराज मातुश्री आईसाहेबाचा दर्शनाचा अग्रह आहे[२] त्यास त्याणी निखालसपणे कृपा केलिया भेट घेऊन तेथील हि निर्गम एका दो ती रोजात करून लवकरीच पुणियास येतो तुम्हा हि येणे दिरंग न लावणें× तुम्ही सत्वर यावें येथील विचारानुरूप करावे येणेकरून लौकीक उत्तम व चित्तास प्रसन्नता आहे विस्तार काय लिहिणे छ २२ रजब बहुत काय लिहिणें हे विनंति[३]

---

+ कोल्हापूरच्या संभाजी राजाचें कुटुंब.

२ मातुश्री आईसाहेब म्हणजे ताराबाई. हिच्या या वेळच्या उलाढालीचें नानासाहेबांनीं असें वर्णन केलें आहे: "आईसाहेबांचा विचार तरी आमचे न्यून पहातात. सरदारांशी भेदभाद करितात. मोगलाईत राजकारणें करितात. कोणेप्रकारें आमचें वाईट व्हावें या विचारांत आहेत. ईश्वरच आमच्या बऱ्यावर असल्यास त्याणी वाईट इच्छून होणें काय ? व वरकडांनीं डावपेच करून होणें काय ?" [ का. प. या. वगैरे पृ. १२ पहा ].

× येथून अक्षराचें वळण निराळें आहे.

३ या पत्रावरून नानासाहेब पेशव्याच्या स्वभावांतील एका विशेष गुणाचें स्पष्टीकरण होत असून मल्हारराव होळकरावरील फितुरीचा आरोप एका प्रसंगापुरता तरी निराधार ठरतो. श्रीरंगपट्टण, बिदनुर, सावनूर, सोंधे वगैरे ठिकाणची ' खंडणी विल्हेस

( पृष्ठ ३७ पहा. )

ले. २० श्रीमोरया १६७६ आषाढ शु. १३
१७५४ जुलै २

नकल

वेदशास्त्रसपन : राजश्री गणेश दीक्षित खरे स्वामीचे शेवेसी

---

( पृष्ठ ३६ पहा. )

लाऊन ' नानासाहेब परत कृष्णा उत्तरतीरास कुरुंदवाडानजीक आल्यावेळीं हें पत्र लिहिलें आहे [ वाडकृत पेशव्यांच्या रोजनिशींतील मुक्काम पहा ]. मोंगलाशीं तह झाला असून मल्हारबानें त्याचे किल्ले घेतले यामुळें ' इमानास अंतर आले ' या गोष्टीबद्दल नानासाहेबास वाईट वाटत असून त्यानीं ' करारावर नजर देऊन आपले वजनानें त्यास किले देऊन तह करावा व मोगलाचा विकल्प दूर करावा ' असा मल्हारबास सल्ला दिला असें या पत्रावरुन ठरतें; आणि मल्हारबानें त्याप्रमाणें मोगलाशीं परस्पर बोलणें करुन व कांहीं किल्ले परत देऊन मोगलाशीं तह केला. पण हा सर्व कारभार, नानासाहेबानींच लिहिल्याप्रमाणें, परस्पर करावयाचा असल्यामुळें लोकांत गैरसमज उत्पन्न होण्यास कारण झालें. होळकराचे वकील निजामाकडे व निजामचे होळकराकडे जाऊं येऊं लागले व निजाम पेशव्याशीं युद्ध करण्याच्या गोष्टी बोलूं लागला तेव्हां शिंदे होळकर निजामास सामील झाले असावे असा लोकांचा समज झाला. "जानोजी निंबाळकर व हणमंतराव निंबाळकर व चंद्रसेनाचा लेक असे एकमत जाले. पंचवीस हजार फौज जथोन व मोगल असे मिळोन पेशव्याशी बिघाड करावा. त्यांजकडील होळकर व सिंदे वगैरे अगदीं फितव्यात आहेत. अवघ्याचे वकील आले आहेत. होळकराकडे मोंगलाकडून सैफुल्लाखान व मल्हारपंत किंभुवने असे गेले आहेत. होळकर इकडे येणार असें वर्तमान होतें " वगैरे लोकवार्ता उठली होती. परंतु ती खोटी ठरली. कारण मोगलाच्या वकिलानीं मल्हारराव व दादासाहेब यांजकडे सरळ अशी मागणी केली कीं "तुमचा आमचा स्नेह जाला. ते समयीं जो करार जाला त्याप्रमाणें तुम्हीं चालावें. त्या कराराशिवाय दौलताबाद सरकारचे परगणे माणिकपुज, राजदेहर, बेताळवाडी, चाळिसगांव व आणखी एक असे पांच परगणे घाटाखालीं खानदेशचे म्हणोन जप्त टेविले ते व किल्ले नाशिक प्रांत वगैरे दाहा बारा घेतले ते, असे सोडावे म्हणजे तुमचा आमचा अकृत्रिम स्नेह. " तेव्हां मल्हाररावानें उत्तर केलें कीं " ज्यांत तुमचें समाधान (तें आम्हास करणें)" आणि 'आठ किल्ले निकामी होते ते सोडिले. हर्ष व चौंडस, रामसेज व आणखी चार पांच किल्ले ठेविले; व दौलताबादसरकारचे पांच परगणे सोडिले. वस्त्रे देऊन निरोप दिला. इतक्यानें हे ( निजामाचे वकील ) कृतकृत्य होऊन शहरास आले, स्नेह जाला. " ( म. इ. सा. खं. ३ ले. ४३२ व ४३३ पहा ]. सारांश मोगल प्रकरण आवरल्यावाचून उत्तर हिंदुस्थानाकडे जाऊ नये ही नानासाहेबाची इच्छा या वेळीं मल्हाररावानें सहा महिने इकडे राहून पुरी केली असें दिसतें.

विद्यार्थी गंगाधर येशवंत सां नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ताा आशाढ शुध १३ मुा इंद्रप्रस्त दिल्ली जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष स्वामीकडून राजश्री मल्हारराव होलकर यासी खासगत आम्ही देविले बाा चिठी रुा ४२५००० सवा च्यार लक्ष पैकी तुम्हापासी भरणा आदेतुर कमकसर रुा सवा लक्ष जाले आहेत ते सदरहु सवा लक्ष माये राजश्री विष्णु महादेव गदरे यापासी देणे वरकड सवा च्यार पैकी परभारे मारनिलेपासी भरणा केला येकूण कबजे व चिठी तुमची राजश्री सुभेदाराच्या नावची व आमच्या नावची पाचा लक्षा रुपयाची कबजे घेणे आणि सरकारच्या पाचाचा भरणा तुम्हाकडे जाहाला आहे तोही यैवज राजश्री विष्णुपंताकडे माघारी देविला आहे आणि सरकार पाचापैकी राजश्री विष्णुपंतापासी रुा ८२५०० साडे ब्यासी हजार दिले बाकीचा भरणा मारनिलेपासी करणे आणि कबज लिहून घेणे मिती आशाढ शुध १३ शके १६७६ भाव नाम सवछरे बहुत काय लिहिणे हे विनंति

---

ले. २१ | श्री | १६७७ श्रावण शु. ५
११६५ | १७५५ ऑगस्ट १२

राजश्री विष्णु माहादेव गोसावियांसि.

छ आखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्ये श्री सेटयाजी खराडे दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणुन स्वकीय कुशल लिहीत गेले पाहिजे विशेष राजश्री मलारजी होलकर याचे नजाविसी आमचे वकील बाबत रुा देविले रुा १२५००० सवा लाख तुम्हाकडून घेतले ते सदरहु रुा आम्ही वेदमूर्ती राजश्री गणेशभट खरे दिक्षीत यास देविले आसेल सदरहु येवज पावता करून कबज घेणें बहुत काय लिहिणे मिती श्रावण सुध ५ सके १६७७ युवा नाम संवत्सरे हे विनंती

* सो दाजी सामराजास बाजी माणकेस्वर कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी सवा लक्ष रुा चिठी प्रो वेदमुर्ती राजश्री गणेशभट बावास रुो देणे आम्ही येवज येथे घेतला आसे कळावे हे विनंती.

---

* येथून अक्षर दुसऱ्याचें.

ले. २२

श्री.

१६७७ मार्गशीर्ष शु० १
१७५५ डिसेंबर ४




आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान तांहां मोकदम मौजे खरपुडा ता खेड प्रां जुनर सुा सीत खमसैन मया व अलफ मौजे मजकुरीं चुनखडे आहेत ते राजश्री गंगाधर यशवंत याजकडील माणसं येतील लिंबगावच्या घाटास व देवलाच्या कार्यास नेतील त्यास खणून नेऊं देणे मुजाहीम न होणे जाणिजे छ २९ सफर आज्ञाप्रमाण




---

ले. २३

श्री.

१६७८ चैत्र शु० १२
१७५६ मार्च १२




आज्ञापत्र संमस्तराजकार्यधुरंधरविश्वासनिधि राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान तां मोकदम कसबे नेवासें व बहिरववाडी पा मजकूर सुा सीत खमसैन मयां व अलफ कसबे मजकूरचा व बहिरवाडीचा सरदेशमुखीचा अमल पेशजीचे अमल-

दाराकडून दूर करून सालमजकुरी राजश्री गंगाधर यशवंत याजकडे कमावीस सांगि-तली असे तरी तुम्ही मशारनिलेसी रुजु होऊन कसबे मजकूर चावाडीचा अमल सुर-लीत देणे जाणिजे छ ११ रजब आज्ञाप्रमाण

लेखन सीमा

बार

---

ले. २४ श्री १६७८ अश्वीन व. ११
१७५६ आक्टोबर १९

हिसेब कर्ज आमदांन खासगत गुा सुरतसिंग हजरीं शके १६७८ धात नामं संवछरे

| | |
|---|---|
| २००० | मुदल |
| २७६ | व्याज मिर्ती भाद्रपद शुध १ शक १६७७ ता आस्वीन वद्य ९ शके १६७८ पाो माहे १३ रोज २४ दर माहे दर सदे रुा १ प्रमाणे दर माहे २० याो |

२२७६

पैकी वसूल यैवज निसे जवारमल आस्वीन वद्य ९ रुपये २००० बाकी येणे रुपये २७६

सदरहूचा वायेदे रोखा पंधरा दिवसांनी उसणे द्यावे मुदतीस न दिल्हे तरी व्याज येकोत्रा प्राो द्यावे यैसा रोखा लेहून घेतला असे मिति आस्वीन वद्य ११

ले. २५ श्रीलक्षुमी नरसींव्ह १६७८ कार्तीक वद्य १०
१७५६ नोवेंबर १७

चिरंजीव विजयीभव राजमान्य राजश्री गंगाधर येशवंत चंद्रचूड यांसि

प्रति बाजी येशवंत चंद्रचूड आसीर्वाद उपरि तुम्ही आम्ही आजपर्यंत येकत्र राहून संसार केला प्रस्तुत आपले उभयेताची वार्धिक्य आवस्था जाली पुढे मुले लेकरे लाहान मोठी तुमची आमची परस्परे विभांगासाठी आपल्या आपल्या मधे कलह करितील याजकरितां तुम्ही आम्ही बसून ये गोष्टीचा विचार ध्यानात आणून विभाग स्वसंतोषे करून तक्षीमा नव केल्या पैकी पाच तक्षीमा तुम्हांकडें व च्यार तक्षीमा आम्हांकडे घेतल्या वित विषयें नख्त व नग नगोटे भाडेकुंडे येथाविभागें करून करून घेतलें याखेरीज गुरे घोडी उटे हाती व दासदासी सर्व यथा विभांगी घेतली दाणादुणा वस्त्र पात्र वगैर सर्व वस्तभाव येथाविभागे घेतले बायकांचे नग व मुलाचे व खास्याचे नग ज्याच्या त्याच्या आगावर जिकडील तिकडे लागले वतनी समाईक समाईक वारसेली

प्रा खावे पाच साले तुम्हांकडें व च्यार साले आम्हांकडे येणें प्रा लेकराचे लेकरी आनभऊन सुखरूप नादावें याखेरीज इनाम गाव व इनामे जमीन येथील उपद्र होईल ते येथाविभागें तुम्हांकडें पाच विभाग आम्हांकडे च्यार विभाग येणे प्रा आनभऊन खावें पुढे परस्परें लेकराचे लेकरीं आर्थीआर्थी समंध नाही जुनरचे घर वडिलांचे आहे ते निमेनिम तुमचे आमचे पुण्याचे घर व नायगावचे घर कासीचे घर येथाविभागे उपभोग करावा मिती शके १६७८ धाता नाम संवछरे कार्तीक वद्य १० बुधवार बिकलम विनायक बाजीराउ चंद्रचूड+ हे फारखत बाजी येशवत सही लेहून दीधले सही बरहुकूम वाटणी जाबता प्रा भरून पावले हे लिहिले सही

साक्ष

१ लिहिल्याप्रमाणें साक्ष गणेश दीक्षित खरे वस्ती नाइगांव प्रगणें नासीक
[ बालबोध अक्षरें ]

१ पत्र प्रो साक्षे सकंभट वेसीकर प्रो संगमनेर
[ बालबोध अक्षरें ]

१ पत्र प्रो साक्ष सिवाजी विठल जोसी कुलकर्णी मौजे जांब समत निब प्रा वाई

१ पत्र प्रो साक्ष खंडो मोरेश्वर मढ जोगी कुलकर्णी मौजे पिंपलगांव ता खेड

१ पत्रा प्रो साक्ष चिमणाजी खंडेराव मेढ जोगी

१ पत्र प्रो साक्ष खंडो बालाजी कुलकर्णी का कोन्हेले प्रा सगमनेर

१ पत्र प्रमाणे साक्ष दादो माहादेउ कुलकर्णी मौजे साकुर प्रा पारनेर

१ पत्र प्रमाणे त्र्यंबक विनायेक साक्ष धणी हुजूर

१ पत्रा प्रमाणे साक्ष राघो लक्षुमण पुरधे जोसी कुलकर्णी व देसकुलकर्णी का सासवड

१ पत्र प्रा साक्ष विस्णु माहादेउ गबारे

---

ले. २६ श्री. १६७९ भाद्रपद शु. १४
१७५७ आगस्ट २८

यादी दास्त नकला हुंडी पत्रें रवाना राजश्री गणेश दिक्षित खरे याजकडे श्री सुंदर नारायणजीच्या कारखान्यास यैवज रुा २०००० बी तपसील पत्रें ता राहुर्जा जासुद रवाना मिती

१ स्वस्ति श्री नासीक माहा शुभस्थाने श्री सहस्त्रये चिरंजीव विजई भव सदा सुखी राजश्री रघुनाथ नाईक यांसि मेरेट ( हून ) × × × जीनें कृतानेक आशिर्वाद उपरा येथील क्षेम जाणोन तुम्ही आपले स्वक्षेम लिहीत असले पा-

हिजे विशेष श्रीमंत राजश्री गंगाधरपंत तात्या यानी आम्हापासीं रुपये ७००० सात हजार दिधले आहेत त्यास नासिकांत श्रीसुंदर नारायेणाच्या देवालयास कामं लाविले आहे त्यास श्रीमंतास विनंति करून कारखान्याचे उचापत आप त्याकडे लाविली आहे सात हजारासिवाय आनीख कारखानीयास यैवज लागेल तो देत जाणें हिसेब ठीक ठेवणे श्रीमंत ज्यास यैवज देवितील त्याचे विद्यमाने उचापत नीत्यानीं देत जावीं अनमान न करावा बहुत काय लिहिणें हा आसिर्वाद मिती शके १६७९ ईश्वर नाम संवछरे श्रावण शुध १३ मुकाम मेरेट पत्र

सात हजार सिवाय दाहा वीस हजार
उचापत लागेल ते देणे अनमान न करणे

१ स्वस्ती श्री नासीक माहाशुभस्थाने श्रीया सहस्रये चिरंजीव राजश्री रघुनाथ नाईक यांसि दिलीहून धोंडाजी हरबाजी कृतानेक आशिर्वाद उपरी तुम्हावरी हुंडी १ केली राखिले श्रीमंत राजश्री गंगाधरपंत × × × × रोपंत नाना याजपासू × × × ये १२००० अके बारा हजार निमे सा हा ( हाजार ) × × याचे दुणे करून हुंडीची मुदत बधी पौष शुध १ सदरहू यैवज वेदमूर्ति राजश्री गणेश दिक्षित खरे जागे रुपये शाहाज्यानीं पंचमेळ देणे मिती सके १६७९ ईश्वर नांम संवत्सरे भाद्रपद शुध १३ शनवार लिखित धोंडा हरबाजी पत्र

१ पत्र सहस्रायु चिरंजीव राजश्री माणींकराव यासि प्रति बालाजी सामराज आशिर्वाद उपरी येथील क्षेम ताा भाद्रपद शुध १४ रविवारपर्यंत मुकांम दिली येथास्थित जाणून स्वकीयें कुशळ लेखन करणें विशेष तुम्हाकडून श्रीमंत राजश्री गंगाधर यशवंत याच्या कर्जाबाबत रुा १००० एक हजार देविले आहेत सदरहू रुपये ना ( सिकी राा गणेश दिक्षित खरे यासी) ××××××प्रविष्ट करून त्याची ( रसीद आ ) × × × म्हांकडे पाठवणें कसबे नेवासे व दहीगांव रांजणी पैकीं सरकारच्या वराता जाल्या तरी आमच्या आज्ञेखेरीज कोणांस एक कपर्दिक सहसा न देणे कदाचित रुपये दिल्हे तरी गैरमजरा पडतील व तुम्हांस जाब करणें लागेल यांजकरितां आमचे आज्ञेखेरीज एक पैसा कोणांस न देणें सदरहू प्राो हुंडीचा यैवज प्राा करून रसीद पाठवणें सुा समान खमसैन मया अलफ छ १२ जिल्हेज शके १६७९ ईश्वर नाम संवत्सरे हे आशिर्वाद पत्र १

ले. २७ श्री.

१६७९ मार्गशीर्ष शु० १
१७५७ दिसेंबर १२

राजश्री महिपतराव कवडे गोसांवि यांसि

छ. अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो बालाजीं बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जाणें विशेष को तरे येथील जागीर राजश्री माहाराव जानोजी ज(स)वंत निबालकर याची आहे त्यास तुम्ही को मजकुरास रखवालीचा तकादा करितां म्हणोन हुजुर विदीत जालें त्यावरून हे पत्र लिहीले आसे तरी को मारास रखवालीचा तगादा न करणे फिरोन बोभाट येऊ न देणे जाणीजे छ २९ रविलावल सुाा समान खमसेन मया व अलफ बहुत काय लिहिणे







---

ले. २८ श्री.

१६७९ कार्तीक व. ११
१७५७ दिसेंबर २७

यादी दास्तपत्रें ताा वार रवाना माळव्यांत कार्तीक वद्य ११ शके १६७९ ईस्वरनाम संवत्सरे

ताा जयराम सितारामं मेणें वस्ती पंचपहाड

१ भगवंतराव ढमढेरे याचे नावे वरात बालाजी शंकर कमावीसदार प्राा अहोरे यांजवरी जे राजश्री गंगाधरपंत तात्या याजपासून कर्ज लस्करांत घेतलें रुाा २००० हुडणावल दर सदे रुाा ३।। प्राो रु।। ७० व दो हजाराचे व्याज दुवोत्रा प्राो ज्या दिवसापावेतो रुपये परशरामपंतापासीं पावते होतील तेंथपर्यंत हिसेब करून देणे म्हणून पत्र

१ परमाजी ढमढेरे याचे पत्र बालाजपंतास वरांत प्राो मुदल व हुंडण वळ सतर रुाा व्याज दुवोत्राप्राा हिसेब करून देणें

१ परशरामपंतास पत्र जे बालाजीपताकडून यैवज देविला आहे तर त्याजपासून घेऊन उतर पाठवणें उतर आलियावर खत दिल्हे आहे ते माघारे घेऊ म्हणूंन पत्र

३

१ परशरामपंतास खासगत पत्रें

१ त्रिंबकराव कमावीसदार प्रा पंचप्र॥

१ गोविंदराव बुळे

१ दमाजी माहाडीक

१ बानाजी मतकर

१ बानाजी प्रभु

६

९

ले. २९ श्री.

१६७९ मार्गशीर्ष व० ७
१७५८ जानेवारी १

राजश्री मंगतराव ठाणे प्रो दहिवलें
गोसांवि यासी

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्यं श्रों महिपतराव कवडें दडवत सुाासन समान खमसैन मया व अलफ सौभाग्यादि संपन्न मातोश्री जाणकूबाई कदम यांचे वरातें-करिता तुम्हास राहा म्हणोंन सांगितलें असता पुढें गेला ऐशास ऐवज लौकर त्यास पावतें करावयाविसी तुम्हांस रुबरु सांगि-तलें च आहें हाली वरात पाठविली आहें तें घेऊन जासुद पाठविला आहे त्याज-बरोबर आपली च्यार मानसें देऊन जाताच यैवज सुप्यास रवाना करणें दिरंग न लावणें जासूद पाा आहे यांसी खर्चास रुो ५ पांच देणें रा छ २० राखर बहुत कायं लिहिणें

श्री
मार्तंडचर
णी तत्पर आ व-
र्जी कवडे
निरंतर

मोर्तब
सुद

ले. ३०

श्री.

१६७९ माघ शु. १४

१७५८ फेब्रुवारी २१

राजश्री मगदराव ठाणे दंहीवले

गोसांवी यासि

छ॰ अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्य स्नो॰ महिपतराव कवडे दडवत सुा समान खमसेन मयां अलफ देणे देवीसिग शिलेदार नालबंदी रुा २०० दोनसें देविले असेत पाा मार पैकीं साल माारच्या ऐवजी पावते करून कबज घेणे जाणिजे छ १२ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें *







---

ले. ३१

श्री.

राजश्री गंगाधरपंत व आनंदराज गोसावी यांसि अखंडितलक्ष्मीअलंकृत-राजमान्य स्नेहांकित मल्हारजी होळकर दंडवत विनंति उपरि शेट्याजी थोरात येथे आले जामीन मागतात म्हणून सांगितले त्यास लष्करांत आलियावर जामीन द्यावा ऐसा करार जाला तर याची बोली करून नेमलियाप्रमाणें दिढाशा रावताची नालबंदी

---

* अशाच नमुन्याचें पत्र ' गोपालजी रोटकर यास ७० रुपये नालबंदी देण्याबद्दल ' महिपतरावानें मंगदरावास २८ जमादिलावल रोजीं लिहिलें होतें.

पंधरा हजार हो देणें याजला तयार होऊन आले पाहिजे तर लिहिल्याप्रमाणें देऊन आटोपून येत ते करणे छ २४ सवाल बहुत काय लिहिणें

मार्त
वसुद

श्री म्हळसा
कान्तचरणीत
त्पर खंडोजीसुत
मल्हारजी हो
ळकर.

---

ले. ३२ श्री.

पुाा राजश्री गंगाधरपंत गोसांवी यांसी

दंडवत विनंति उपरि बोराडीस मोर्चे लाविले त्याचें वृत तुम्हा[स लिहिले ]च होतें त्यास रायेभांन पंवार + + + राजेश्रि उदाजी पंवार यांजकडे अनुसंधांन लाऊन त्याचे हातूंन येऊन भेटला ठाणें त्याजकडून घेऊन राजश्रि उदाजी पंवार यांजकडे पूर्ववत प्रमाणें दल्हें याप्रमाणें तेथील कार्यभाग विल्हेस लाऊन कुच करून सेंदवियासी आलियां बारा रोज जालें येथूंन आज उद्या कुच करून पुढें जात आसों इकडील निसरसांड करूंन तुम्हीं न राहणें अती सत्वर येऊन पोहचावें बोऱ्हाडीस गु + + जाला तेथून कुच करून सेंद [ वियास ] तुम्हांकारितां आठ दाहा रो-[ ज राहिलो ] तुम्हीं येऊन न पोहचला का + + + चिंतांत आणूंन यावयासी दिरंग लावितां ये गोष्टीचा भावगर्भ कलत नाहीं येथ दाहा रोज वाट पाहेली उदईक कुच करूंन दरमजल चालिलों कोठ परियेत तुम्हांस ल्याहावें लेहता सीनलों आमचें मानस कीं तुम्हीं जलद येऊन पोहचावें याउपरि तुम्हांस जें उतम दिसेल तें करावें विस्तार कोठवर लेहावा छ १९ रजब बहुत कायें लिहिणें हे विनंति

मोर्त
वसुद

---

ले. ३३ श्रीमोरया.

वेदशास्त्रसंपन्य राजश्री गणेश दीक्षित पौंड्रीक खरे स्वामीचे सेवेसी विद्यार्थी गंगाधर यशवंत कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशळ ताा भाद्रपद

वद्य २ मुा सेधवे जाणौन स्वकीय कुशललेखन करीत गेलें पाहिजे विशेष स्वामीनी दोन च्यार पत्रे पाठविली ती पावोन सविस्तर अर्थ आवगत जाहाला यानंतरी स्वामीपासून राजदेहरच्या मुकामीहून स्वार जाहालों ते दैवीयोगे व तुमचे आशिर्वादेकरूनं श्रीमंताचा व राजश्री सुबेदाराचा सारख्याचा प्रसंग उत्तम रीतीने जाहाला उपरांतीक अवरंगाबादेच्या येवनाचा सख्याचा प्रसंग हि येथें तुमच्या च आशिर्वादेकरूनं उत्तम संपादून दिल्हा दक्षेणेच्या सख्याचा योग श्रीने चांगला केला येवंच सर्व हि स्वामीच्या आशिर्वादाचें यश आहे तेथें विस्तारे काय ल्याहावें अधिकोतर कृपा आसिर्वाद देणार स्वामी समर्थ आहेत खासगत भरणीयाचा प्रसंग देणियाचा नेमणूंक केली आहे त्याप्रमाणें निर्वाह करून पाठवितो काहीं चिंता न करावी मौजे देवळाली पा नाशीक मुबदला पेशजी गांव श्रीमंतानी आमंचे घेतले होते त्या यैवजी कृपाळू होऊनं श्रीमंतानीं इनाम करूनं दिल्हा त्यासि नाशकाहूनं स्वार जाहालो ते समई राजश्री शिवराम कृष्णं यानी वचनास गोविलें की दैवयोगे हा गांव जाहाला तरी खासगत मजकडे कमाविसीस सांगावा यैसे श्रीगंगातीरी वचनं घेतले तेव्हां गुंतलो होतों कर्मधर्मसंयोगे स्वामीच्या आशिर्वादे योग घडोनं आला तेव्हां वचनं सांभाळिलें पाहिजे यास्तव त्यांकडे सनंदा पाठविल्या आसेत परंतु आम्हांस जे करणे ते स्वामीस श्रुत करावे ऐसियासि सर्व गोष्टी स्वामीच्या आज्ञेच्या आहेत आम्हांस तो स्वामीच्या आज्ञेखेरीज दुसरे जाणंत नाहीं सर्व करणें ते स्वामीचे असे विस्तारे काय लिहिणें स्वामीने पां चांदवडचे मजमू फडणिसीविशीं लिहिले तरी श्रीइच्छेनें मजमू अथवा फडणिसी करूनं पाठवितौ वरकड श्रीमंताकडून येखादा ग्राम करूनं घ्यावा हा संकल्प आहे श्रीइछेने आहे तो प्रसंगोचित श्री घडवील येथें च श्रीमंत् राजश्री दादास्वामीकडे लगट करावा परंतु हे येथें कोंडीताती यास्तव्य बोलून ठेविलें आहे स्वामीच्या आशिर्वादें करून स्वारी उतम*

---

श्री. १६७५ चैत्र शु. १३

ले. ३४ १७५३ एप्रील १५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरपंत तात्या राजश्री रामाजीपंत आबा स्वामीचे सेवेसी

पोष्य गोविंद[1] बलाल कृतानेक सां नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता चैत्र शुध त्रयोदशी जाणून स्वकीयें लिहित असले पाहिजे विशेष इकडील सविस्तर वर्तमान पेश

---

* हें सर्व पत्र गंगोबा तात्याच्या हातचें आहे. याचा पुढील बंद गहाळ आहे.

1 गोविंद बल्लाळ खेर झाशीवाले = गोविंदपंत बुंदेले.

जीचे पत्रीं आपणास लिहिले च आहे त्याजवरून कलले च असेल हली वर्तमान दिले-मंधे वजीरासीं व सार्वभोमासी कांहीसा कजीया जाहला म्हणून या प्रांती वर्तमान बहुत उडाले आहे दिलीमधे फिसाद जाली म्हणतात ऐसीयासी आपले येणे सत्वर या प्रांतीं होईल तर उत्तम आहे सर्व दबतील नबाब अहमदखान पठाण यानीही फौज-बंदी केली आहे वजीराची जागा इटाये फर्फुद येथे ठाणी बसवून आमच्या जागीयासी कजिया करावयाचा विचार दिसतो त्यास येक पत्र अहमदखानास पाठवावे कीं वजी राची जागा व आमची जागा आहे तेथे तिलमात्र उपद्रव न देणे न बोलणे म्हणून त्यांस पत्र पाठवावे आणि आपण ही यावयाचा विचार सत्वर करावा येथून हुंडी औरंगाबादेची शाहातर हजारांची हली करून पाठविली आहे तो यैवज सरकारी पावेल याचप्रमाणे शाहातर हजाराची हुंडी करून राजश्री जायाजी आपा सिंदे सुभेदार यांजकडेही पाठविली आहे * वरचेवर वर्तमान मागाहून लिहित जाऊन आपले आज्ञेप्रमाणे चिरंजिवाने पुणेयात यैवज देविलात त्याप्रा त्याणी दिल्हा वहुत काय लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंति

---

ले. ३५ श्री.

राजश्री महिपतराव कवडे गोसावी यासी

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीणे विशेष रा सदासीव मोरेश्वर गोले यास बाबतीचे महालचीं मजमु पेशजीप्रमाणे करार करून पाठविले असेत तरी याजपासून बाबतीचे माहालानिहायेचे मजमूचे प्रयोजन घेऊन वेतन सालिना रुपये

---

२ भारतवर्षातील ऐतिहासिक पत्रे यादी वगैरे लेखांक ५० पहा. या वेळीं (कमर-दीखानाचा मुलगा ) खानदाना ( गाजुदखिानाचा पुत्र ) इमादनमुल्क व खानदौरा-नचा पुत्र यानीं वजीरास कैद करण्याचा विचार ( बादशहाच्या सल्ल्यानें ) केला होता. परंतु हा बेत वजीरास मलकाजमानीमार्फत ( ही बादशहाची सावत्र आई ) कळला. तेव्हां त्यानें सैन्याची तयारी केली. या वेळीं दिल्लीस अंताजी माणकेश्वराची फौज बादशहाच्या संरक्षणार्थ होती. परंतु तो वजीराशी देखील समेटाची भाषा बोलत होता. हें दुटप्पीपणाचें धोरण पेशव्यांचा वकील बापूजी महादेव हिंगणे यांस पसंत नव्हतें. या वेळीं दादासाहेब व गंगाधर यशवंत चंद्रचूड गुजराथेंत अहमदाबाद सर करण्यांत गुंतले होते. तें काम संपतांच त्यानीं उत्तरेस यावें असें या पत्रांत गोविंद-पंत बुंदेल्यानें सुचविलें आहे. त्याप्रमाणें दादासाहेब अजमीर घेऊन उत्तरेकडे गेले होते.

* खाशाचे अक्षर.

७५० खासा
६५ आत्फागिरा
४४ दिवट्या.

८५९

येकूण आट से एकुणसाठ रुपये करार केले असेत सदरहूप्रमाणे ऐवज पावित जाणे तुम्हास मखतयांत मजुरा दिल्हा जाईल सदरहू ऐवज अखेर हप्त्यापैकी देणें जाणिजे छ १६ रबिलाकर बहुत काय लिहीणे +

० श्री ०
राजा शाहू नर
पती हर्ष
निधान बाळाजी
बाजीराव प्रधान

लेखन
सीमा

पो छ २१ माहे रबिलाखर मुा आजणुज

---

ले. ३६ श्री १६७८ माघ शु. ७
१७५७ जानेवारी २७.

बाळाजी बाजीरावाचें महिपतराव कवड्यास पत्र—

पा सिराढोण प्रां बालाघांट राजश्री बाबूजी नाइक यांजकडे दिल्हा असे तेथील बाबती हुजूर विल्हे लाविल्या आहेत तुम्ही पा मारास बाबतीच्या यैवजाविशीं उपसर्ग न लावणें हरयेकविशीं पा मारचे साहित्य हरयेकविशीं करीत जाणे जाणिजे छ ६ जमादिलोवल बहुत काय लिहिणे

० श्री ०
राजा शाहु नर
पति हर्ष निधान
बाळाजी बाजी
राव प्रधान

लेखन
सीमा

पौ छ ८ जमादिलाखर मुा खाडगी
पा बारशी सन सबा

---

ले. ३७ श्री.

नकल

राजश्री महिपतराव कवडे गोसावि यांस

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करणे विशेष मार्गेश्वर पोष दो महिनीयात मामलतीचा बंदोबस्त करून उपरांती चाकरीस यावे ऐसा करार असता नेहेमी तुम्ही परगणीयातच राहिला परगणीयाचा बंदोबस्त करणे तो केलाच असाल चिरंजीव राजश्री दादाकडे निकडीचे काम पडीले आहे तरी तुम्ही मामलतीच्या कामास येक शाहाणा माणूस दोन तीनशे राऊत देऊन वरकड तुम्ही आपले कुल फौजेनसी चिरंजीवाकडे जाणे तुमचे लोक तुम्हा जवल जमा जाले च असतील तरी लौकर जाणे जाणिजे छ २० साबान बहुत काय लिहिणें

लेखन
सीमा

पो छ २ सवाल

---

ले. ३८ श्री.

बाळाजी बाजीरावाचें महिपतराव कवड्यास पत्र—

विशेष आवरंगाबादेस गडबड जाली आहे त्यास तुम्ही आहा तिकडील जरफी करावी लागेल तरी तुम्हीं हुजूर येणार ते न येणें तेथे च तूर्त राहाणे मागाहून तुम्हांस लिहून पाठऊन त्या प्रो करणे. चहू कडील बातमी राखून वर्तमान लिहिणें + जाणिजे छ १२ जिलकाद बहुत काय लिहिणे

श्री०
राजा शाहु नर
पति हर्ष निधान
बाळाजी बाजी
राव प्रधान.

लेखन

पो छ २६ जिलकाद
मुा मालेंगाव नजीक
जिंतुर

---

+ येथून अक्षर खाशाचें.




ले. ३९ श्री १६७९ फाल्गुन वद्य ५
१७५८ मार्च २९

राजश्री मंगदराव ठाणें दंहीवले गोसांवी यांसि

छ अखंडित. लक्ष्मीं अलंकृत राजमान्य. स्नो महिपतराउ कवडे दंडवत सुा [1]मान खमसेन मंयां अलफ को दंहिवले येथील रघुनाथ पाटील व अबाजी पाा व राजा पाा याणी हुजूर येऊन वर्तमान विदित केलें की कोा मजकूर येथें सालमजकुरीं नापीक जाहलें आहे रयात जालियां रयत तजावजा होणार नाहीं पुढे उमेदीने लावणी करार वाके करितील म्हणोन त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिलें आहे तरी सालगुदस्तांच्या आकारापैकीं सालमजकुरीं तकुब रुा ६०० साहासें ठेऊन वरकड वसुल घेणें आकार-सालि तुम्ही व पाटील हिसेबाचे समई याल तेव्हां वर्तमान मनास आणून कर्तव्य तें केलें जाईल जाणिजे छ १९ रजब बहुत काय लिहिणे हे विनंती

सालगुदस्ता येथून आम्ही करार करून दिल्हा त्याची वाटणी कायावरी घातली त्याप्राा कााकरानीं वसुल दिल्हा यैसे आसून तुम्ही पाटलास बसवून आठाश्ये रुाचे खत घेतले त्याजवरून पाटील परागधा जाले गावावर आले नाहीत साप्रत पाटील येथे आले त्याजवरून याचे समाधान करून पाठविले आसत तर याचे खत तुम्ही जमा-मेच्या करार खेरीज घेयाचे प्रयोजन काय तर तुम्ही पैकीयाचा तगादा न करणे आण तुमचा याजकडे कोणे बावतीचा आहे तो हिसेब येऊन आम्हास समजावणे तुमचा पैका माल वाजवी असेल तो उरुवरु मनास आणून देविला जाईल वाजबी तफरीक याजकडे जमीदार घालतील तो देतील तुम्ही जाजती उपद्रव न देणे फिरोन बोभाट येऊ न देणे बहुत काय लिहिणे

---

ले ४० श्री १६७९ फाल्गुन शु. १३
१७५८ एप्रील ६

राजश्री महिपतराव कवडे गोसावी यांसि

छ. अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराउ प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष परगणें थालनेंर प्रांत खानदेश येथील सरदेशमुखीची फडनीसी पेशजीपासून राजश्री बामनाजी माहादेव निा राजश्री माहा-दाजी आंबाजी याची आहे. तेणे प्राो सालमजकुरी करार असे याचे हाते पाा मजकुरी फडनिसीचे प्रयोजन घेऊन यासी वेतन पेशजी अडीचशें रुा होतें त्याचे निमे साल मजकुरी रुा १२५ सवाशे करार केले असेती सरकारचे यैवजीं पावते करून पावली

---

1 येथून अक्षर दुसऱ्याचें आहे.

याचे कबज घेणे. तेणे प्रमाणें मजुरा पडंतील जाणीजे छ २७ रजबु सुा समान खमसेन मया व आलफ बहुत काय लिहिणें







बार

---

**लेखांक ४१** **श्री** १६७९ फाल्गुन वद्य २
१७५८ एप्रील २६

राजश्री मंगदराव ठाणे दहिवले गोसावी यांसी

छ. अखंडित लक्ष्मीं आलंकृत राजमान्य स्नों महिपतराव कवडे दंडवत सुा समान खमसेन मंया अलफ राजश्री राघो केशव व राजश्री बावाजी राम यांची वरात तुम्हावर केली आहे त्यास सदरहू वरातेचा ऐवज मशारनिलेस पुणीयास राजश्री दीक्षितांचे दुकानी पावता करून देणें वरकड पैका नेमणुक प्रमाणे पुणीयास निकडीने लौकर पावता करणें जासुद जोडी पाठविली आहे यांसी खर्चास रुपये ४ चार देणे जाणीजे रा। छ १६ रजब







---

ले. ४२ श्री १६८० वैशाख शु. ५
१७५८ मे १२

राजश्री महिपतराव कवडे गोसावि यांस

छ. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्हाकडे प्रांत खानदेश येथील साल गुदस्त व साल मजकुरचा सरदेशमुखीचा ऐवज येणे त्यापैकीं देणे राजश्री हरी दामोदर पथक यास नालबंदी समजावीस पैकीं तूर्त सो १६१०९ सोला हजार येक से नव देविले असेत पावते करून कबज घेणे जाणीजे छ ४ रमजान सुा समान खमसेन मया अलफ

बार

---

ले. ४३ श्रीमोरया.

नकल. १६७९ माघ व. ७
१७५८ मार्च २

राजश्री वर्तमान भाविक कादार व लेखक मौजे सिधटेक पा
पोडपेडगांव प्रा कडवली गोसावि यासी

छ अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो गंगाधर येशवंत नमस्कार व आसीर्वाद सुहूर सन तिसा खमसेन मया व अलफ हरिभक्त परायेण राजश्री विठल जीवराम परांजपे गोत्र विष्णुवर्धन सूत्र आश्वलायेन हरिभक्त यास्तव मौजे मारी ईनाम जमीन मोगलाई व स्वराज्य देखील सर देशमुखीच्या आमलाची जमीन विघे साठ करार करून इनाम दिल्हा आसे तरी आवल दुम सीमप्रतीची जमीन मारनिलेचे दुमाला करून चतुसिमा करून यासी व याचे पुत्रपौत्रादी वंश परंपरेने चालवणे प्रती वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची नकल करून घेऊन असल पत्र भोगवटीयास परतोन देणे जाणीजे छ. २१ जमादिलाखर बहुत काय लिहिणे
मोर्तब

---

ले. ४४ श्री.

१६८० आषाढ शु. ६
नकल १७५८ जुलै ११

चिरंजीव राजश्री कृष्णराव बापु यास प्रती सदासीव गंगाधर आसीर्वाद उपरी तीर्थरुपानी आज्ञा केली कीं श्री सुंदर नारायेणास वस्त्रे पाहिजेत त्यास बादली वस्त्रे व चिकंदोजी घरच्या सनगा पैकीं व यंदाचे स्वारीपैकीं बादली सनगे भुक्त नसतील ती पाठवून देणे म्हणोन सांगितले यास्तव तुम्हास लिहिले आसे तरी जामदार

खान्यात शोध करून बादली व चिकंदोजी आस्तील ती पाठवून द्यावी बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद राजकीय वर्तमान येकदां खास बारदारा बराबर लिहिले होते त्यावरून कळले आसेल आलीकडे फारसे नवीन नाही मागाहून होईल वर्तमान ते लेहून पाठऊ हे आसीर्वाद

सनगे पाठविली बिा

५ सिलकेपैकी

२ चिरे.

१ भर बादलीदार

१ नीमे बादली

२

१ पटका घडीदार

१ बादली जामेवार

१ बालांबरी

५

१

६ चिकंदोजीस्वारी बाा

मिती आषाढ शु ५६ शके १६८०

तीाा सोवती मातुश्रीबाई वडिलाचे सेवेसी सां नमस्कार चिरंजीव बापुस लिहिले आहे त्या प्रो सनगे आस्तील ती पाठवूनद्यावी हे विनंती

---

ले. ४५ **श्रीशंकर.** १६८० आषाढ व. १
१७५८ जुलै २१

तीर्थस्वरूप राजश्री गंगोबा तात्या वडिलांचे सेवेसी

आपत्ये समान रामचंद्र कृष्णराव साष्टांग नमस्कार सुहुरसन तिसा खमसेन मया आलफ प्राा: आगरे येथील मुजमूचे वेतन रुपये ३५०० साडेतीन हजार श्रीमत् राजश्री दादासाहेब याणी रुपराम कटारी दिमत सुरजमल जाट त्याजकडून देविले सन खमस खमसेन मया अलफ बाबत ते सदरहु रुपये केसो गोपाल कारखाना घाट श्री व्रदावन याजकडे तुम्ही जमा करविले होते ते रुपये वेदमूर्ती राजश्री संखभटजी वेसीकर याचे विद्यमाने साडे तीन हजार भरून पावलो मुकाम नजीक मालपुरा प्राा: जयेनगर मिती आशाढ वद्य प्रतीपदा सके १६८० वहुधान नाम सवत्सरे बहुत काय लिहिणे हे विनंति

साक्ष खंडो बचाजी कुलकर्णी
का कोऱ्हेले प्रा संगमनेर                                    रामभट सुदामे

---

ले. ४६                    श्री.                    १६८० अश्वीन शु. १
१७५८ आक्टोबर ३

राजश्री बजाजी पोवार गोसावी यांसी—

छ अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो सटवाजी राजोळ मुा रणथबोर रामराम उपरी सुा सन तिसा खमसेन मया अलफ जाणून स्वकीये कुशल लेखनकरण या नंतर रा तात्याची पागा तेथ राहावयासी येतील तर त्यास गढीमधें जाग देऊन ठीणाची ( ठिकाणाची ?) बेबूध करणं जंवर रानात गवत मिले तंवर आणवणं न मिले तेव्हा आपले गंजीतून देण चाऱ्या लाकडाचा बोभाट न ये तसं करण गवत दरसाले कापिता त्याजहून चालीस पनांस हजार जादा काठीवण जंवर पागा राहे तंवर गवत पुरवणं घाले लाकडाची आबाल होऊ न देण त्यास वीटबिगार लागेल ते सुतार चांभार वगैरे जे फरमास लागल ते देत जाणं कोन्हे गोष्टीचा बोभाट येऊ न दीजे बहुतकाय लिहिणे रा सन छ २९ माहे मोहरम

श्री म्हाळसा-
कांत चरणी त-
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो-
ळकर

मोर्त-
बसुद

---

ले. ४७                    श्री                    १६८० पौष व. ९
१७५९ जानेवारी २२

राजश्री महिपतराव कवडे गोसावी यांसि

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराउ प्रधान आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष पेशजी सर्व मामल्यावर कर्ज पटीचा करार मदार होऊन ज्याचा त्यांणी ऐवज सरकारात दिल्हा तुम्हाकडील सरकार नांदेड याजवर कर्ज पटीचा करार मदार जाहला नव्हता सा हाली कर्ज पटी रुपये ५००० पाच हजार करार करून हे पत्र तुम्हास लिहिले असे तरी सदहू ऐवज

लिहिल्या प्रो सत्वर सरकारात पाठऊन देणे विलंब न लावणे जाणिजे छ २२ जमादिलावल सुहुर संन तिसा खमसैन मया व अलफ बहुत काय लिहिणे







---

ले. ४८ श्री. १६८१ आषाढ व. ५
१७५९ जुलै १४

राजमानश्री कमाविसदार दि+

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुा सितैन मया व अलफ कसबे व्याहामाडवे व मौजे हिंवरे पा अंबड येथील मुकासा तुम्हांकडून दूर करून सालमजकुरीं राजश्री गंगाधर यशवंत दिा राजश्री मल्हारजी होळकर याजकडे इनाम दिले असेत तरीं तुम्ही सदरहू दोन्ही गावी दखलगिरी न करणे जाणिजे छ १८ जिल्काद आज्ञा प्रमाण

बार.




+ येथें एक ओळीची जागा रिकामी ठेवली आहे

---

ले. ४९ पुा ३ १६८१
१७५९ नोव्हेंबर ( अजमासे )

विज्ञापना भरत नाहीं म्हणतात नजीबखानाचे पारपत्य जालियावर त्या प्रांती सर्व च जाऊं या प्रकारचे इकडील वर्तमान सेवेसी श्रुत व्हावे म्हणून यथंभुत लिा असे आपले आज्ञापत्र इंदूरचे मुकामीहून आले त्यांत आज्ञा लिहिली कीं तुम्ही अटकपर्यंत बंदोबस्त केला परंतु सरकारात पैसा पाठविला नाही यैइयास पैका जो आला तो राा साबाजी पाटलानीं घेतला आम्हास राा जनकोजी बावांचे पत्र

+ येथून पुढील बंद गहाळ झाला आहे.

आणून दिले की तुम्ही पोटापुरता रोजमरा मात्र घेगे वरकड आम्ही व सुभेदार समजोन घेऊ आम्ही बखेडा करावा तरी सरकारकामात खलेल होईल म्हणून त्यांच्या लिहिलेप्रमाणें वर्तनुक केली हे वर्तमान साद्यंत दर्शनांती सेवेसी निवेदन करूं यांच्याणे त्या प्रांताचा बंदोबस्त करवत नाही आपण आलियाखेरीज तिकडील बंदोबस्त होता दिसत नाही आम्ही येथे रहावें किंवा आपणापासी यावे हे आज्ञापत्री लिहावे त्याप्रा वर्तू स्वामीस या प्रांती यावयासि दिवसगत लागेल किंवा सत्वर आगमन होईल हे लिहावे आम्ही कितीक दिवस येथें बसून रहावे आपली आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तनुक करू सावाजी सिंद्याने आमचे काही चालू दिले नाही याजमुळे खावंद काय म्हणतील हे न कले लक्ष्मीनारायण येथें आला आहे त्यास रुपयांचा तगादा आम्ही फार केला परंतु तो म्हणतो हुजुर च मी रुपयांची निशा करून देईन गिलच्या अद्याप लाहोर प्रांतीं च आहे पंचवीस हजारा फौजेची खबर आहे. हटाल्यापर्यंत त्याचा प्रवेश जाला येंगे वर्तमान आहे आम्ही +

---

ले. ५०  श्री.  १६८१ माघ व. ७
१७६० फेब्रुवारी ८

श्रीमंत राजश्री सदासीव पंत आन्या स्वामीचे सेवेसी

स्नो बापूजी महादेव सांा नमस्कार व सेवेसी मल्हारजी हवालदार दडवत विनंती येथील वर्तमान ताा छ १९ जमादिलारवर पर्यंत येथास्थीत आसे विशेष श्री जेजुरी येथील तळ्याचे कारखानियास कुसाजी कासार याजकडून दाहा हजार रुपये देविले पैकी हाजार रुपये पेशजी कारखान्यास पावले बाकी रुपये ९००० नउ हजार राहीले त्याचा वाईदा करून आपण कागद लेहून घेतला आहे त्यास वाइदीयाचे रुपये २००० रामजी मोरो याजबाा पाठविले ते पावले सदरहू दोन हाजार रुपये कारखानीयाकडे जमा असेत सके १६८१ प्रमाथी नाम सवत्सरे माघ वद्य समसी मुाा सन सीतेन मया आलफ बहुत काय लिहीणे लोभ असो दीजे हे विनंति

---

ले ५१  श्री.  १६८२ अ. श्रावण शु. ११
१७६० जुलै २३

राजश्री मल्हारजी होलकर गोसांवी यासिं

आर्सीर्वाद उपरि नजीबखानाचें भेटीचा माार सागोंन पाा तों विदित जाहाला त्यास आम्हाकडें दोन तीन राजकारणें तयार जाहाली आहेत* त्याज आलीकडे आला तरी उतम नाही तरी आमचे लोक आत मिरल्यावरी मग आमचा इलाज नाही त्याज आलीकडे तुम्हापासी आथवा

---

+ येथून पुढील वंद गहाळ झाला आहे.
* येथून अक्षराचें वळण निराळें आहे.

आम्हापासी आला त्याची खबर आम्हास कलली तरी मग आम्ही हला करणार ना + + + + + मचा हला जाहल्यावरी आम्हाकडे ( दोषना ) हि सविस्तर आपाजी राम व भिकाजी गंगाधर कृष्णाजी केशव याणी सागितल त्याची उतरे सविस्तर या जवल बोलतो आहो जाणिजे छ १० जिल्हेज हे आसीर्वाद[1]

---

ले. ५२ श्री.

१६८३ मार्गशीर्ष शु० ३
१७६१ नोव्हेंबर २९




अज स्वारी राजश्री महीपत राव कवडे दीा राजश्री पंत प्रधान ताा मोकदमानी मौजे पोखर्णी पाा सेवगांव सुहुर सन इसने सितेन मया अलफ प्राा मजकुरी फौजेचा मुकाम जाला असे तर पाटील पाडे देखत चिठी हुजुर भेटीस येणे या कामास स्वार पाठविले यासी मसाला रुाा ५० पनास अदा करणे. *जाणीजे छ १ जावल

बार.




---

१ हें पत्र सदाशिवराव उर्फ भाऊसाहेब याणीं पाणिपतच्या मोहिमेवर असतांना दिल्लीस वेढा दिल्यावेळीं लिहिलें आहे असें वाटतें. या अंदाजावर या पत्राची तारीख ठरविली आहे.

* येथून अक्षर खाशाचें.

ले. ५३ श्री.

नकल

राजश्री तात्या स्वामीचे शेवेसी

विनंति उपरी आपण पत्र पाठविलें ते व कितेक प्रकार रामकृष्ण रायानी सांगितलें त्यास आपणासी दुसरा विचार नाहीं राजश्री सुभेदाराकडील सालजाब ही मार निल्हेजवल सांगितले आहेत प्रस्तुत शह जवल आला यास्तव कोणेविसी अनमान नकरितां मोज्या मजलीनें येऊन पोहचावे मोगलाकडलि बातमीची पत्रे आली ती बजीनस कृष्णरायानी पाहिली मनसबा केल्याने होतो आपण व सुभेदार आल्यानें सर्व येश सुभेदारास येतें त्वरेनें यावें काडीपरी अनमान न करावा मोठी समय आहे दौलत रक्षावी यात च उत्तम आहे मोगलाचे प्राबल्य जाल्यास परिणाम कसा हेही आपल्यास कळतच आहे विस्तरल्याहावेसे नाहीं श्रीमंतास घेऊन यावें आसा विचार केला होता परंतु दाटी जाली यास्तव बनलें नाहीं तरी सुभेदार कांहीं परकी नाहींत वडीलपणे या वेळेस येऊन ( फा० ) संरक्षण कर्णे हे च त्यास योग्य आहे लक्षा पत्राचे (जागा) पत्र मानावें बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंति

---

ले. ५४ श्री.

१६८४ फाल्गुन शु. ८
१७६३ फेब्रुवारी २१

यांद राजश्री मल्हारबाकडील कामे

मारानिलेस उभयतास श्रीमंताची स्वदस्तुरे पत्र २

मोगलासी बिघाड करणें तेव्हां मोगल बुडवावा तेव्हां मल्हारबास जागीर नेमून देवावी व

प्रा आड.
कीता माहाल

१००००००

दाहा लक्ष

बशेर्त मोगल बुडवावा मल्हारबा सला करून देणार नाहींत याचा करार असावा

गंगाधर येशवंत याचे गांव जफ्त आहेत. त्याच्या सोडचिठ्या देवावे १

किले चांदवडचे ताकीदपत्र इनामी गांवची १

फडनिसी सनद दिली पाहिजे गंगाधर पंतास

नांवाची पत्रे व गंगाधर येशवंतांच्या गावच्या सोडचिठ्या दाहा लक्षाची जाहगीर आंबाड सुधा वशर्त मोंगल बुडाल्यास द्यावी किले चांदवडचे ताकीद पत्र व फडनिसीची सनद गंगाधर येशवंताचे नांवें–येणे प्रोा पत्रें व सनदा देवाव्या मुख्यत्वे करून जानोजी भोसले यांनीं मोगलासी सलूख केला म्ह-

छ. २ साबान फालगुन
सु॥ सलास सि-
तेन मु॥ मिरज

णून आम्हांस मनसबा प्रा-
प्त जाला पुढें भोसल्याची
रदबदली करू नये

येणे प्रो करार करावे म्हणून सदरहु प्रो पत्रे द्यावी * देणे तूर्त पत्रे द्यावयाची नाहींत सदरहु कलमें करार मल्हारबासी व गंगोबासी बोलून करार जाहल्यावरी सदरहु पत्रे दिल्ही जातील सदरहू कलमे पांच करार होतील येणें प्रमाणें करार रुजू

पैकी तुर्त आंबाडीचे जप्तीची
सनद द्यावी देणे रुजु
दुमालेगांव वजा करून द्या-
वी देणे रुजु
सप्तमीची सनद दिली छ. ७
सावान सन सलास सितेन
फालगुन.

---

ले. ५५

गंगाधर यशवंत यान्चे राघोकृष्ण कादार मौजे दहींगाव राजणी प्रा नेवासे यास पत्र

सु॥ इसने सितेन मयां अलफ मौजे मजकूरपैकीं साल मजकूरचा यैवज रुा ५०० पाचसें सरकारपोत्यास जमा आसेंत मुकाम सदणे ता पावळ येथे सरकारांत जमा आसेत छ० ९ माहे शाबान

ले. ५६ श्रीमोरया १६८४ कार्तीक शु. १
१७६२ आक्टोबर १८

पैवस्ती कार्तिक सुध ७
तीर्थरूप सौा मातुश्रींबाई वडिलाचे सेवेसी

अपत्ये सदासिवाने चरणावर मस्तक ठेवून साा नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ताा कार्तिक शुध पावेतों मुकाम नासिकचे येथें सुखरूप असो विशेष वडिलांची

---

* येथून अक्षर दुसऱ्याचें.

आज्ञा घेऊन स्वार जालो त पारमेर लोणी करून चांदवडास गेलों तेथे फौजेच्या बोल्याचाल्या करावयासि आठ दाहा दिवस राहून बोलवा करून अर्धे लोकांस नालबंदी देऊन आस्वीन वद्य १३ त्रयोदशीस नाशकास आलों श्रीमंताची भेट जाली श्रीमंतानी आज्ञा केली कीं कार्तिमा पौर्णिमा जालिया दों दिवसानी मुहूर्त करून चालतों येसी आज्ञा केली त्यावरून वडिलांस लिहिले असे हेगडोजी सिवेकर याजला दोन रावतानसी ठेवावे म्हणोन लिहिले त्यावरून ठेविले परंतु याजला लौकर पाठवावे घोडी चागली आपाजी गीत्याचे पसदीस पडे येसी पाठवावी वरकड अलाहिदा पत्रीं वडिलीं मजकूर कितके लिहिला त्यास मजपार्शी संकल्प विकल्प किमपि नाहीं वडिलीं जैसे स्वच्छ आतःकरण आहे त्या प्रमाणे असो द्यावें लेकरा पासुन आतर हि पडेल तरी वडिलास शिक्षा करावयासि आटई ( ? ) आहे तथापि माझा जीवनोपाय आणि जन्मादारभ्य श्रम मजविसी केले भोगले ते म्या शतजन्म घेतले तरी उतीर्णता होणार नांहीं माझा दृढभाव वडिलांचे चरणापासी आहे तरीच भगवंत यश देईल यासि अन्यथा नाहीं संसाराचा वगैरे बंदोबस्त करणें त्यास मजला येविशीचा उमज काय म्या संसार कोठें कोणे स्थली केले कांही प्रबुध्धता नांही ईश्वराची पूजा न्यून्य जन्मातरी जाली याजमुले एका वडिलांची अवकृपा वडिली हि संसाराचे कोडे लिहिले त्यास मजला कले काय जो पर्यंत वडिलांच्या जीवांत जीव आहे तो आम्हांस कोणे गोष्टीची चिंता नाहीं वडिलांस जैसे कलेल त्या रितीने बंदोवस्त राखावा वडिलांचे मर्जीस आनुकूल जो कोणी नसेल तो माझें हि मर्जीस नाहीं सारांश वडिलांच्या चरणाखेरीज मजला दुसरी जोड नाही हे निशा असो द्यावी वरकड वर्तमान मागाहून लेहून पाठऊ शेवेसी शृत होय हे विज्ञप्ति·

---

ले. ५७ श्रीनृसिंह १६८४ मार्गशीर्ष शु. १

१७६२ नोव्हेंबर १६

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री गंगारधपंत तात्या स्वामीचे से ॥

पो॥ नरहर लक्ष्मणराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपर येथील कुशल ता॥ छ २९ राखरपर्यंत यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत आसिलें पाहिजे विशेष श्रीमंत राजश्री दादासाहेबांची स्वारी या प्राते आली पैठणास येऊन आम्हा उभयेताचे घराचे वर्तुलाकार केलें सर्व मालीयेत घरें खांदूण घेऊन गेले तो विस्तार परस्परें कलला च आसेल इतकें होऊन सेवगांवची मामलत बाबती सरदेशमुखीची गल्ला बांधला गु॥ बावत तेवीसहजार बाकी राहिली ते आपल्या तर्फेतच होती क॥ दागणी येकंदर रुपये दिधला नाहीं तेव्हां श्रीमंत राजश्री सुभेदाराणी जनार्दन त्र्यंबक यांस आज्ञा केली कीं सन येकाहत्तरी बा॥ वीस हजार रु॥ याणीं दिधले त्याची निमित्त तुम्हीं देणें त्याजवरोण मारनिलेणीं दाहाहजाराची वरात आपल्या भावावर दिधली

ते त्याणी मान्य न करिता माघारी टाकिली रुपया आला नाही व पायेमाली जाली त्याचाही जावसाल उगवला नाही श्रीमंताची स्वारी याप्रांते आल्यावर आम्हांस गु॥ ब॥बाकीचा तागादा सख्त लाविला तेविसा हजाराची निशा करोण घेतली व साल मजकूर साल माची रसद चवदा हजार घेतली मोकाशांची जप्ती करोन त्याचे यैवजी वसि हजार रुपये घेतले ये॥ गु॥ व सालमजकूर मिलोण पणास हजार रुपये आपले तर्फेचे येणे ऐसे आसोन सरकारच्या ताकिदी व आपली पत्रे च्यार वेला कमाविशदाराकडे पाठविली परंतु उतर देखील सुधे न देत सरकारातून वरातदार आमचे मागे लागले ते दारी बसले आहेत त्यास येविशई आमचा अन्याये काये आहे श्रीमंताची आज्ञा की त्यांजकडील कादाराणी रु॥ न दिधले तर गावगणा चिठ्या करोण रुा परभारा घेणें त्याजवरोण सरकारची सक्ती फार जाणोन रुा द्यावेसे जाले तेव्हा परगणीयात चिठ्या करोण दाहावीस गांव आणले परंतु रुपया येत नाही जनार्दनपंत तेथें आहेत उग्या च च्यार गोष्टि विपर्यास भासऊन सांगतील यास्तव तावार वर्तमान सेवेसी लिा आहे आम्हास ज्याप्राा आज्ञा होईल त्याप्राा वर्तनुक केली जाईल तावार वर्तमान श्रीमंताचे पत्री लिा आहे त्याजवरोण विदित होईल कादारास आज्ञा करोण यैवज देविला प.हिजे म्हणजे आम्हांकडील झट वारेल ताकीदपत्रें पाठविली पाहिजेंत म्हणजे अैवज घेऊन सरकारांत देऊ सरकारचा तगादा वारला म्हणजे आम्हांकडे गुता नाही + बहुत काये लिहिणे कृपालोभ आसो दीजे हे विनंति

---

ले. ५८ श्री १६८४ मार्गशीर्ष वद्य ५
१७६२ दिसेंबर ६

तीर्थरूप सौ॥ मातुश्री बाई वडिलांचे सेवेसी

आपत्यें सदासिवाने व कृष्णरायाने चरणावर मस्तक ठेऊन सां नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता॥ मार्गसीर्ष वद्य ५ पावेतों सुखरूप असो विशेष तीर्थरूपाचे शरीभावनेचे व संसारखर्चाचा मजकूर लिहिला तावडतोब वर्तमान कलत गेले पाहिजे म्हणोन आज्ञा यैसियासिं आम्लपित्तास उपाये जोसीबावा करीत आहेत दैविक पाहतां परकृत पीडा आहे त्याचा हि उपाय होत असतो ग्रहजपास दोघे तिघे ब्राह्मण घातले आहेत आपल्या येण्याविसीं जोसीबावांनीं एकदोनदा पुसिले परंतु मर्जीस येत नाहीं आम्लपित्ताची वांति पांच सहादा होत होती सांप्रत न्यूनता आहे संसारखर्चाचा मजकूर रुपयांचा लिहिला त्यासी शरीरी वेथा मुले मर्जी बाहाल नाहीं यास्तव हटकावयासिं फावत नाहीं वडिलांचा हि तेथें उपाय नांहीं खरा च परंतु समय पाहून हटकू आज्ञा करतील ते वडिलांस लेहु इकडील

---

+ येथून अक्षराचे वळण निराळें आहे.

राजकीय मजकूर तर श्रीमंताचा यवनाचा स्नेह जाला साठी लक्षांची जागीर मागे भाऊसाहेबानीं घेतली होती ते माघारी दिल्ही या उपरी श्रीमंत दादासाहेब व माधवराव यवनसह सप्तरूषीस राजा स्थापून गोपाळरायावर मिरजेस जाऊन तोफा फौजेनें जेर करून हैदर नायकावर यवनावरावर फौज देऊन पाठवावे आपण माघारे मिरजेपासी आसावें राजश्री सुभेदारांची व नारो शंकराची रवानगी करणार पांचा सात्ता दिसानिरोप होईल कलावें बहुत काय लिहिणें हे विज्ञापि चिरंजिव राजश्री माधवरायासी आसीर्वाद उपरि तुम्ही राघोबा नहीपत रायापासीं बसून विद्याभ्यास करीत जाणे खेलत न जाणे वर्तमान वरचेवर लिहित जाणे हे आसीरवाद

---

ले. ५९ श्री. १६८४ माघ शु. १२
१७६३ जानेवारी २६

नकल

राजश्रीया विराजीत राजमान्य राजश्री गंगाधर येशवंत स्वामी गोसावी

यांसि पोष्य माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणुन स्वकीये लिहित जाणें विशेष रामाजी सिवदेव जोसी कुलकर्णी मौजे वरूडे त॥ खेड यानी विदित केले की आपला चुलत पुतण्या त्रिबक रघुनाथ निपुत्रिक ( जाला त्या )चा विभाग आ...सा वतनात असतां गंगाधर येशवंत याणी त्याजपासोन आपण सर्व भाऊ यासी न पुसता बलात्कारे निमें वतन घ्यावेसा विचार केला यावरून आम्हीं सर्व जोसी कुलकर्णी पेशजी पुण्यात श्रीमंत भाऊसाहेबापासी वर्तमान निवेदन केलें त्याणी मनासी आणून गंगोबा वगैरे बाजवी करितात असे जाणून त्रिबक रघुनाथ याज पासोन वतन घ्यावे यासी दरकार नाहींन घेणे यैसी आज्ञा केली शफतपूर्बक गंगाधर येशवंत बोलोन वतन घेणार नाही ऐसे मान्य केले त्रिबक रघुनाथ याणें हीं कागदपत्र कांहीं दिल्हा नाही यैसे जालें आसोन सालमजकुरी गंगोबा गावी येऊन आमचा पुतण्या मल्हार गोविंद व नातू कासी सामराज यासी राऊत पाठवून धरून नेऊन कोंडून ठेवलें आन्नोदक बंद करून जबरदस्तीने दोघा जवळून कागद लेहून घेतला की आपले भाऊबंद येका महिन्यात घेऊन येऊन तुम्हासी कागदावरी साक्ष करून देऊ ऐसी आड लिहून घेतली या प्रकारे जबर दस्तीने वतन घेणार तरी येविसिंची तार्कीद करून तगादा न करीत ते करावे म्हणून येसियासी रामाजी सिवदेव वगैरे सारे भाऊबंद जोसी कुलकर्णी राजी नसता तुम्हीं जबरदस्तीन वतन घेता सबब तीर्थरूपानी मनासी आणून गैरवाजवी तुम्ही करिता [ असें ] समजोन तार्कीद केली वतन वरूडाचे जोशी कुलकर्ण घेनार नाहीं यैसे शफत पूर्वक बोलिलेस येविसीचा दाखला रा। राजश्री विठ्ठल विश्राम व वै॥ राजश्री रघुनाथ दिक्षित मनोहर याणि हुजूर पुरविला त्यासी

साल मजकुरी मल्हार गोविंद व कासी सामराज याजपासोन जबरदस्तीन कागद तुम्ही लेहून घेतला आहे तो कामाचा नसे जोरावारीने वतन घेता हे न घेणे येविसी तुम्ही हंजूर असता ताकीद केलीच आहे व हाली पत्र लि॥ असे तर तुम्ही मौजे मजकूरचे कुलकर्ण जोतीशाचे वतनासी मुजाहीम न होणे कागद लेहून घेतला आहेत ते माघारे देणे पेशजी तीर्थरूप नाना व भाऊ याचे कारकीर्दीतही इनसाफ जाला आहे त्याप्रमाणें वर्तणे बोभाट येऊ न देणे जाणिजे छ. ११ रजब सु॥ सलास सितैन मया आलफ बहूत काय लिहिणें हें विनंति

---

ले. ६० श्री १६८४ फाल्गुन वद्य ७
१७६३ मार्च ६

माधवराव बल्लाळाचे हरी दामोदरास पत्र—

विशेष प्रांत जुन्नर येथे राजश्री गंगाधर येशवत याचे सरजामचे गाव आहेत त्याची जफ्ती सालमजकूर सनसलास सितैनात केली होती ते मोकली करून हे पत्र तुम्हास लिहिले असेत तरी मारनिलेचे गाव असतील तेथील जफ्ती उठऊन सुदामतप्रो अमल सुरलीत चालवणे जाणिजे छ २० शाबान सुा सलास सितैन मया व अलफ +बहूत काय लिहिणे हे विनंति *

बार.

---

ले. ६१ श्री.

[1]राजश्री गंगाधर यशवंत स्वामि गोसावी यांसि

विनंति उपरि [2]चिरंजीवानी बहुत तुमचे येकनिष्टतेचा अर्थ लिहिला त्यावरून संतोष जाहला दोघा सरदारास येक विचारे चालवावे खावंदाची मर्जी राखावी मातबर मनसबे करावे येणेप्रो निरतर करावे येणे करून परिणाम उतम हा अर्थ मनात आणून तदनरूप हाली कर्ता म्हणून [2]चिरंजीवाचे पत्रावरून अवगत जाहले पुढे दिवसेदिवस अधीक करणे लोक घरास गेले ते तयार होऊन यावयास विलंब मात्र लागेल वरकड काही गुता नाही सविस्तर चिरंजीवास लिहिले आहे
त्याजवरून कलेल छ ७ रमजान. हे विनंति.

---

+ येथून अक्षर खाशांचें.

* अशाच अर्थाचें व याच मितीचें आणखी एक आज्ञापत्र माधवराव बल्लाळानें त्रिंबकराव लक्ष्मण कमावीसदार पो नेवासे यास पाठविलें आहे.

१ हें पत्र नानासाहेबांनीं गंगोबा चंद्रचुडास लिहिलें असावें.

२ चिरंजीव म्हणजे रघुनाथराव.

ले. ६२ श्रीमोरया. १६८५ ज्येष्ठ शु. ७
१७६३ मे १९

पै।। छ २५ जिल्काद जेष्ट मु।। आर्बा सितेन सन, ११७३ मु।।
चांदवड

तीर्थस्वरुप सौ।। मातुश्री बाई * व सौ।। मातुश्री काकू वडिलांचे शेवेसीं

आपत्यें सदासिवानें व कृष्णरायानें चरणावर मस्तक ठेवोन सीर सां। नमस्कार विज्ञापना येथिल कुशल+ जेष्ट शुध ७ सप्तमी गुरुवार मु।। शहर भागानगर येथे वडिलांचे सुखरुप आसों विशेष वडिलांकडोन आसीर्वाद पत्र येत्रो वृत्त कलत नाहीं सविस्तर व्रतयुक्त पत्री सांभालीत जावें इकडील वर्तमान तर मजल दरमजल बेदर पर्यंत येवोन पुडे खंडणीया शहानें फौजेच्यां ज्या जाल्या त्या करून शहरास दाखल जालो शहरची खडणी हि थोडी बहुत होवोन बसालतजंगाचे भेटीस कृष्णेच्या उतर तीराने जात आसों त्याच्या भेटी झाल्यानंतर पुडे जा मनसुबाबाने चालावयाचे होईल ते सविस्तरें लेखन होईल ये प्रांती सालीचा चारा व दाणा घोडियास आसे परंतु आपली मडली सर्व अद्याप वडिलाचें आसीर्वादे कुशल आसे ती।। सौ मा।। काकूच्या शरीरास मधरीयाची भावनेच्या उपायाने शमतेंचे व्रतलेखन करावें ती।। माहादाजीपंत मामा कोठें आहेत त्याचें शरीराचे आरोग्यतेचें वर्तमान ल्याहावें ती।। बाजीपंत मामा चांदवडास आले किंवा कोठें आहेत हे सविस्तरे लेखन करावें भेटी होई तो सुदीन आसे शेवेसी श्रत होये हे विज्ञापना

ती।। सकंभट काका स्वामीस सां। नमस्कार विनंति उपरी आपलीयाकडील पत्रें आलीं त्या आलीकडे वर्तमान कलत नाहीं तरी वडिलपणें सविस्तरें पत्री सांभालीत जावें आणि लोभाची वृधी करावी हे विनंती

---

* गंगाधर यशवंत चंद्रचूड यास दोन बायका व चार मुलगे होते. पैकीं मोठ्या बायकोचा उल्लेख ' बाई ' या नांवानें व धाकटीचा ( आवडत्या बायकोचा ) उल्लेख ' काकू ' या नांवानें पत्रांतून आलेला आहे. सदाशिवराव व कृष्णराव हे ' बाईचे ' मुलगे आणि यशवंत व माधव हे ' काकू ' चे मुलगे हें या पत्रांतील मजकूर वाचतांना लक्षांत ठेवलें पाहिजे. काकू १६८५ च्या आषाढांत मरण पावली.

+ मोडक, दीक्षित व पिल्ले या तिघांच्या हि जंत्र्यामध्यें शके १६८५ अधिक ज्येष्ठ दिला आहे. परंतु येथें दिलेल्या या व यापुढील चार पत्रांवरून त्या वर्षी ज्येष्ठ अधीक नसून आषाढ अधिक होता हें स्पष्टपणें दिसून येणार आहे. अर्थात सर्व जंत्र्यांमध्यें या दोन महिन्यांचीं नांवें चुकलीं आहेत.

इहैव गोविंदपंतास सां नमस्कार सविस्तरें वर्तमान लिहीत आसावें हे विनंति

हे च राजश्री कोंडोशंकर व राजश्री मोरो रामचंद्र यास कृतानेक नमस्कार हे विनंति राजश्री गोपाल दाबके मामास नमस्कार समस्त मंडलीस सां नमस्कार आा आसीर्वाद

---

लें. ६३ श्रीमोरया. पै. १६८५ ज्येष्ठ व.१२

१७६३ जून ८

पैा छ २५ जिलकाद जेष्ठ
सुा आर्बा सितेन सन
११७३

मुा चांदवड

चिरंजीव विजईभव राजश्री दादाजी व माधवराव यासि प्रति सदासिव गंगाधर व कृष्णराव गंगाधर आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणुन स्वकीयें कुशल लिहीत असावे विशष आलीकडे तुमची पत्रे येवोन वर्तमान कलत नाहीं तर विस्तारें पत्र पाठवीत जाणें इकडील वर्तमान तर बेदरा सानिधहून खंडणिया थोडिया बहुत घेत शहर भागानगर पर्यंत दरमजल आलों पुढे लौकर च त्या प्रांते येत असेत तुम्ही प्रत्यहीं दरबारास जात जावें राजश्री बाबास येकदां मुजरा रोज करीत जावा दररोज प्रहरभर दीड प्रहर दरबारी बसत जावें वरचेंवर वर्तमान लिहीत जावें बहुत काये लिहिणें हे आसिर्वाद

राजश्री सिवाजीपंत आजेबास सा नमस्कार लिा परिसोन सर्वदा पत्रीं संतोष होये तो आर्थ करीत जावा हे विनंती

हे च राघोबा तात्यास नमस्कार विनंती तुमचे पत्र च येत नाहीं तर सर्वदा पत्रीं परामर्ष करीत जाणें हे विनंती

हे च गिरीबास नमस्कार तुम्हीं आपले वृत्तयुक्त पत्र पाठवीत जाणें हे विनंती वो रा नानाभट यांस सां नमस्कार

---

लेखांक ६४ श्री. १६८५ ज्येष्ट शु० १५

१७६३ जून २५

पौ छ १ जिल्हेज अधिक सुा आर्बा मुा चादवड

तीर्थरूप सौ मातुश्री बाई व काकू वडिलांचे सेवेसी

अपत्यें सदासिवानें व कृष्णरायानें चरणावर मस्तक ठेऊन सां नमस्कार विनंति येथील कुशल ताा जेष्ट शुद्ध १५ मुा लिगालिपली येथे सुखरूप समस्त आसो विशेष पूर्वी

पत्र पाठविले ते पाऊन वर्तमान कलले आलो पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी सविस्तर लिहीत जावे या नंतर जगजीवनपंवार व राजाराम बाबूराव याची फौज आपल्याकडील फौजानी तगार केली यास्तव यवन जुन्नर प्रांताहून नासिक चांदवडाकडे येणार यास्तव सावध राहून निरो[प]द्रव आसिले पाहिजे वडिली पूर्वी कागद पाठविले त्यांत चादवडीचे माचीचे वर्तमान लिहिले येसियासि तेथे सोय नसीली तर दोन दिवस इद्राईस राहावें परंतु ये गोष्टीची उपेक्षा कार्याची नांही सीघ्र तर्तूद करावी तीाा सौाा मातुश्री काकूस मधरा निघाला तो बरा जाला किंवा काही कसर आहे हे सविस्तर ल्याहावे कदाचित बालेकिल्लयावर जाण्याची सोय आसिली तर तेथे राहावयाची तर्तूद करणे तेल तूप दाणादुणा लांकूड फांटे संग्रह करावा गाफील राहावयाचे काम नांही इद्राईस चांदवडचे बाले किल्लयावर जाऊन राहावे या उपरी चादवड कसब्यांत न राहाणे या प्राो सांगितले आहे तरी लिहिल्या प्राो करावें बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विज्ञप्ति निंबगाव कडील यथास्थित वर्तमान लिहून पाठवावे हे विनंति

---

**लेखांक ६५** **श्री.** १६८५ अ. आषाढ शु. १५
१७६३ जून २५

राजश्री रघुनाथ रणसोड नि॥पागा गोसावीं यासि

छ. श्रीो आहिल्याबाई होलकर दंडवत सुहूरसन आर्बा सितैन मया व अलफ बखताजी सिंदे याजकडील राउतास खर्चास रुपये १०० सेंभर तुम्हाकडून देविले असत तरी सदर सेंभर रुपयें देऊन पावर्लायाचे कवज घेणे जाणिजे छ १३ जिल्हेज बहुत काय लिहीणे




बार

---

**ले. ६६** **श्री.** १६८५ अ. आषाढ व. १
१७६३ जून २६

नकल

राजश्रीया विराजीत राजमान्य राजश्री सदोपत स्वामी गोसावी यांस सेवक हरी दामोदर नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ताा छ १४ जिल्हेज जाणून स्वकीये कुशल लेखन करीत आसीले पाहिजें विशेष राजश्री गंगाधर येशवंत याचे गावच्या मोदाचिट्या सुभाहून सरकाचे आज्ञेप्रमाणे तुम्हास सादर जाली आसता आद्यापी सदरहू गावची जमी तुंम्हा उठवीत नाही म्हणून विदीत जाहाले त्या वरून हे

पत्र तुम्हास लिहिले आसे तरी राजश्री गंगाधरपंत याजकडील गावे येणेप्रमाणे नींबगाव व कनेसर व गोसार्सी व पूर हे च्यारी गावचा आमल राजश्री तात्याकडे देणे तुम्ही दखलगीरी न करणे येवीसी पूर्वी तुम्हास सुभाहून सनद सादर जाली च आहे या उपरी तुम्ही तेथे येकदर खटखट न करणे हाली राजश्री यशवंतराव गंगाधर याणी लिहिले त्याजवरून लिा असे तर सदरहु गावास माहालीचा उपसर्ग लागो न देणे हे विनंति सदरहु आसल पत्र रवाना नींबगांवास हस्ते तुकु सांडा प्यादा आषाढ शु. ८ रविवार सुा आर्बा सीतेन सन ११७३ मोरो रामचंद्र याजकडे

---

ले.६७ श्री. शके १६८५ ज्येष्ठ व. ७
इ. स. १७६३ जून ३

पौा छ २५ जिलकाद
सुा अर्बा सितेन सन ११७३
मुा चांदवड.

सौा सपत्न मातुश्री बाई सौा मातुश्री काकुबाई वडीलांचे सेवेसी आपत्ये भिउबाने साा नमस्कार विनंती उपरी येथील क्षम ताा जेष्ट वद्य ७ जाणून सुखरूप आसो विशष इकडील वर्तमान तरी आविध राजापुराबरी आहे पुढे कोणीकडे जाईल हे न कले निबगावचे वर्तमान पूर्वी सेवेसी लल्यागमागम लिहून पाठविल आहे त्याजवरून विदित जाल च असेल साप्रत्य वर्तमान तरी कनरसर व पूरची पेवे मागाहून तलगावीचे मुकामातून सर्व नेली काणी समयास नाही याजकरिता सर्व गला गेला यादोबा आपले गावी आहे भाडेनाडे करून वाफगावास नेला असता तरी काही गला वाचता परतु काणी समाचार घेतला नाही यामुल सर्व झाडियानिसी पेव नेली सेवेसी कलावे यानतर निबगावचा बाग गुरे खाऊन जातात त्यास काणी येईल त्याजसमागमे मोरोपतास ताकीद लिहून पांठविणे म्हणिजे राखतील नाही तरी झाडांची खराबी होते येसु बोमणा ही सला टाकोन जाणार त्याही मळ्यातील झाडे लोक तोडतील याजकरितां लिहिल आहे बहुत काय लिहिणे हे विनती

राजश्री दादाजी व राजश्री माधवरावजीस साा नमस्कार लिा परिसीजे बहुत काय लिहिणे हे विनती

सेवेसी निरो राम साा नमस्कार विनंती लिखितार्थ परिसिजे आम्हास येथ्या समयांत न टाकणे सर्व भाडे व वस्तें गेली कलले पाहिजे हे विनती

---



**लेखांक ६८** १६८५ ज्येष्ठ व. १०
१७६३ जून

श्री.

तीर्थरूप सौभाग्यादिसंपन्य मातुश्री बाई व काकू वडिलांचे शेवेसी

आपत्यें सदासिवाने व कृष्णरायाने चरणांवर मस्तक ठेऊन सां नमस्कार विनंति येथील कुशल जेष्ठ वद्य १० मुा कृष्णातीर वडिलांचे आसीर्वादे करून येथास्थित आसों विशेष साप्रत्य वडिलांकडून आसीर्वादपत्र येऊन वर्तमान कळत नाहीं याजमुळें परम चिंता लागली आहे तरी वडिली आपले कुशलवृत तपसिले लेहून संतोशावाप्ती केली पाहिजे यानंतर इकडील बातमीचें वर्तमान येकिल्यात आले कीं पूर्वी जगजीवन पंवार वगैरे नासीक चांदवड प्रांते आले होते त्याचा बदनक्ष होऊन माघारे आले हे मोगलास शैल्य जाले याजमुळे फिरोन त्या प्राते फौज रवाना केली ते तिकडे येणार चांदवडास हि शह देईल त्यास तुम्हीं सावध राहून इद्राईकडे जाण्याची सोये आसिली तरी जावें सर्व गोष्टीने सावध आसावें आपले वृत वरचेवर लिहीत जावें भागानगर प्रांते आला तेथून नवाब बसालतजंग संनिध होते याजमुळें श्रीमंत व राजश्री सुभेदार त्याचे भेटीस्तव कृष्णातीरीं मुगुर किला येथ येऊन भेटी जाल्या त्याजला समागमे घेऊन निजाम आलीचे पारपत्य करावें येदं निमित्य लस्कर येथून माघारे फिरलें जाले वर्तमान लिा होईल ते लेहूनं पाठऊ बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंति

चिरंजीव राजश्री दादाजी माधवराव व मथुराबाईस आसीर्वाद गोविंदपंतास नमस्कार वर्तमान सविस्तर लिहिणे रघुनाथभट लोणकर यांसि नमस्कार

तींा राजश्री सकंभट काकास नमस्कार तींा रा त्रिंबकपंत दादास नमस्कार

पौ छ १५ जिल्हेज आर्धाक आपाढ मुा आर्बा सितेन ११७३ मुा चांदवड

---

**लेखांक ६९** श्री. १६८५ अ. आषाढ व.१२
१७६३ जुलै ७

राजश्री सदासीव गगाधर व कृष्णराव गगांधर गोसावि यांसि

छ. अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्त्री आहिल्याबाई होलकर दडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावोन लेखनार्थ अवगत जाला बसालतजंगास तीर्थरूप राजश्री तात्या आणावयास गेले आहेत त्याजला घेऊन सात आठा कोसावर मागे आले आहेत येका दो दिवसानी लस्करास सामील होतील म्हणून लिा ते सर्व कळो आले येशास इकडील वर्तमान सविस्तरे * तीर्थस्वरूप राजश्री सुभेदारास लिा आहे त्याज वरून कलल

* म्हणजे मल्हारराव होळकरास

तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणें रवाना छ २५ जिल्हेज बहुत काय लिहिणे हे विनंती,




---

ले. ७० १६८५ अधीक आषाढ व. १३
१७६३ जुलै ९

पौ छ १९ मोहरम आषाढ सुा आर्बा सितेन सन ११७३ मुा चांदवड

**श्रीमोरया.**

श्रीयासह चिरंजीव राजश्री दादाजी व तथा राजश्री माधवरावजी याप्रति सदासिव गंगाधर व कृष्णराव गंगाधर अनेक आसिर्वाद उपरि येथील कुशल ताा अधिक आषाढ वद्य १३ त्रयोदसी मुकाम नजीक गुंजोटी प्रांत तुलजापूर जाणून सुखरूप असों विशेष तुम्हाकडून चांदवडचे मुकामचे पत्र पाठविले त्यावरून सविस्तर वर्तमान कलले ऐसें च निरंतर पत्री संतोषवीत असिले पाहिजे यानंतर इकडील वर्तमान तरी नवाब बसालतजंग यास आणावयाकरिता तीर्थरूप गेले होते ते नवाबास घेऊन आले येथे पाच साहा मुकाम जाहाले निजामअल्लीखान अवरंग्यानजीक आले असत त्याचा आमचा मुकाबला व्हावयासि सोला सतरा कोसाचे अंतर आहे श्रीमंताचा निस्चय हा चि की मोंगलासी जुंझावे यश देता ईश्वर आहे ऐसा इत्यर्थ करोन तमाम सरदारास बलावणी करून मसलत करून सर्वाचे मनोधारण करितात ऐसा प्रसंग येऊन पडिला आहे निदानी शत्रूस पाठ देता येत नाही ऐसे दीढतर करून इतकीयात त्याजकडून सलामामलत जाहाली तर उतम च आहे नाही तरी दोती रोजा त्याचे आमचे जुंझ मातबर होईल तुम्ही येथील प्रसंगी मातुश्री अहिल्याबाईचे मर्जीनरूप वर्तुन लोभ करीत येसे करीत जाणे ताा राजश्री त्रिंबकपंत दादास व राजश्री नारोपंत नानास पत्रे पाठविली आहेत त्यांसि प्रविष्ट करून प्रत्योतरे पाठऊन देणे निबगावाकडील नुकसान काये काये जाले हे लिहिणें परसातून काये वस्त भाव गेली आहे हे लिहिणे काकूच्या शरीरास सावकाश कोठपर्यंत आहे हे ल्याहावे जोशीबावा आले येणेकडून चित्तार्ची खातर जमा आहे बहुत काय लिहिणें हे आसिर्वाद

विनती सेवक विसाजी सामराज दोनी कर जोडून सिरसाष्टांग नमस्कार विनति विज्ञापना कृपा करून सेवक लोकास नमस्कार लिहिला त्याजवरून बहुत समाधान जाहले सदैव पत्र पाठऊन सेवकाचा सांभाल केला पाहिजे हे विज्ञापना

---

ले. ७० श्रीमोरया

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री बाजीपंत स्वामीचे सेवेसि पो गंगाधर यशवंत साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशळ जाणून स्वकीये कुशळ लेखनं करित गेले पा। विशेष नरसिंगराव जाधव दहिटणेकर याचे नालबंदीच्या यैवजाची नेमणूक तुम्हाकडे जाली आहे त्यास मशारनिलेचा यैवज अद्याप पदरी न पडला म्हणून कळो आले यैसियास याजला तयार होऊन जलद आले पाहिजे तर याचे वराते प्रमाणें यैवज यास पत्र पावताच द्यावा दुसरे कडे मोबदला जाला असेल म्हंणून आनमान कराल तरी याची नेमणूक आगोधर वाफगांवीच होऊनं चिठी तुम्हीं घेऊनं गेला यैसे आसोन आद्याप यास यैवज न पावला हे कोण गोष्ट याउपरी कोणे विसी अनमान न करितां मशारनिलेचा यैवज कराराप्रमाणें पावता करावयाचा बोभाट परतून नये तो अर्थ करणें माणूस चागले सामानं सिद्ध होऊन आले पाहिजेत आपळे ममतेचा असेत यास्तव लिा प्रमाणें याचा कार्यभाग उरकून दिला पाहिजे लोभ असो दीजे याचा यैवज नेमणूक केली यासि पावणे हे विनंति

---

ले. ७२ १६८४ अ. आषाढ व. ८
१७६३ जुलै ३

श्री.

नकल

राजमान्य राजश्रि जिवाजी आबांजी
स्वामीचे सेवेसी

सेवक गंगाधर येशवंत नमस्कार सुा सलास सितैन मया अलफ तुम्ही कार्य करते म्हणून तुम्हास का नेवासे बुा व बहिरंवांडा येथील कुलकर्णाची गुमास्तगिरी तुम्हांस सांगितली आहे तरी पाटील माहाजन याच्या गुजारतीनें लावर्णाचा दाखला व कच्या खर्चाची जरसी व कचे जमेचा दाखला राखून इमाने इतबारें वर्तणुक करणे जाणिजे छ २१ माहे जिल्हेज हे विनंति

---

लेखांक ७३ श्री १६८५ अ. आषाढ शुा १५
१७६३ जून २५

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री वासुदेव पंत
फडणीस व राजश्री गोपालपंत स्वामीचे सेवेसी

पो दरो दामोदर नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम तो छ १३ जिल्हेज जाणून स्वकीये कुशल लिहित आसिले पाहिजे विशेष राजश्री गंगाधर येशवंत याचे इनामी गाव जागिराचे जुनर सुभीयात आहेत त्यापैकी चादवडच्या मुकामीहून सण-

कारचे आद्न्येप्रमाणे तुम्हास पत्र पाठविले होते की राजश्री तात्याकडील गांव मौजे निंबगाव व कनेसर व गोसासी व पुर हे च्यार गावचे पत्र लिहून पाठविले की सदरहु गावची जप्ती उठऊन आमल मशारनुलेकडील कारकुनाकडे देवणे व जप्तीचा येवज देणे त्यास हाली राजश्री तात्याचे चिरंजीव येशवंतराव यांनी आम्हास पत्र लिहिले की सदरहू गावासी कटकट राजश्री सिदो तुकदेव करितात त्यावरून तुम्हास पत्र लिहिले आसे राजश्री सिदो तुकदेव यास सुभाहून ताकीद करून राजश्री तात्याकडील गावासी खटखट न करीत ते करवावे या उपरी गावचा बोभाट फिरोन येऊ न द्यावा बहुत काये लिहिणे हे विनंति

रो रघुनाथ हरी नमस्कार विनंति उपरि परिसीजे हे विनंति

सदरहु अराल पत्र रवाना निंबगांव हस्ते तुकु प्यादा आषाढ शुध ८ रविवार मोरो रामचंद्राकडे सुा आर्बा सितेन सन ११७३

---

ले. ७४ श्री १६८५ आषाढ व. ६
१७६३ जुलै ३१

दस्तक सरकार राजश्री मालराव




होळकर ताा कमावीसदारांनी व नवकीदारान व ठाणेदारान व बाजे लोक जकाते माा हाय सुा आर्बा सीतेन मया व अलफ सरकारचे जासूद जोडी तीन इंदूरास रवाना केल्या आहेत त्यास मार्गी कोणेविसी मुजाहीम न होता नदीनाला पार करून देणे जाणीजे छ १९ माहे मोहरम




---

लेखांक ७५ श्री १६८५ आषाढ व. ६
१७६३ जुलै ३१

श्री म्हाळसा-
कांत चरणी त-
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो-
ळकर

आज सरकार राजश्री मालराव होळकर ताा मोकदम मौजे कुसंवे प्राॅ ठाण सुा आर्बा सीतैन मया व आलफ राजश्री गंगाधर येशवंत यांचे कांठीचे बैल कसबे पिंपलगांव बसवंत प्रां चांदवड येथे रात्रीस दावण कापून बैल सर १२ बारां चोरी गेले त्यांचा मांग पींपलगांवकर कोळी बावांजी यानें मौजे मजकुरी बुंधा व भिकारी कोळी यांचे आंगी मुद्दा दोन बैलाचा व गगांजी कोळी मौजे पींपरखेडे प्रा मजकूर यांचे साक्षीनंसी लाविलां तेंव्हा बुधा व भिकारी म्हणु लागले की तुम्हीं कोठवले यांसी यऊन येणे हे दोन बैल व आणखी दहा बैल यैसे बारा बैल कोठवला वलखून घेऊन जाईल यैसा करार जालीया उपरी फीरोन पंधरा दिवसानी पींपलगावकर कोळी बल मागावयांसी गेला तेंव्हा बदमामलीच्या गोष्टी सांगुन बैल देईनांत म्हणोन हुजूर विदीत जाले त्यावरून हे पत्र सांदर केले असें तरी कोळीयांसी ताकीद करून सरकारचे खास बारदार व हलायेत पाठविले आहेत त्यांचे स्वाधीन बैल बारा करणें येवसी फीरोन बोभाट आलीयां तुमचे व कोळी याचे पारपत्य करून बैलाचा निकाल करून घेतला जाईल बुंधा व भीकारी हे दोघे गांवावरून गैर हजीर जाले तर तुम्हांस जाब करावा लागेल बैल तुम्हांपासोन घेतले जातील जाणीजे छ १९ मोहरम

---

ले. ७६ श्री १६६५ आषाढ व. ८
१७६३ आगष्ट २

पौ० छ २७ मोहरम ऊर्फ आषाढ मास सुा आर्बा सितेन सन ११७३ मुा चांदवड.

तिर्थरूप सौ मातुश्री बाई वडिलांचे शेवेसी

आपत्यें सदासिवाने व कृष्णरायाने चरणावर मस्तक ठेवोन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञांपना येथील कुशल ताा आषाढ वद्य ८ सोमवारपर्यंत सुखरूप जाणोन स्वकीयें कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष वडिलाकडील आसीर्वाद पत्र जासुदा समागमे सोनारीच्या मुकामी आले ते पावोन सविस्तरार्थ विदीत जाहाला तीाा सौ मातुश्री काकुचे उत्तरकार्य यथास्थित केले श्रीनें मोठा विघात केला बरे श्री इछा प्रमाण मानवी उपाये नसे निंबगांवाकडे वगैरे राजश्री मोरो रामचंद्र यांस पाठविलें गावास बैलढोरास येक हजार रुो देविले म्हणोन पत्री आज्ञा त्यास गांवास पोटास दिल्हे हे उतम केलें पुढे ही कौल देवोन उत्तम प्रकारें आवादी होय ते करवावें व चिरंजीव दादाजी व माधवराव याचे सांतवन वडिली करावें इकडील वर्तमान तर श्रीमंत सह नागतलीयाचे मारे येजमानआदि सर्व आले पुढें नगरा सनधि गेल्यावर जिकडे जावयाचा निश्चय होईल ते शेवेसी लेखन होईल तगाईच्या विषी मजकूर तीर्थरूपांच्या कानावर घातला त्यानी आज्ञा केली कीं उत्तम केलें परंतु हांगामी उगऊन घ्यावे येसे सांगितले त्या प्रो करावें बहुत काय लिाा लोभ कीजे हे विनंति

तीाा सकंभट काका स्वामी वडिलाचे शेवेसी सांं नमस्कार कृपा लोभ आसोदीजे इकडील वर्तमान तर तीर्थरूप सो माा बाईच्या पत्रावरून कलेल लोभ कीजे हे विनंती

इहैव गोविंदपंत स्वामीस लिाा परिसीजे हे विनंती

---

ले. ७७ श्री. १६८५ ज्येष्ठ व. ८
१७६३ जून ४

श्रियांसह चिरंजीव विजईभव राजश्री आन्याबा व कुशाबा यांसी प्रती सौ आनपूर्णाबाई कृतानेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा जेष्ट वद्य ८ आष्टमी मंदवार पावेतों पावेतों समस्त सुखरूप जाणून तुम्हीं स्वकीयें कुशल लेखन करोन संतोषावाप्ती केली पाहिजे दोन मास जाले तुम्हाकडून कुशलतेचें पत्र येऊन चित संतोषाते पावत नाही याजकरिता जान उद्विग्न आसे तरी येसे न करांवे सदैव आलिया वार्तिका समागमें पत्र पाठऊन संतोषाते पाववीत जावें इकडील वर्तमान तरी निंबगावचे वर्तमान दो पत्रीं लिाा आहे त्याजवरोन कळलें च आसेल वारंवार काये लेहावें येवनाकडील वर्तमान तरी पुरंदरची व सिंहगडची व लोहगड व राजगडची माची येश्या तमाम लुटून धार माथा पावेतो गुढी लुटून पुणे व वाघोली लुटून जाळून टाकिली पुण्यांत येक हवेली मात्र श्रीमताची राहिली बाकी कांही राहिलें नाही

देशांत थोर आनर्थ जाला कितेका स्त्रियांच्या इजती घेतल्या त्याचा परिहार कोठ-पावेतों लेहावा संकळीत मात्र लिहिले आसे खांसा मोगल व अगदी फौजा सितर कोंहमडी पावेतो गेले पुढें शहरास जाणार आणि विनायेकदास व करंडा व जगजीवन पंवार नासीक व चांदवडाकडे येणार याजमुळें इकडे फार अतिशये गलबल जाली आहे चांदवाडच्या किलयावरी वस्तभाव ठेविली त्याचे रक्षणास काळोजी डावऱ्या ठेविला आहे व कुटुंबास राहावयासी जागा घर इंद्राईचे बाले किल्यावरी बांधले त्यासी शंभर सवा से रुपये लागले तीन च्यार खंडी पावेतो गला हर जिनस व तूप तैल चढविले आहे घर आद्यापी तयार जालें नाही आठा चौं दिवसा होईल चिरंजीव सौ पार्वतीच्या शरीरी ज्वर अद्यापी आहे रा बगाजीबावा वैद्य औषध देतात परंतु अद्यापी गुणास येत नाही आरोग्य होईल तो सुदीन आसे रा कुसाजी गोविंद याची चिठी रा धोंडाजी नाईक नवाले यांजपासी आहे धामधुमीमुळें काही अद्यापी चिठीचे कार्य होऊन येत नाही तुम्हाकडील वर्तमान श्रीमंत रा दादा व राजश्री सुभेदार हे त्या प्रांतीहून कितीकां दिवसां इकडे येणार छावण्या कोणे स्थळी होतील तुमचे आगमन कधी होईल हें सविस्तर वर्तमान लिहून पाठवणें सारांश बहुत सावधपणे बुधीने वर्तणूक करोन शरीर संरक्षण करणे भेटी होईल तो सुदीन आसे. *बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. ७८ १६८५ ज्येष्ट व. ८

१७६३ जून ४

गोविंद राम याचें 'आन्या व बापू' यास पत्रः--

आमचे वर्तमान तरी सौवती मातुश्री बाईच्या आज्ञे प्रा वर्तणूक करीत आहों परंतु येथील सर्वांची मर्जी रक्षून श्रीमंत राजश्री तात्यांची कृपा होये तो अर्थ घडोन येता दिसत नाही वाफगांवी मुले मनुश्ये खर्चावांचून हैरान आहेत लोकांचे देणें त्याची निकड आणि आम्ही आपले पदरी साडे तिन महिने जाले आहो पनास शो कर्ज जालें पुढें आणखी होणार त्याची गती काये करावी आम्हास घरच्या धंद्याचा आटोप

---

* 'बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद' हीं अक्षरें अनपूर्णाबाईच्या हातची आहेत. बाकीचें सर्व पत्र 'गोविंद राम' नांवाच्या कारकुनाच्या हातचें आहे. त्यानें स्वतंत्रपणें दुसरें एक पत्र 'आन्या व बापु' यांस या च वेळीं लिहिलें आहे. त्यांतील प्रारंभीचा लांबलचक मायन्याचा भाग गाळून बाकीचें पत्र पुढील लेखांकांत दिलें आहे. या पत्रांत 'सुदीन असें यांपैकी 'से'च्या पुढे पूर्णविरामाचें चिन्ह आहे. इतर कोणत्याही पत्रांत आम्हांस हें चिन्ह आढळलें नाहीं.

होणार नाही मग परिणामी श्रीमंतानीं रागे भरावे आणि नाहक आपली दुर्देशा करोन घ्यावी हे गोष्ट उतम नाही घरच्या कारभारांत आम्हास येश प्राप्त होणार नाही याज-करितां श्रीमंतांस विनंती करोन घरी हर कोण्हास ठेवावें आणि कृपा करोन मजला हर-कोठे आन्नास लावावें हे हि माझ्या दैवानुरूप घडोन न ये तरी मजला आज्ञा देवावी आपले च नाव वेऊन हर कोठें पोट भरीन श्रीमंताच्या आज्ञे प्रा मर्जी राखोन च्यार महिने चाकरी केली मुले मनुष्यें गांवी उपासी मरतात आणि आम्ही येथे तुकडे खाऊन बसलों यांत आपल्यास सर्वथा चैन पडत नाही कृपा करोन पत्रोतर पाठवावयासी आपण समर्थ आहेत दोनच्यार पत्रे याच रीतीने रुक्ष लिहिलीं म्हणोन रागास न यावें घरचे कामास माझा टिकाव होणार नाही म्हणुन मी पहिले च विनती करीत होतो बरे मर्जी प्रा च्यार महिने गुजराण केली बहुत काये लिहिणे कृपा लोभ वृधी करावी हे विनती

---

ले. ७९ **श्री मोरया** पै. १६८५ अधीक आषाढ वद्य १०
१७६३ जुलै ५

पौ छ २३ जिल्हेज सुा आर्बा सितेन
सन ११७३ मुा चांदवड

चिरंजीव विजईभव राजश्रीं दादाजी व माधवराव यासी सदासीव गंगाधर व कृष्णराव गंगाधर आनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणुन स्वकुशल लिहित जावे विशेष तुमची पत्रें आली तीं मुकाम कलबुर्गे येथे पावोन वर्तमान सर्व अवगत जाहाले तीा सौा मा काकूच्या शरीरास स्वस्थता जालियाचे वृत्त न लिहिले उपाय वा राजश्री बगाजी भाऊ करितात म्हणोन लिहिले तेणे करून चिंतातुर आसो तर आरो-ग्यतेचे वर्तमान सविस्तरे लेखन करावे व दरबारास प्रहर साहा घटिका नित्यानी जात जावे त्या प्राते आता दगा होणार नाहीं येवनास इकडील पायेबंद बसला या मुले फौजा आपल्या जवळुन कोठे पाठविणार नाहीं वरकड वर्तमान तीर्थरूप सौा मा बाईच्या पत्रावरून कलो येईल तुम्हीं सविस्तरें पत्रें पाठवीत जाणे तीर्थरूप व आम्ही शरीरे करून सर्व कुशल आसों बहुत काय लिहिणें दरबारी वर्तमान येक दोनदा सविस्तर लिहिणें हे आसीर्वाद

* राजश्री गोविंदपंत स्वामीस सा नमस्कार लिा परिसिजे ................ हे दिवस कालक्षेपाचे आहेत यैसे नाहीं परंतु काल घोर आला यास्तव गुदराण मात्र करावी यैसे आसे आम्ही हिं त्या प्रांते च येत आसो तुम्ही आपलें चिताचे समाधान राखोन आसावे जेसे करून कालक्षेप चाले तो च आर्थ कर्तव्यांत येईल हे विनंति

---

* हा गोविंदपंत म्हणजे गोविंदराम नांवाचा कारकून अन्नपूर्णाबाईजवळ होता तो. त्यानें ले. ७८ मध्यें 'मुल मनुष्यें गांवीं उपाशी मरतात, आपल्यास सर्वथा चैन पडत नाहीं' असें लिहिलें होतें त्यास अनुलक्षून हें उत्तर लिहिलें आहे.

ले. ८० श्री मोरया १६८५ ज्येष्ट शु. १५
१७६३ मे २७

पौ छ १ जिल्हेज आखीक
मुा चांदवड सुा आर्बा
सितेन सन ११७३

चिरंजीव विजईभव राजश्री दादाजी व माधवराव यासि प्रती गंगाधर येशवंत आसीर्वाद उपरि येथील कुशल ता जेष्ट शुध १५ पावेतो कुशलरूप आसों विशेष मागे तुंम्ही पत्र पाटविले होतें त्यात चादवडचे माचीचे वर्तमान लिहिलें त्यावरून तुम्हांस इद्राईस जावयास येक दोनदा लिहिलें त्यावरून तुंम्हा गेला आसाल कदां [ चित ] येवनाचा शह टलला म्हणोन राहिला असाल तरी हरगीज न राहाण या उपरी लौकर जाणें जगजीवन पवांर व राजाराम बाबूराव यासि आपल्याकडील फौजानी गारत केले यास्तव येवनाची चाल नासीक चादवड इकडे होणार यास्तव वहुत खबरदारीने राहुन निर्भय आसरास जाऊन राहाणे चादवडचे माचीस पाण्याचे दुर्भिक्ष इत्काच पेच यास्तव इद्राईस जाऊन राहाणे वहुत काये लिहिणें हे आसीर्वाद

वे॥ राजश्री सकंभट यासि नमस्कार विनंति उपरी तुम्हीं तेथे आहां म्हणोन आम्ही निकालजी आसों तरी सावधानीने राहाणें हे विनंति

चिरंजिव राजश्री दादाजी व माधवराव यास आसीर्वाद लि॥ परिसीजे तुम्ही वरचे [ वर ] सदैव पत्र विस्तारे पाठवीत जावें सरकारची पत्रे येतात ती तुमची पुरती हाताने होत नाहीत याचे कारण तुम्ही न लिहिले तर सविस्तर याचे कारण लिहावें हे आसीर्वाद

---

लेखांक ८१ श्री. १६८५ कार्तिक शु. ९
१७६३ नोव्हेंबर १४

पै॥ छ १० जमादिलावल
मु॥ पुणे सु॥ आर्बा सितैन

श्रीमत राजश्री तात्या साहेबाचे सेवेसी

छ. आज्ञाधारक सुलतानजी लाभाते दंडवत विनति येथील क्षेम ता कार्तीक सुध ९ पावेतों येथास्थित आसो विशेष पत्र पाठविले त्यात मजकूर की श्रीमत सुभेदार याच्या पत्रावरून कळों येईल म्हणोन लिहिले तर नवीन जागाच्या चौथाईबावत तट पडिला होतां दुतर्फा ऐकत नवेतं तेव्हा श्रीमत राजश्री सुभेदार याजपासी वहुत प्रकारे बोलून पल्यावर आणिले येक खेडे न घ्यावे येसा आग्रये होता परंतु श्रीमताचे समाधान असावे उभयेपक्षी संतोष राहावा यास्तव समजाऊन सांगोन दोन माहाल घ्यावे

रावेर व वैजापूर या च गावा खेरीज करून घ्यावे येसा येत्यर्थ ठरोन निरोप घेतला परस्परे सतोष जाला येसे आसता साप्रत श्रीमतास सतोष नाही येसे लिहिल्यात आलें त्यास जो तुमचा आमचा करार जाला आहें त्याप्रमाणे श्रीमतानी येकावें आता आग्रह करणें सोईस नाही श्रीमत सुभेदार दोही माहालाखेरीज येक बिघा देंणार नाहीत तर जो करार केला आहे त्याप्रा कार्ये करून यावे येथे येक बिघ्याची रदबदली चालणार नाही ज्यात सुभेदाराची मर्जी राहे ते करावे वरकड वर्तमान सौ मावसीबाईच्या पत्रावरून विदीत होईल यासिवाय तुम्ही कबूल केले तर तुमची आमची स्थीत राहात नाही तर साफ उठोन येणे पढरपुरचे व विसाजीपताच्या गावचे कार्य करून घेऊन यावे तुम्हास आपल्या गल्याची आण आसे बहुत काये लिहिणे कृपेची वृद्धी करावी हे विज्ञाप्ती

सेवेसी आपत्ये विसाजी शामराज साा नमस्कार विनति विज्ञापना येसीजे राा सुलतानबानी लिहिले आहे त्याजवरून श्रुत होईल जे कर्तव्येंता करणे ते सावधपणे वडील करतील सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ती

---

ले. ८२ श्री

श्रीमंत राजश्री तात्या स्वामीचे

सेवेसी

विनंती सेवक बचाजी रंगनाथ कृतानेक साां नमस्कार विनंती येथील क्षेम जेष्ट शुध ८ मुाा गोद स्वामीचे कृपे करूनै वर्तमान येथास्तित असे विशष स्वामी ब्रीजाहून देश्यास गले ते समई तीर्थस्वरूप बापु सेवेसी समागमें च देश्यास गलें त्यानी आमचें खासगत वर्तमान व गोहदकराचे सर्व निवेदन केले च असेलं त्या उपरी या प्रांती येवनाचा व जमीदाराचा दंगा मातबर जाला सबब जाटाचे मायेत सिरोन येथे राहिलों किले गालेरीची चाकरी करीत आहों हे वर्तमान राजश्री गोविद सामराज्याची भेटी होईल तेव्हा आमची वर्तणूक निवेदन करतील बहुत दिवस स्वामीच्या आगमनाची मार्ग प्रतिक्षा करितों जैसे जयेद्रथाचे दुख सागावयास अभिमिन्याने जीव ठेविला होता तदन्याये येथे बसोन राहिलो असो खासी स्वारी या प्रांतानजीक आली म्हणजे मार्गीचा शुभत्ता पाहून भेटीस येऊ स्वामीचे चरण द्रिस्टीस पडतील तो सुदन असे गोहदकराचे वर्तमान राा गोविद सामराज सेवेसी वरचेवर लिहितात म्हणून विस्तारे न लिहिले आपली खासगत बिनंती तपसिलवार न लिहिली की लेकराची चिंता वडलास च असती दर्शन जालिया नंतर सर्व मनोरथ पूर्ण होतील हा भरवसा जाणून बेफिकीर असो आमचे घरचे वर्तमान श्रवण असेल ते ल्याहावयास आज्ञा जाली पो सेवेसी श्रुत हाये हे विज्ञप्ती

---

ले. ८३ श्री नरसिहजी

श्रीमंत महाराज राजश्री सुबेदार स्वामींचे सो

आज्ञाधारक नरसिगराव गगाधर कृतानेक उतम आसीर्वाद येथलि क्षेम ता। छ २४ माहे रविलआवल मु॥ श्रीप्रयाग तीर्थराज जाणून निजानंद वैभव लेखनाज्ञा केली पाहिजे विशष पूर्वी महाराजाचे स्थापिले तीर्थस्वरूप यादवरावजी येथे होते त्यास वैकुंठ लोक प्र॥ जालियावर त्यांचे मागे राजेश्री त्र्यंबकरावजी जावाई येथील आज्ञा आंकित कारभारावर सरकारचे आज्ञापत्राप्रमान होते त्यास हि देवआज्ञा जालियास महिने दहा जाले सांप्रत्य महाराजाचे आगमन आयेकून या प्रांती परम आनंद जाला ते लिहिता पुरवत नाहीं चार पांच वरसापासून अनेक प्रकारे ईश्वर प्रार्थना जयास गेली की माचे आगमन जाले त्यास सरकारचे स्थापिले व सर्व कुटुंबाचा निर्वाह येथे वीस पचवीस वरशापासून म॥चे प्रतापे जाला व तीर्थरूप राजेश्री गंगाधर रावजी पटनीयात आहेत जोवर सुबाचा निवाडा येक सू होत नाहीं तोवर निघण मारग कठिण आहे प्राचीन सरकारचे च व श्रीमंत मा<sup>॰</sup> रा। पंत प्रधान साहेबाचे पदरचे म्हणवितात आता ही भरोसा तीर्थराजात तुम्हास साहेबाचा आहे सेवकाचे वडिलाचे कुतरबा लेकरवाळे सर्वांची चिंता राखून सांभाळ करणार महाराज समर्थ आहेत पूर्वी नवाब गजासिगरोडचा महाल राजश्री दामोधर महादेव वकील याचे नांव म॥चे भयान नवाब मरहुमान देऊन त्या कामावर राव तीर्थवासास होते त्याचे मागे रा। त्र्यबकराव जावाई होते आवदालीचे हंगामेयापासोन ते जागी सरकारांत नवाबाचे जवात आहे त्या मामलती विशई जेव्हा स्वामी लाहोरचे मूहीमवर होते तेव्हा रा। त्र्यंबकरावजीनी सूचना लिहिली होती म॥ आज्ञा केली जे जागीर कोठे ईल समजून घेऊ हे वर्तमान गुरबकश कासीवान सांगितले या विशई येथील यास लि॥ आले पाहिजे यामधे म॥ ची सेवा तीर्थवासी घडून येतो यानंतर आनिक जे जे कामकाज त्यास होते येथील यात्रेकरूचे काम तधनंतर आनीक कितेक विशये होत सर्व सेवकान सूचनापत्र सविस्तर कलले ते लिहिले आहे उतर साभाळ करनार म॥ समर्थ आहेत ज्या प्रमान आज्ञापत्रें येतील ते सर्व रा। काशिराजपंत गृहस्त या दरबारात देत आहेत यांचे म॥ जवाब सवाल केला प॥ जाईल वरकड वृतात सर्व रा। सुजानरावजीचे मुखवचन विदित होईल बहुत काये लिहिणे पदरचे प्राचीन लेकर आहो हा आसीर्वाद

---

ले. ८४ श्रीशंकर

श्रीमंत राजश्री तात्या
स्वामीचे सेवेसि

विनंती पोष्य गणेश नारायेण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल भाद्रपद वद्य ८ स्वामीचे कृपेकरून येथास्थित जाणून स्वकीयें कुशल लेखन आज्ञा करीत आसिलें पाहिजे विशेष येथें श्रीमंत राजश्री दादासाहेबांची स्वारी आली आंम्ही लस्करात सांप्रत आद्यापी आहों हें सविस्तर श्रीमंत राजश्री सुभेदार साहेबांचे पत्रीं वर्तमान लिा आहे त्यावरून श्रुत होईल नासीक परगणांत तमाम दुमाले गांव सुवा थोडा बहूत पैका मागतात आपले गांव देवळाली जाखोरीवरी रोखे हजार रु॥ जाले परंतु राजश्री सखारामपंत बापू जंवली रा। धोंडोबा नाईक नवले व धोंडो दतात्रये वगैरे यांणीं [विनंती] केलियावर मना केले आहेत राजश्री त्र्यंबकराय सिवदेव यांच्या गांवावर वेढास स्वार गेले आहेत राजश्री मोरो + + + + यांजपासून तूर्त वीस हजार रु॥ घेतले राजश्री नारोपंत नानां राजश्री विठलराव तात्या जमात ठेवितात राजश्री बापूच्या भाषणांत कितेक प्रकारें स्वामीवर श्रमी कीं तात्यानीं इतका प्रकार केला आंम्हासिं बोलत गेले आंम्ही विश्वासावर राहिलों दगाबाजी आंम्हासि केली आंसी भाषणें काही ममता काही श्रमी होऊन बोलत आसतात या घटके पावेतों या प्रकारें जालें वर्तमान लिा आहे पुढें कसें होईल काये हें ईश्वर जाणे सेवेसि श्रुत होये लोभ करीत आसिलें पाहिजे हे विज्ञापना

हे॥ श्रीमंत राजश्री आन्याबा व राजश्री बापू स्वामीचे सेवेसिं साां नमस्कार विनंती लिा परिसोन लोभ करीत आसिले पाहिजे हे विनंती

---

ले. ८५ श्रीव्यंकटेशः १६८५ माघ शु.१२ नंतर
१७६४ फेब्रुवारी १४

श्रीमत् रा। बाजी पत मामा स्वामीचे सेवेसि

आज्ञाधारक कृष्णराव गोविद सा। नमस्कार विनती येसीजे माघ शुध १२ मगलवारी श्रीमत रा। आन्याबास लस्करात भेटलो शरीरास मागती या चौ रोजात वाटेचा उपद्रव जाला भोग माझा ईश्वर आरोग्ये करील याचे शरीराचे चिंता दुसर रोजमुरियाचा कजिया तिसरे दरबारची इतराजी खाईन खाईन म्हणोन दादासाहेब येतात मुत्सदी याचां कामे न जाली म्हणोन ते रागे ईशर कैसा निर्वाहा करील सर्वहि दोष येक तात्या स्वामीचे पुन्येकडून दूर होतील येक आरोग्यता अन्यांबा आरोग्य असीली आसमानास थीगळ देईन उभयता समर्थांनी साहेत्यास जवली यावे येकचिते आसली सर्व मनसुबे होऊन येतील रोखा पचवीस हजाराचा पाठविला आसे तो घेऊन आमची चिठी पाठ-

विजे वरचेवर वर्तमान मातुश्री बाईचे व बाबासाहेबाचे व तात्यासाहेबाचे लिहित जावे बहुत काय लि॥ हे विज्ञापना तुम्ही व वडिलानी अन्याबासाठी घोवरे न व्हावे ईश्वर आरोग्ये करील हे विज्ञापना

---

लेखांक ८६ श्री.

राजेश्री गगाधरपंत तात्या गोसावी

यासी

॥छ. अखडित लक्षेमी आलंकृत राजमान्ये श्नो॥ जिवाजी पवार दडवत विनति उपरी येथील कुशल जाणौन स्वकीये कुशल हरघडी लिहिती आज्ञा केली पाहिजे विशेष दयेटन्यामधे तुमची भेट जाली ते वेलेस आपंण सागितले होते की लवकर आटेपून येणे तुमचे सागितल्या प्रमाने आपंण कोपरगावी गगातीरास आलो चिरजीव रा॥ कृष्णाजी पंवार त्याजला कर्जदारानी आडविले त्याजकरता गणेगावी च्यार रोज साहुकाराचे देण्याकर्ता गुता पडला त्यासी आपल्या कडील वर्तमान परस्तुत कलले नाही तर सविस्तर वर्तमान ल्याहवे परस्तुत चादवडीहून कुचे होणार की काये हे वर्तमान ल्याहावे दुसरे श्रीमत दादासाहेव वाहेर निघाले आहेत म्हणून येकतो तर सर्व वर्तमान ल्याहावे दुसरे आमचे दिवान आद्याप पुन्यात च आहेत कागदापत्राचा गुता आद्याप आहे चिरजीव कृष्णाजी पवार त्याजला च्यार रोज गुता होईल येसे दिसते तुम्ही आपल्याकडील सविस्तर वर्तमान लिहिणे बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनती

| |
|---|
| श्री सिवचरणि तत्पर बापोजी सुत जिवाजी पवार नीरतर |

| |
|---|
| मोर्तब सुद |

---

ले. ८७ श्रीगजानन

राजेश्री गंगाधरपंत तात्या गोसांवी यासिं

छ. अखंडितलक्षुमीआलंकृतराजमान्यें स्ने॥ कृष्णाजी पंवार व जिवाजी पंवार दंडवत विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जावें विशेष जंबुकडे हिंदुस्थानांत अज सा वर्षे जाली तिकडे आमंचे पागेची घोडीसुधां बारगीर होत ते इकडे

निभाव घोडीसमेंत होईना म्हणून घोडी विकली आणि रुपये नगद घेऊन देसी येत होत त्यास राजेश्री दादो बचाजी कोरालेकर कुलकर्णी हे स्त्रीसमेंत जंबूस होत त्यांही आमंचे बारगिराचे गलां पडोन कर्जाव रुा घेतले ज्या बारागिरापासोन रुा घेतले त्याचे नांवे खत लेहून दिल्हे आणि आपला गला मोकला केला आणि माळव्यांत येऊन + + + + + + + + आमंचे लोक खते घेऊन देसी आले येकदोन वेला राजश्री पंतमशारनिलें यांस यैवजाविसीं हाटाकिले त्याणी उतर दिल्हे जे देसी जाऊन निकाल करू आमचे बारगिराने वाटेनी हि त्यास निभाऊन आणिले यैसं असता अंता पंत मारनिले गांवास आले आहेत त्याजकडे गोंविदराव गाजरे व येसाजी वखारे बारगीर ज्याचे नांवाची खते आहेत ते मागावयास गेल त्यांसी खटखट करोन फिरोन गोष्टी सांगू लागले बले च फारकती मागत होत जबरदस्तीने भोईं बसऊन फारकती मागत होत त्यास दोन उपास बारागिरांनी केले परंतु फारकती न दिल्ही गोविंदरायाचे खत पंतमार यांणी घेतले वाजबी कर्ज असोन थोंटईच्या गोष्टी सांगतो या करितां तुम्हाकडे रा़ो राघो नारायेण कारकून व उभैतां बारगीर लोक पाो आहेत हे जबानी वर्तमान निवेदन करितील ते ध्यानांस आणून रा़ो दादोपंतास अपले पत्र द्यावे जे वाजबी व्याजसुधां याचे यैवजाचा निकाल करून देणें [कर्ज] दारासी फिरोन गोष्ट सांगितलिया परिणाम सिधीस जाणार नांही तर पत्रदर्शनी निकाल व्याजसुधां करून दणे यैस पत्र द्यावे बहुत काय लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंति

| श्री<br>सावचरणिह<br>डभाव तुको<br>जीसुत कृष्णा<br>जीपवारराव | मोर्त<br>बसुद |
|---|---|

---

ले. ८८ नकल श्रीलक्ष्मीकांत १६८५ माघ व. १
१७६४ फेब्रुवारी १८

राजश्री गंगाधरपंत गोसावि यांसी

॥ आखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रे॥ जानोजी भोसले सेना साहेब

सुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत आसावे विशेष राजश्री पंत प्रधान याचे पत्र ख्वाजमतगारासमागमे निकडीचे आले जे श्रीकृष्णातिरी तुम्हा करितां मुकाम करितो लौकर येणे म्हणोन त्यास आम्ही करारा प्रो यावयाचे तरतुदेत च होतो सरदारी वोडगस्त हे सर्वास आवगतच आहे याचा आर्थ ल्याहावासा नाहीं त्याही मध्यें कलेल त्या रितीनें फौजेची समजावीस थोड्या बहुतानी केली दरकुच यावे इताकियांत बंगालीयाचा सुभा नवाब कासम आलीखान याची पत्रें जाली जे कलकत्याहून मीरजाफर व दुलभराम व फिरंगी यैस चालून येऊन युध्ध केले आपला मोड जाला मकसुदाबाद त्याणी घेतली आपण निघोन श्रीकासीवरी येऊन राहिलो आहो या उपरी तुमचा तहनामा हि आहे जे संकटास उपराला करावा त्यास संकट येऊन प्राप्त जाले आहे अतःपर जलदीनें फौजेनसी येऊन मदत करणें या प्रसंगी तुम्ही आगर फौज येन नाहीं तरी तुमचा पैका चौ सालाचा आपणाकडे राहिला आहे तो बुडाला आसे साफ लिहिले त्यास विचारे पाहता नबाब कासमआली खानाचा उपराला न करावा तरी पैका बिलकुल चौ सालाचा बुडतो तह मोडतों अमल हि उठतो असे संकट येऊन प्राप्त जाले यासी उपाय नाही आपण जावे अगर पांच सात हाजार तऱ्ही फौज त्याजकडे पाठवावी तरी च स्थीत राही निमीत्य बंगालीयाचा ऐवजावरी सावकाराचे गले गोविले आहेत ते बंगालियाचा ऐवज बुडालीय.परी ब्रह्महत्या करतील ऐसी चहुकडून संकट प्राप्त जाले आहे याज कारिता तीकडील येणे महकुफ करून बंगालीयासी फौज पाठवीत आसो खासा मी हि मंडील्या पावेतो जाऊन चिरंजीव राजश्री आपा अगर हर कोण्ही योजून त्यासमागमे फौज देऊन पुढे पाठवू आणी आम्ही मंडलेवाल्याकडे नर्मदे आलीकडील महालचा पैसा दाहा बारा वर्षांचा राहिला आहे तो उगऊन वैशाख आखेर माघारे येऊं राजश्री पंत प्रधान यासी फौजेचे जरूर च असल्यास राजश्री राणाजी कराडे व विष्णाजी रघुनाथ साहा सात हजार फौजेनसी गंगथडीस घासदाणियाचे वसूलास व पंच माहाला कडील ठाणी घ्यावयासी पाठविले आहेत त्यास ताकीद केली आहे जे राजश्री पंत प्रधान याचे आज्ञा पत्र येईल ते समई फौज घेऊन त्याजकडे जाऊन सेवा करणे पोटास मात्र मांगुन घेतील वरकड आमचे लक्ष जे आहे त्याजमध्यें तीलप्राय अंतर नाहीं फौज तरी बोलाविल्यास येईल येक आमचे मात्र आगमन बंगालियाचे कार्यामुळें न जाले याचा विशाद मानतील तरी प्रसंगी तुम्ही आहा कलेल त्या प्रकारे निराकरण करून मर्जी बहाल राहे ते गोष्ट करावी रा छा १५ माहे शाबान * तुम्ही प्रसंगीं आहा दिवस राहिले नाहींत राजश्री मामास सांगोन पत्रे तिकडे ल्याहावी बहुत काय लिहिणे हे विनंती

पो १२ रमजान मुा नाशिक पंचवटी मुा आर्बा सितेन

---

* येथून अक्षर दुसऱ्याचे

ले. श्री. १६८५ फाल्गुन व. ११
१७६४ मार्च २८

नकल

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर येशवंत
स्वामी गोसावी यांसि

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणे विशेष तुम्ही हिसेबाचा फडशा करून तूर्त द्यावयाचा यैवज करार मदार केलात व वेजापूर रावेर येथील सोडचिठ्या द्याव्या याप्रमाणे करार केलेत तुम्ही लग्नास निघोन गेलेत राजश्री मल्हारबा चांदवडास गेले रो रावजी महादेव व कृष्णराव गोविंद येथे आले आहेत यैवजाची तर्तुद काही च नाही नव्या च रदबदल्या करितात यैवजाचे वायेदे रोखा दोहो महिन्याचे मुदतीचा व गायेकवाडावर वराता याप्रमाणें घेऊन आले आहेत तुम्ही करार मदार करून गेलेत सुभेदाराकड काही लडा राहिला नाही त्याणी सारा जाबसाल तुम्हावर हावोलोन ते गेले तुम्ही लग्नास जाऊन उभयेतास येथे पात ते जाबसाल येणेप्रा करितात चिरंजीव रायाची खर्चाची निकड कसकसी ते मसलतीस गुतले आहेत त्याची खर्चाची बेगमीविसी पत्रे येतात हे तुम्हास कळले च आहे ऐसे असोन तुम्ही याप्रमाणे निकालात आणिले हे अपूर्व दिसोन आले तुमच्या करारावरून चिरंजीव रायासि लेहुन पा त्याच्या चिठ्या येतात त्यास त्याजकडे क्षेपनिक्षेप यैवज पाठविला पाहिजे तुम्ही तो यैवजाची तरतूद केली च असेल लग्नाचे कार्य हि होऊन आले च आसल तरी पत्र पावता च करारा प्रमाणे यैवजाचा निकाल करून घेऊन येणे सारांश माहालच्या सोडचिठ्या व रोख यैवजाचा निकाल करून घेऊन सत्वर पाठवणे र॥ छ २४ रमजान सु॥ आर्बे सितैन मया अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती

---

ले. ९०  श्री

यादी निा गंगाधर येशवंत मौजे हिवरें चौढालें पो अंबड येथे श्रीदेवीपासी मंगलवारचा बाजार सुदामत भरत होता त्यास[1] विठल सुंदर याचे गर्दीमुले क॥ व्याहामाडवें यास बाजार नेला पूर्वी कसबे मजकुरीं रविवारचा बाजार भरत होता त्याप्रों हालीं रविवारचा बाजार भरावा मंगलवारचा बाजार श्रीदेवीपासी सुदामत प्रमाणें भरवितील त्याप्रमाणे भरू देणे त्यास आडथला करावयासी प्रयोजन नाहीं व श्री देवीचे यात्रेस डबी विशई वगैरे कोणे विशई तुम्ही मुजाईम न होणे तेथील अमल सुदामत प्र॥ गंगाधर येशवंत यांजकडील कमावीसदार करतील त्यासी करू देणें व मौजे मजंकुरी श्रीच्या बाजारा विशई खटखट करून गांवकरियाची व कमावीसदारांची वस्तभाव नेलीं असेल ती माघारें देणे ये विशई फिरोन बोभांट येऊ न देणे म्हणोन पत्रें

१ यादवराव मोरेश्वर यांसी पत्र की सदरहु अन्वयें व सालमजकूरचा वसूल गांवचा व पुजा देवीपासील व जकातीचा वगैरे घेतला असेल तो माघारे देणे म्हणून पत्र

१ कसबें व्याहामाडवेकार यासी पत्र कीं सदरहु लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणे बोंभाट आलियावर मुलाहिजा होणार नाहीं म्हणोन पत्र

२

---

ले. ९१  श्री.  १६८५ माघ वद्य १०
१७६४ फेब्रुवारी २६

$\frac{१}{२}$

यादी लोकाकडील नालबंदीमध्ये करार मु॥ चांदवड शके १६८५ सु॥ आर्बा सितैन मया आलफ ता॥ माघ वद्य १०  रुपये

५०० पिराजी पिसे निमे वरात सवव

---

[1] विठ्ठल सुंदर याची गर्दी म्हणजे ज्याचें पर्यवसान राक्षसभुवनच्या लढाईत [ १६८५ श्रावण शु. १ = १७६३ आगष्ट १० ] झालें तें युद्ध असावें.

२०० मावजी नरोटे उबाजी नरोटे
७०० विसाजी रोहकळे वरात दिल्ही सबब
२००० सरेखान
१५० माहादजी लबाडे
५०० नारो खंडेराव पैठणकर
३००० रेणको अनाजी
२००० साबाजी सिंदे
१००० साहेबखानं करोल
१००० वीरभानं करोल
५८० बनाजी जाधव व बाबर व्याहामाडवेकर
२००० भगवंतराव कदंम ता विसाजी सामराज
५००० लावहाते गुदस्ताप्रमाणें
ज्यास्त वेल्या सोमाजी लावहाते व संताजी लावहाते घोडी २ करार कलम
१०० येसाजी खंडोजी नागोडे वगैर
१२५ म्हालोजी वार्गळ व दातीर वगैर
५० अनंदराव लहोकरे व सिलेदार
१०० तुलाजी जाधव
२५ धोंडजी तुरकाणें
१६० तावजी थोरात
१४० मकाजी थोरात
१२५ राणोजी वहुळे
३५ मानांजी लावहाते
५० पिराजी पिंगळे
५० सयाजी खडके
४० निंबाजी पिंगळे
२५ मलारजी रायत
२५० कासीबा बेऱ्हाडे
२० सकोजी खोसे
१०० मावळे जदीद हिंगळाजे करिता
४७५ विठोजी सिंदे चोढीकर
५०० बुवाजी चितळकर

४०० होनाजी चितळकर मोरासीकर
२५ येसाजी पारखे जदीद
५०० नवले खडके
५०० सिदोजी वल्द विठोजी थोरात
१५० सकोजी कणसे
२५ कृष्णाजी भागवत
२०० हिंज पाटील वागमारे व लालबेग वलद वागनबेग
१ तुलजाजी होलकर वडलासीच करार कलम
३०० चितळकर कदीम सिवजीचा पुत्र व सोनजी मालजी वगैर
२०० खंडोजी कोलारे
५० भवानजी घोलप
४० नेवजी भांड ( किंवा भांनु असें हि होईल )
३०० खंडोजी, नांमोजी भवानजी बढे

२३६१०
——— खर्च रुपये

१६५ चतुर्वेदी बावा
१२५ खासा
४० समागमी ब्राम्हण वगैर

१६५
१० लक्षुमण खेडकर लमामुळे व तीा आन्याबांच्या दुखणियात श्रम केले सबब
७५ केशोवा शेणवई रवानगीमुळे खर्चास विा विनायेकपंत
१० कर्जदादन मोराजी गाढे याचे आईस ताा गोपाल नाईक

२६०
बाकी रुपये २३३५०
तपसील
५००० ताा लांब हते
२००० ताा विसोबा
६२१० वसूल जाला यैवज
१०१०० वसूल होणे त्याची याद आलादा निा बार

१ निा हरी दामोदर
१ निा गोविंद मुरार
१ निा नारो बालाजी
१ आंबडावर

४

येकून कलमे च्यार रुा

२३३५०

यासिवाये वागमारें बाबूराव यांजकडील यैवज दोनसे देत होते तेथे विसाजी सामराज यांनी घालमेल केली सबब यैवज न घेतला मांडोगंणकर फराटे याजकडील यैवज ब्राम्हणाचे मुंर्जास देविला आसे निंबाजी खटके याजकडील जिवाजी आबाजी याचे विद्यमानें परभारें भाशणांत आणिले यैसे उतर केले भगवंतराव जगथाप वाल्होजीचा पुत्र याजकडील पाच से सिवाये कर्ज येण आसे नारो बालाजी कडून येणे आसेत मिती मार

ले. ९२ श्री. १६८५ फाल्गुन वद्य ११
१७६४ मार्च २८

श्रीमंत राजश्रि तात्या साहेबाचे सेवेसी सेवक जिवाजी धायंबर रामराम विनंति साहेबाचे घरी लग्न सौ मथुराबाईचे जाहाले त्याचे आहेराबा जामदारखानापैकी सनगे घेतली आहेर केला त्याचा करार रुो ४० चालीस केला व सदरहु रुो येक मासाने रोज मिती फाल्गुन वाा ११ मुा नेवासे शके १६८५ सुभान नाम संवत्सरे हे लिहिले सही विा

ल. ९३ १६८६ श्रावण शु. १३
१७६४ आगष्ठ ९

हरी कासी याचे दादाजीस पत्र—

" साडे तीन मास जाले आम्हाकडे आदा रुपये १६०० सोलासे श्रीमंत मामानी पाविले सांप्रत हि पंधरा दिवसा रोजमरा द्यावयासी यैवज पाहिजे म्हणौन नंदराम सेवसी पाा आहे तरी कृपा करून यैवज काही पाठवावा... ... ... ... ... देवाल्याच्या कामाचे वर्तमान श्रीमंत् मामा नासिकी भेटले होते त्यांस सांगितलें आहे ... ... ... ... ... सत्वर सिखर तयार होईल" वगैरे

पौ छ ११ सफर मुा वाफगाव सुा खमस सितैन श्रावण शुध १३

ले. ९४ श्रीमोरया. १६८६ कार्तिक व. ३
१७६४ नोव्हेंबर ११

नकल

राजश्री गोविंद कृष्ण कमावीशदार संवस्थान उदेपुर
गोसावी यांसि

छ. आखडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो * जनकोजी सींदे दंडवत सुा खमस सितेन मया व आलफ देणे रद कर्ज गुा राजश्री गंगाधर येशवंत यांस रुा

| | |
|---|---|
| १४५०० | गुा गंगाधर यशवंत स्वारी पाणीपत मुकाम डीग गुा जानराव वाबले रुा२००००पो रुा |
| १७५०० | समाईक खर्च स्वारी गंगाधर पंत तात्या व चिंतो कृष्ण पाणीपताहून ग्वालेरीस येऊन माघारी आंतरवेदीत गेले तेथे खर्च करणे घेतले कर्ज मुदल<br>२५००० गुा त्रिंबक नाईक मालपुरेकर<br>१०००० गुा धोंडाजी नाा नवाले<br>३५०००<br>पैकी निमे वाटणी होलकर यानी द्य वे रुा १७५०० बाकी निमे । सींदे ते देतील रुा |
| ३२००० | |

येंकुण बतीस हजार रुा तुम्हांकडून देविले आहेत तर संवस्थान मजकुर येथील ऐवजी सदरहु बतीस हजार रुा मारनिलेस पावते करून कबज घेणे जाणीजे छ १६ जमादिलावल बहुत काय लिहिणे हे विनंती

आसल पत्र रवाना राजश्री गोविंद राऊ माा राजश्री कृष्णराव गोविंद सुा देली आतंरवेद आलीकडील थडी

पाो छ. २ जाखर मार्गसीर्ष शुध ५ समंत १८२१ सके १६८६

---

ले. ९५ श्री. १६८६ माघ शु. ६
१७६५ जानेवारी २७

श्रीमंत राजश्री तात्या स्वामींचे शेवेसी

---

* हा तोतया जनकोजी शिंदे.

पोघ्ये चिंतो कृष्ण कृतानेक सां नमस्कार विज्ञाप्ती येथील कुशल ताा छ ५ साबान मुा श्रीगोंदे जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष कृपा करून पत्र पाठविले ते पावले राजश्री सुलतानजी लाव [हाते] याचे बरातेचे वर्तमान लिहिले ते क [लले] त्याजकडे येजमानाचे रुपये उसणे [आहेत]

४००० अंताजी माणकेस्वर [यांज] कडून पाणिपतचे मुकामी देविले होते त्याचे पत्र [मशार] निलेनी दिल्हे होते दत्फरे गेली म्हणोन पत्र गेले नाही तर पत्र च बजिनस स्वामीकडे पाठविले आसेत

१००० ग्वालेरीहून खजीना आणावयास भिडेस राघो हरीकडे पाठविले तेव्हा त्यासि रुपये १५०० दीड हजार रुा दिल्हे त्यापै॥ आले रुा ५०० बाकी येणे

५०००

येणे प्रमाणे पाच हजार रुपये येणे त्यापैा स्वामीस साडेच्यार हजार रुपये देविले आसेत त्यानी बरात मान्य न करावी हे च आपूर्व आसे आपण वडीलपणे त्यासि च्यार गोष्टी उत्त [म प्र] कारे सांगोन रुपये वसूल घेतले पाहिजेत बरात येथे आम्हांजवळ आली नाही उजनीची बरात आ ... ... ... पाठविली च आसेल तेथे मुजरद कासीद पाठऊन येवज वसूल करून घेतला पाहिजे गोविंद विस्वासराउ याचा कारभार सुस्त आहे सक्त तगादा करून रुपये घ्यावे कोणाची च रदबदल न येकावी मुख्य गोष्ट की स्वामीनी आपला हात उगऊन घ्यावा शाहाजी गरुड याचे विसी लिहिले तर येथे आद्याप प्रसंग नाही समयास येजमानास सांगोन साहित्य केले जाईल विशेष काय लिहिणे कृपा लोभ आसो दीजे हे विनंति

---

ले. ९६ **श्री सांब** १६८७ ज्येष्ट व १३
नकल १७६५ जून १६

॥ श्रीमंत राजश्री तात्या
॥ प्रभुवर्य यां प्रति

आश्रित शुभचिंतक रंग जोसी जुन्नरकर कृतानेक आसीर्वाद विशेष अत्रत्य कुशल ज्येष्ट वद्य त्रयोदशी पर्यंत सकल मंडली कुशलरूप असे आपले स्वानंद वैभव लेखन करून निरंतर संतोषाभिवृधि करीत असावे या नंतर आपण कृपा करून माघ मासचे मितिचे पत्र व चैत्राचे मितिचे येसी दोन्ही पत्रें पावोन समाधान जाले श्रीमंत उभयथा कर्णाटकची स्वारी करून ज्येष्ट कृष्ण पंचमीस पुण्यास दाखल जाले चातुर्मास्य जालिया

नंतर श्रीमंत रा दादा साहेब हिंदुस्थानास येणार ऐसा निर्धार आहे कलावें विशेष पूर्वी आपणाकडील ईंद्रप्रस्थ वगैरे मुलकाचा बंदोबस्त होऊन प्रयागाकडे गेलियाचें वृत श्रवण होऊन मनास बहुत उत्छाह जाला * सांप्रत फिरंग्याची अवाई+श्रवण होऊन प्राकृत जनास अनेक कुतर्क होतात परंतु श्रीमंत सुभेदार व आपण प्रताप मुर्ति आहेत यश च घेतील चिंता नाहिं वरकड नवल विशेष काही नाही सविस्तर चिंरजीवानी लिहिलें आहे त्यावरून सर्व ध्यानास येईल पूर्वी आपणास बोहत्या किल्याच्या खर्चाचा प्रकार लिहिला होता त्या वरून आपली मर्जी चिरंजीवावर बहुत दिक् जाली त्यास जे होणें तें अवश्यमेव होतें केवळ अविवेकें करून कोण्ही करीत नाहीं अनायासें सुख दुख लाभअलाभ घडतात सर्व प्रकारे चूक जाली परंतु वडिली सांभाळावें अन्याय पोटी घालणें तो भाग तीर्थरुपाचाच यास्तव अर्जुन भगवद्गीतेत बोलिला ॥ पितेव पुत्रस्य सखेव सख्यु : प्रियःप्रियात्रा ऱ्हसी देव सोढुं ॥ तात्या तुम्ही ज्ञानी आहा पृथ्वीमध्यें तुमच्या लौकिकाप्रमाणें दुसऱ्याचा लौकिक नांहीं गत वर्षी चिरजीवास चांदवडी आपण पुण्यांत चिंताग्रस्थ होते आतां सावकारांच्या कुपेंचांत चिरजीव पडला त्याचा उध्दार आपणा वेगळा दुसरा कोण करील या अन्वयें विनोबा आपा व रा बाजीपंत मामानी सविस्तर लिहिलें आहे

रा गोविंदराव यास आशिर्वाद

( हे सर्व पत्र बालबोध लिपींत आहे. )

---

* या वेळीं रंगोबा दिल्लीच्या आसपास होता. त्यानें आपल्या हालचालींचें १६८७ चैत्र शु० ९ रोजीं ] याप्रमाणें वर्णन केलें आहे [ म. इ. सा. खं. १२ ले. ६८ ].] 'नजीबखानाशीं सलूख जालियावरी आंतर्वेदाच्या मुलखातील बंदोबस्ताकरितां अनुपशहरीं आलों तेथे नबाब सुज्यातदवले येऊन भेटले कितेक प्रकारें निरवालसभाव साहाय होवयाचा करार करून त्याउपर राजश्री सुभेदार साहेब इटावियासी आले येथील काम ...रकोन गंगातीरी मेहंदीघाटांस जाणार".

\+ ही 'फिरंग्याची आवाई' म्हणजे मल्हाररावाचा यमुनेजवळ इंग्रजांनीं केलेला पराभव. त्याचें वर्णन नाना पुरंदऱ्यानें असें केलें आहे" इंग्रजापाशीं तोफांचा मार ...र. तेव्हां लोकांनीं ननन दिलें ( = पलायन केलें )! तेव्हां [ पुढें काय झालें हें ] ...लनच आहे. घर सुटल्यावर मग विचार पाहावा ! मल्हारबा काल्पीस आले. गाजुद्दी... व सुजाउद्दौला यांचें लष्कर ( इंग्रजानें ) लुटिलें. मल्हारबा फार खेद आहेत.' ... ले. सं. नं. ५७५

ले. ९७ श्रीमोरया १६८७मार्गशीर्ष शु. ११
पौ। १६ सावान मु॥ १७६५नोव्हेंबर २२३

( वावडा ? ) प्रांत गोहद

श्रियासह चिरंजीव विजईभव राजमान्य राजश्री माधवराव यासी प्रति येशवंत राव गंगाधर कृतानेक आसिर्वाद उपरी येथील कुशल ता। मार्गसीर्ष शुक्र ११ येकादशी पावेतो मुकाम वाफगाव येथे सुखरूप जांणून स्वकीयें कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष तुम्ही कासिदा बरोबर १५ राखरची पत्रे पाठविली ती पाऊन सविस्तर आर्थ अवगत जाहाला ऐसे च निरंतर पत्र पाठऊन संतोषवीत जावे यानंतर इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्रि दादा साहेब हिंदुस्छानांत जावयाकरिता जनस्छानीहून मुहूर्त करून निघाले ते सत्पशृंगची यात्रा करून षोडष इंद्राई वगैरे किल्याचा समाचार घेऊन दरमजल चांदवड पावेतो आले तेथून पुढे जावयाचा मनसुबा होता तो श्रीमंत रावसाहेबानी सांगून पाठविले की आपली आमची भेट येकवेल होऊन पुढे मनसवा कर्तव्य तो करावा त्याजवरून श्रीमंत दादासाहेबीं तोफखाना पुढ रवाना केला होता माघारा फिरविला टोकियास जाणार तिकडून सिध्धटेकाकडून रावसाहेब हि टोकियास येणार तेथें उभयताच्या भेटी जाल्यानंतर काय मनसवा होईल पाहावा रावसाहेबाचा आशय की आगोधर देशी राहून नजाम आली हैदर नाईक भोसले वगैरे याचा बंदोबस्त करून तदोत्तर हिंदुस्छानांत जावे दादासाहेबाच्या मते उत्तर प्रांतीची मोहीम करावी ऐसे आहे होता होईल ते पाहावें उभयता श्रीमंत येकत्र जाल्या उपर मजला हि तेथ पावेतो जावयाचे आहे वडे व माडंवगण येथील कामाकाजाचें कनिष्ठ श्रीमंतापासी रावजीपंतबावानी आम्ही हटकीले त्यानी करून देतो म्हणून मान्य केले आहे त्यास सांप्रत कनिष्ट श्रीमंत श्रीजेजुरीमोरेश्वर सिध्धटेक या यात्रेस निघाले आहेत आठाचौ दिवसा टोकियास पावल्यानंतर मी हि जाईन श्रीमंत रावसाहेबाचे भेटीस यावयाविसी राजश्री महादाजीपंत गुरुजी याचे हि पत्र आले होते त्यानी लिहिले की आठाचौ दिवसा रावसाहेबाचे पत्र लस्करांत जाऊन तुम्हास पाठवून देतो उपरांतीक भेटीस यावे यैसे लिहिले होते त्यास रावसाहेबाचे बोलावणे आलीयाउपर श्रीमंतासनिध जाऊन विनंती [ पुढील मजकूर गहाळ. ]

---

ले. ९८ श्री १६८७ पौष शु. ५

नकल १७६५दिसेंबर १७

श्रियासह चिरंजीव राजश्री दादाजी यांस बाजी विठल आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। पोष शुद्ध ५ पंचमी पावेतो मुकाम पारोले जाणून स्वकीय कुशल लेखन करीत

असीले पा. विशेष आपण पत्र इंदुरचे कासीदा बरावर पाठविले ते पावले बाहेर निघालों होतों परंतु श्रीमंत रावसाहेब दरमजल बराणपुराकडे गेले हे येकिल्यावर राहिलों म्हणून लिा उत्तम केले आम्ही येथूनही तुम्हास यावया विसीं लिहिले होतें निमित्य कीं इकडे कांहीं दिवस गुंता होईल तो याचे दर्शन घेऊन तुम्ही आम्ही परभारें गोदीस जावे तिकडून नेवासीयावरून कोतुळास जावें त्यास श्रीमंत इकडे फारसे गुंतले नाहींत दर मजल गेले सांप्रत तरी पालापुराहून पलीकडे गेले साबाजी भोंसले दहा हजार फौजे नसीं पुढें आलें आहेत मागाहून राजश्री जानोजी भोंसले ही येणार श्रीमंताचीही फौज दहा बारा हजार पर्यंत पुढे तोंडावर आहे मागाहून तोफाखाना बुनगे फौज सुधां आपण चालिले आहेत श्रीमंताजवळ फौज बरी च जमा जाली आहे मोगला पैकी निंबालकर खंडागले वगैरे सामील लौकर च होणार भोंसल्यावर प्रताप प्रस्तुत बराच आहे वराड तमाम उज्याड जालें आहे मोठें मोठे गांव कोठ आहेत मलकापुरा पासून तीस हजार ह्या खंडणी घेऊन ठाणें बसविलें कळावें देशाहून राजश्री रघुनाथ पंत भाऊ व राजश्री नारोपंत नाना ही आले तुम्ही येणार म्हणोन भाऊनी सांगितले त्याज-वरून चिंता जाली आहे मार्ग आज काल चोरा मुळें नासला आहे आतां न यावे म्हणून आपणास लिहिलें च आहे आम्हीं लस्करांत जावे आसा करार चिरंजीव राजश्री आन्याबा यासी केला त्यास लटिक वाद येईल याज करितां मात्र जाणें दुसरे राजश्री गुरुजीच्या विद्यमानें वरुड मांडवगण येथील कांहीं जावसाल मनास आणावा त्यास चिरंजीव राजश्री आन्याबा आठ दिवस जालें वजापुराजवळ रा नारो-पंत नानास भेटले नेवासीयांस जाऊन शहागडास जाणार तेथून आपले गांव आहेत तेथें जातील च अंबाडात ही जाणे आहे च येकून महिना पंधरा दिवसाचा गुंता त्यांचा तिकडे च आहे तें जालियावर लस्करांत जातील तो पर्यंत आम्ही सैन्यांत कोणाच्या म्हणून आसावें न गेल्यास त्यांची भेटी न जाल्यास लटकेपण येते यास्तव प्रतिक्षा त्यांचे भेटीची करीत होतो तो सांप्रत श्रीमंताचे लस्कर वराडात लांबले मुलूक उज्याड यकेटे दुकटे वाट चालत नाहीं याजकरितां लस्करांत जावयाचा विचार राजश्री भाऊच्या मते राहिला हे आसिर्वाद

---

ले. ९९ श्री. १६८७ पौष व. ३०
१७६६ जानेवारी ११

राजश्री गंगाधरपंत तात्या गोसांवीं यासि

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्ये श्री चिमाबाई सिंदे दंडवत विनंती उपर येथील क्षेम ताा छ २९ माहे रजब जाणून स्वानंद लेखन करावें विशेष चिरंजीव पाटील

बावानीं आम्हास खर्चास राजश्री चिंतो विठल याज कडून ऐवज देविला होता त्याज-पैकीं रुपये ९००० नव हजाराचा हवाला आपणाकडें आला म्हणोन विदित जालें बहुत समाधान पावलों आमची खर्चाची व देणेंदाराची निकड आम्हास फार कांहीं आहे या करिता विठल पंत बुरटे आपणाकडें पाठविले असत तर कृपा करून ऐवज पंत मारनुलेचे पदरीं घालून मार्गस्त करावे आमचें आगत्य सर्व प्रकारें आपणास आहे पत्रीं ल्याहावें हा अर्थ नांहीं ऐवज लवकर देविल्यान आपण च दिल्हासा होईल खर्चा वेचाची अडचण फार आहे चालवणे अगत्य आपणास आहे चिरंजिवाचे दवलतेचा बंदोबस्त तुम्ही करून दिल्हा म्हणोन ऐकिलें फार संतोष जाला सदैव पत्रीं संतोषवीत जावें विशेष काये लिहीणें हे विनंती पौ छ ३ साबान मुा पुणे+

---

ले. १०० श्री. १६८७ माघ शु. १२
१७६६ जानेवारी २२

तीर्थरूप सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाई वडिलांचे सेवेसी

आपत्यें सदासिवाने चरणावर मस्तक ठेऊन सां नमस्कार विनंति येथील कुशल तागाइत माघ शुध्ध १२ पावेतों मुकाम लस्कर दरजागा दर्यापूर खोलापूर प्रांत वराड येथास्थित जाणून स्वकीयें लेखन करीत आसिलें पाहिजे विशप आम्ही मंडळीसह-वर्तमान शुध ४ मंगलवारी मुकाम मजकुरीं सुखरूप पावलो लस्करांत जीवनरावजी भेटले गरुड हि आंवडचे मुकामी येऊन भेटले सामान घोडे माणूस देखणाऊ नाहीं रुपये देऊन फसलो उपाय काय जें सामान वेऊन आलेत त्यातील त्यांत च कर्तव्यता ते केली जाईल श्रीमंत उभयेतांच्या भेटी घेतल्या श्रीमंत राजश्री दादासाहेबांची भेट होऊन साच्यार घडी खलबत जाले कृपा पूर्ववत च आहे सांप्रत च्यार रोज जाले राजश्री जानोजी बावाच्या व श्रीमंताच्या भेटी जाल्या कारारमदार ठहरणे आहे सलहा बहुतकरून जाला आणिक आठापंधरा दिवसांत इकडील बंदोवस्त होऊन श्रीमंत दादा उतर प्रांते निश्चयात्मक हांड्याचे घांटे चालतात कदाचित सलहा बिघडला तर जाणे होत नाही मासपक्षात काय तें कलेल दारकु जासुदा समागमें वडिलाकडे पत्रें पाठविलीं ते आद्याप आम्हापासीं माघारीं न आलीं आपणास पावलीं न पावलीं हें लिहावे दारकु समागमे पत्रें आली ते आपणाकडे पाठविली ते वाचून

---

+ महादजी शिंद्यानें आपल्या आईस म्हणजे चिमाबाईस पंचवीस हजार रुपये कर्जाऊ देण्याबद्दल चिंतो विठ्ठल रायरीकर यास १६ सफर रोजीं पत्र पाठविलें होते. [ म. इ. सा. खं. १२ लें. ७२ ] त्यापैकीं नउ हजार रुपयाचा हवाला गंगाधर यशवंतानीं घेतला होता असें दिसतें.

आम्हाकडे सत्वर पावती ांवी मातुल महायात्रेस जाणार होते त्याचा कैसा विचार जाला कोठें आहेत जाणार न जाणार शोध करून लेहून पाठवावे धान्यसंग्रहा करितां पूर्वी येक दोन वेळा लिहिलें आहे देसी कदाचित राहाणें जाले तर आमचा खर्च भारी पुढे सुभिक्ष होणे कलत च आहे यास्तव खर्चाची बेगमीचा संग्रह आसों द्यावा आम्हाविषी किमपि कालजी न करावी श्रीचे कृपेकरून वडिलाचे असिर्वाद पुण्यकरून सर्व कल्याण येथास्छित होऊन येईल चिंता न करावी

---

लेखांक १०१ श्रीमोरया १६८७ माघ व. १
१७६६ जानेवारी २६

वेदशास्त्र संपन्न राजमान्य राजश्री रंग
जोसी बावा स्वामींचे सेवेसि

विद्यार्थी गंगाधर येशवंत कृतानेक सां॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ ता। माघ कृष्ण प्रतीपदा मुकाम नजीक ग्वालेर सात कोस येथास्थित जाणुंन स्वकीयें कुशळ लेखन करीत गेलें पाहिजे विशेष तुम्हीं पत्र पाठविळे ते उतम समई पावोन दर्शनातुल्य च जाहाळे यैसेच निरंतर येणारा वार्तिका समवेत कुशलार्थ पत्रीं संतोशवीत जाणें यानंतर इकडील वर्तमान तरी राजश्री सुभेदार साहेबीं श्रीमंताच्या प्रतापेकरून दतिया वोडसें वगैरे राजे रजवाडे याच्या द्रीष्टी पाणिपतापासून ठिकाणी नव्हत्या त्या सर्वांस दबाव देऊन झांसीचा किला हस्तगत सिनेजोरी करून राजश्री विरत्रासरात लक्ष्मण याचे स्वाधींन किला व मुलकी बंदोबस्त त्यांजकडील करून दिल्हा या उपरी किले ग्वालेर येथील राजश्री गोविंदपंत सुभेदार येऊन कसवे कोच येथें भेटले त्याजला गोहदवाले जाटाने उपसर्ग देऊन पाच वर्षें मामलत चालो दिलही नाहीं यांस्तव गोहदवाले याचे पारपत्य करावें या प्रांतें आले आसेत गोहदवालयाची ठाणीं गढया आहेत त्यास तंबी पोहचाऊन ठाणी हस्तगत करून गोहदवालयास शह द्यावा शह दिल्हास काही तह मामला जाला तर उतम न होय तरी बळे करून नतीजा घ्यावा हे कार्य श्रीमंत स्वामीच्या प्रतापे सत्वर होऊन आल्यानंतर पुढें जो उपयोगी मनसबा तो करितील या नंतरी तुम्हीं चिरंजीव राजश्री अन्याबा कडील वर्तमान लिहिलें यैसियास त्याच्या योगे करून आमच्या व्रधपणीं श्रमाचा परिहार व्हावा तो योग कोण्हाकडोन हि घडोन येत नाहीं बरें श्रम साध्य आपलें आनुष्टान त्यास यत्न काय करावा चिरंजीवानीं सर्व आर्धा येकीकडे ठेऊंन आम्हास व्रधपणीं विश्रात तें लक्ष धरून वर्त-

लियाने श्री सर्वहि उतम च करील वरकड वर्तमान तर विस्तरे ल्याहावें येसें नाहीं। आमचे लक्ष सर्व प्रकारे श्रीमंत स्वामींच्या चरणारविंदी आहोरात्र आसे येविसी विस्तारे ल्याहावें तर तुम्हीं अंतरसाक्ष असां लोभ आसो दीजे हे विनंती

इहेव सकंभट वेसकिर व सिवाजी विठ्ठल कृतानेक सांानमस्कार विनंती उपरी सदैव येणारा वर्तिका समवेत स्वकीय कुशळार्थ कृपापत्री सांभाळ करणे विहित आसे लोभाची वृधि कीजे हे विनंती

वेदशास्त्र संपन्ये राजश्री बाबू जोसी स्वामीस सांा नमस्कार विनंती पौ छ ९ सवाल आधीक सुा सीत सितैन

---

ले. १०२ श्री. १६८८ अधीक चैत्र शु. १५
१७६६ मार्च २६

सौभाग्यादि सपन्न वज्रचूडे मंडित मातुश्री बाई वडिलांचे सेवेसी आपत्याचा सांा नमस्कार विनंती आजी बुधवारी प्रातःकाली श्रीमंत राजश्री दादा साहेबांचे लस्करातून पत्रे आधीक चैत्र शुध १३ त्रयोदसीची आली त्यांत मजकूर राजश्री सुभेदारांची व सिंदे यांची सडी फौज जाटवाडियांत गेली होती व जाट सिखा सुधा चालून आले युध्य आधीक शुध तृतीयेस मातबर जालें आगोदर त्यांचा पराजय जाला त्याजवर त्याणी निकड केली तेव्हां आपले फौजेने सिकस्त खादली माणूस फार कामास आलें श्रीमंत सुभेदार व तात्या मागें विसा कोसावर होते बाबले बुले राजवले लांभाते त्यांसी दुसरे पाणपत जाले आपली मंडली येजमान साहित सर्व सुखरूप आहेत सिंदे व आपली फौज फिरोन त्यांजवर जाणार हे वर्तमान कलले तेव्हां दादा साहेबांचे त्यांचे पनास कोसाचें अंतर होतें हें कलतां च दर मजल गेले त्यांज बाार हि मातबर फौज आहे आतां शत्रूचा पराभव होईल यांत संशय न मानावा कांही कालजी न करावी चिरंजीव राजश्री आन्याबा व कृष्णराव गोविंद यासी श्रीमंतानी पुढें सुभेदारांकडे रवाना केले त्यांचे पत्र स्वदस्तुरचे आलें कलावें हे पत्र येकांती वाचून वाफगांवास चिरंजीव राा दादाजीकडे रवाना करावे हे विज्ञापना +

---

+ हें पत्र वाजी विठ्ठल यानें लिहिलें आहे.

ले. १०३ श्री. १६८८ अ. चैत्र व. १२
१७६६ एप्रील ६

श्रीमंत राजश्री माधवरावजी स्वामीचे सेवेसी पो। लक्ष्मण आपाजी सां। नमस्कार विनंति येथील कुशल ता। छ २५ सवाल रविवार आपले कृपेकरून यथास्थित असो विशेष आपण पत्र पाठविले तें वांछितसमई पावोन हर्ष जाहला आम्ही पदरचे जो सांभाल कराल तो आपणास योग्य आहे श्रीमंताचे मर्जीचा प्रकार तर गैरवाजवी सोसत नाहीं तथापि हे ईश्वरीस्वरूप याची समानदृष्टी आणि दैववान ताले शिकंदरी जे च्याहातील ते शिद्धीस नेतील सर्व जाण आपण आहेत तीर्थस्वरूपास देशीं निरोप दिल्हा बहुत च संतोष जाहला त्याचें हि पत्र आले होते कर्ज लस्करांत जाले त्यापुरता यैवज हि वरात दिल्ही यैवज हातास येऊन पदरांत पडेल तेव्हां लिहूं असो आम्ही पदरचे च तेव्हा कर्जास यैवज दिल्हा याजवर काय मदार आहे परंतु रावसाहेब त्यांचा भरवसा फार आम्हास होता कीं समर्थाचे पदरी आहेत अलबता च्यार रुपये घरी नेले असतील आणि आपण रिकामे हस्तें जाउ देणार नाहीं यैसे हि होते आपला काय उपाय ईश्वरें देवि नेमिले असते तैसे होते मागील आपले समागमे मेहनत केली याचे सार्थक आपण च आगेमागे करितील हे आमची खातरजमा आहे तीर्थस्वरूप मेहनती कोणे प्रकारचे हे आपले ध्यानांत असेल च इतके मात्र बहुत आहे असो उचित तो च प्रकार आपण केला बहुत काय लिहिणे लोभास ( विस्तार ) असावा हे विनंति राजश्री सुभेदार व शिंदे याणीं प्रतिपदा गुरुवारीं दर्शनास यावे ते दिवशीं अश्विनी नक्षत्र दिवस चांगला येतदीवर्इ राजश्री अन्याबा व बाबा व कृष्णराव यास सरकारांतून लिहिले आहे शिंदे तर बुधवारी आलेच श्रीमंत तात्या गुरवारी येणार होते ते कधीं आले हे लिहावयाची आज्ञा हे विनंति

---

ले. १०४ श्री. १६८८ वैशाख वद्य ४
१७६६ मे. २७.

तीर्थस्वरूप राजश्री जोसीबावा वडिलाचे सेवेसी

विद्यार्थी माधवराव गंगाधर कृतानेक सां। नमस्कार विनंती उपरी येथील कुशल वैशाख वद्य ४ भौमवासर मुकाम लस्कर दर जागा बेरछा नजीक सेवडें प्रांत दतीया येथास्थित जाणुन स्वकीयें लेखन करीत असिले पाहिजे विशेष दिवस जाले आपणाकडील अशिर्वाद पत्र येऊन परामर्ष होत नाहीं यास्तव चित उद्विग्न असे तरी यैसे न करावे निरंतरी येणारा वार्तिका समागमे अशिर्वाद पत्रीं सांभाळीत असावे तेणे करुन चित संतोषातें पावेल तदनंतर इकडील वर्तमान श्रीमंत राजश्री दादासाहेबांच्या व श्रीमंत सुभेदारांच्या भेटी जाल्यानंतर राजश्री महादजी सिंद्याच्या

व श्रीमंताच्या भेटी करून दिल्ह्या असे असतां पेशजी श्रीमंत सुभेदारांचे शरीरी दोन अडी [ च ] मास समाधान नवते दरम्यान गुजरा कडील मुलकी बंदोबस्त ठाणी पेशजीची घेऊन खंडणी घेऊन जाटाचे पारपत्या करिता श्रीमंत सहवर्तमान अलंपुर प्रांत झासी या मुका [ मा ] स अल्यावर श्रीमंत सुभेदार बहुत च काइली जाले देवी मानवी उपाय करून अनुष्ठान दानधर्म बहुत कांहीं केले आयुर्मर्यादे करून गुणास न येतां सेवटी भूमीवर उतरले उपरातीक दुसरे रोजी वैशाख शुध्ध ११ मंगलवारी पावणे-दोन प्रहर दिवस येतां देवआज्ञा जाली समागमे सौ। मातुश्री दारकाबाई व सौ। मातुश्री बजाबाई यानी सहगमन केले विश्वांत धन्य धन्य होऊन येहलोक परलोक उतम गती जाली परंतु परमेश्वरें सर्वांचे छत्र नेऊन बहुत वाईट केले श्रीमंत देखील सर्वजन बहुत शोकार्णवातें पावले भगवत सता प्रमाण काळा-नरूप होणारास उपाय काय अलमपुरी तीन दिवस होऊन आस्ती गोळा-करून रक्षा संपूर्ण बटगीया भरून भागीरथीस पाठविली तेथून कुच करून पांच कोस काळीसिंद नदीवर मुकाम केले येथें काल सातवें दिवसापासोन क्रियेस आरंभ होऊन आज आठवा दिवस जाला येथे आकरे बारे तेरावा दिवस होऊन उपरांतीक गोहद-करांचे पारपत्य करून श्रीमंताची आज्ञा घेऊन देशास फौजेचे बंदोबस्ताकरितां यावे कदाचित श्रीमंत च इकडे फौजा व सरदार छावणीस ठेऊन देशास आले तर समागमे च यावे येसे तीर्थरूपाचे मानस आहे श्रीमंत सुभेदारांचे क्रियेस दीड दोन लक्ष रु[प]ये पर्यंत खर्च करावा येसे तीर्थरूपानी चिती धरिले आहे होऊन येईल अगाध नाही श्रीमंत सुभेदारांची पुण्याई प्रताप थोरं सर्व यथास्थित होऊन येईल चिंता नाही वरकड सविस्तर वृत तीर्थस्वरूप रा। दादाजीस लिहिलें आहे त्याजवरून कलेल सर्व भरंवसा स्वामीचे चरणाचा आहे यांत दुसरा विचार नाही येकांतीचे वर्तमान वो। राजश्री रंग जोसी बाबा यानी समक्ष पाहीले आहे ते तिकडे आले आहेत सवीस्तरे सागतील साराश आश्रय येक आपल्या शिवाय नाहीं आपला आसीर्वाद पूर्ण पदरी आहे तरी सर्व यथा-स्थित च होईल वरकड वर्तमान तीर्थस्वरूपास लिहिले आहे ते शेवेसी विनंती करीतील ते ध्यानास आणुन उत्तरें पाठवावी स्वामीचे भेटीस आडीच वर्षे जाली आता भेटी अंती सविस्तर विनंती केली जाईल बहुत काय लिहीणे कृपा करीत जावी हे विनंती

---

ले. १०५ **श्री मोरया** १६८८ वैशाख शु.१५

श्री मार्तंडजी १७६६ मे २४

तीर्थरूप सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाई वडिलांचे सेवेसी

आपत्यें सदासिवाने व कृष्णरायाने चरणावर मस्तक ठेऊन सां। नमस्कार विज्ञा-पना येथील कुशल वैशाख शुध्ध १५ पर्येत मुकाम अलंपुर नजीक गोहद बारा कोस

येथास्थित जाणून स्वकीये लेखन करीत असिलें पाहिजे विशेष वडिली पत्रें पाठविली तें पावून त्याची उतरें साकाल्यार्थे मुजरद कासीद जोडी देऊ व न वा या समागमे पेशजी लिहिलें आहे त्याजवरून ध्यानास येईल अलीकडील वृत श्रीमंत राजश्री दादासाहेबाच्या सर्वांच्या भेटी होऊन येकत्र जाल्यानंतर गुजराकडील खंडणी चुकऊन वरकड ठाणी व मुलकी बंदोबस्त करून पुढें गोहदचे पारपत्या करितां मुकाम मजकुरीं सर्व आल्यानंतर श्रीमंत सुभेदारांचे शरीरी दोन अडीच मास समाधान नव्हतें च औषध उपाय देवी उपाय अनुष्ठाने दान धर्म श्री सी दर्शनाचा निश्चय सर्व उपाय केले परंतु गुणास न येतां वैशाख शुध्ध ११ मंगलवार पावणे दोन प्रहर दिवस येतां देवाज्ञा जाली ईश्वरें बहुत वाईट केलें सर्वांचे छत्र नेले सर्व कुटुंब देखील श्रीमंत सुभा सर्व मंडळी सानिध्य असतां देहावसान जालें सर्वत्रास शोक बहुत प्राप्त जाला श्रीमंत दादासा [ हेबी कि ] तेक प्रकारें स्तव करून श्रीमंत कैलासवासी + + प्रमाणें मानून शोंक करितात सुभेदारांची पुण्याई थोर योग्याप्रमाणें बहुत शरीरश्रम न होतां मृत्यु जाला सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बनाबाई व सौ मा दारकाबाई उभयेतानी सहगमन केले सर्व जनांत धन्य धन्य जाली उतरक्रिया काळीसींद न-दीवर होऊन पुढे सिष्टाचार जाल्यानंतर गोहदकारांचा वगैरे मनसबा कालदेशवर्तमान-रूप होऊन येईल तदनुसार सेवेसी लिहिला जाईल त्यानंतर स्वकीये अर्थ तीर्थरूपा सानिध्य पेशजीं लिहिल्या प्रमाणे च आहोंत चिरंजीव गोविंदराव व माधवराव ती॥ रा आपा सर्व येकत्वें वडिलांचे आज्ञे प्रा वर्तणूक करून असों पेशंजी वडिलांस विनंति लिहिल्या प्रो किल्याकडील जाबसाल वर्तमान व जामखेडचे व रो त्रिंबक......... व भास्कर जिवाजी बाबत जाबसाल व चिरंजीव अपाजी राम बो जाबसाल सर्व लिहून पाठवावे सींद नदीवर उतरकर्म जाल्यानंतर कर्तव्यता मनसाबियाची होईल ते लेखन होईल शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

सर्वांस नमस्कार आा आशीर्वाद आपत्यें गोविंदानें सीरसाष्टांग नमस्कार विज्ञापना वडिलाकडून बहुत दिवस जाले आसिर्वाद पत्र येऊन सांभाल न जाला तेणें करून चित उदास असे तरी यैसे न करावे सदैव येणारा बरोबर पत्र पा साभाल करीत जावा हे विहित आसे इकडील वृत ती रा आन्याबा व ती रा बापुनी लिा आले त्याजवरोन केलो येईल बहुत कायें लिहिणे हे विज्ञापना ती सौ मा उमा वहिनी व सौ भवानी वहिनीस सां नमस्कार समस्त मडळीस सां नमस्कार सागावा

---

ले. १०६ श्री १६८८ वैशाख व. ४

१७६६ मे २८

श्री सहस्रायु चिरंजीव विजयीभव राजश्री रामरावजी यासि प्रती माधवराव गंगाधर कृतानेक आसिर्वाद उपरी येथील कुशल वैशाख वद्य ४ भौमवासर मुकाम

लस्कर नजिक बेरछ प्रांत दातिया येथाच्छित जाणून स्वकीये लेखन करीत असिले पाहिजे विशष दिवस जाले तुम्हाकडील वर्तमान कलत नाही तर येसे न कीजे हस्ताक्षर पत्र आलिया वार्तिका समागमे लेहून तोषवीत जावे अलस येकरूप न करावा इकडील मजकूर साकल्यार्थे तीा राजश्री दादास लेखन केले आहे त्याजवरून कलेल तुम्ही ते प्रातीचे वर्तमान राजकी वगैरे लिहून पाठवावे वैशाख शुध्ध ११ चे दिवंसी श्रीमंत सुभेदार यासि देवाज्ञा जालि ईस्वर गतीस उपाये नाही वरे असा पुरुष मागे हि जाला नाही आणि पुढे हि होणे नाही केवल दक्षिण हिदुस्थानचे छत्र गेले पुढे पधरा दिवस जाल्यांनतर गोहदेस जाणार तेथून श्रीमंताचे येणे देसी जाले तरी उत्तम च आहे त्या बराबर श्रीमंत राजश्री मालराव बाबासाहेब हि येतील श्रीमंताचे येणे न जाले तरी श्रीमंत मालराव व त[illegible] फौजेच्या बंदोबस्ताकरिता ते प्रांती येणार आहे आल्यानंतर भेट होईल तो [illegible] आसे सर्व भरवसा तुमचा आहे आम्हीं पत्रं तीा दादास व तुम्हास लिहिली आहेत त्याची उत्तरे समर्पक ताा लिहून पाठवावी बहुंत काये लिहिणे कृपा करीत जावी हे आसीर्वाद

---

## ले. १०७ श्रीशंकर.

श्रीमंत् राजश्री गंगाधरपंत तात्या स्वामीचे सेवेसी

विनंति सेवक बापूजी उधव गुा मोकंदम मौजे पिंपलस प्रो चांदवड दिा राजश्री गणपतराव रामचद्र साा नमस्कार विनंती येथील क्षेमं ताा वैशाख वद्य ५ मुा मौजे मजकूर येथास्तित असे विशेष मौजे मजकूर हा गांव मोकदमी कैलासवासी राा विठलराव मल्हार यांची तेथिल बंदोबस्ता विसी पूर्वी वाफगांवी आपले भेटीस रावजी आले होते त्यांस आपण कितेक प्रकारें आस्वासन दिल्हे नंतर आपण राज्यभारामुलें हिदुस्थानास गेले गांवचा बंदोबस्त तैसा च राहिला आपण गेलियावर रावजीहि कैलासवासाप्रत गेले त्यांजमागे राा गणपत रावजीनी गांवकरीयासी दिल दिलासा देऊन गांव आबाद राखिला मधे सन ११६८ अखर सांली आपण हिंदुस्तानातून आले ते समई मौजे पिपंलद टांकली प्रो मजकूर येथील मुकामी श्रीमंत् सुभेदार यांची व आपली भेट गणपतरावजीनी घेतली ते समई हि त्यासी आपण कितेक प्रकारे आस्वासन दिल्हे परंतु गांवचा बंदोबस्त न जाला मागती आपण हिंदुस्थानास गेले ते सांप्रत आले परमं संतोष जाला त्यास प्रस्तुत गणपतरावजी तों साहेब चाकरीमुले फौज घेऊन तालिकोट प्रांती गेले गांव तो तांबरियामुले निंथेवजी स्राा आगांवर पडला याजमुले परागंदा जाला पहल्या गावांचे स्राा सरकारांत भरून घेतले विस्तार कोठवर ल्याहावा इाा सन ११६५ पासून आजतागाईत कमकसर रुपये च्यार हजार तोटा पदरचा दिल्हा पुढे तरी बंदोबस्त ठाणीयातून व्हावा तो आर्थ तो दिसोन न

आला आणि वतनी बाबतची पायेमेली दिसोन आली येसे जाणुन सेवेसी पत्र लि॥ आहे गणपतरावजी तो प्रसंगी नाहीत त्याचे ठांई आपण आहेत त्यास सरांश अर्थ कीं अविंदा राज्यामधें कैलासवासी पंतानी वतन साधिले ते स्वराज्यामधे आपण प्रसंगी आसोन येथास्तित बंदोबस्त न होता वतनी बाबतीची पायेमली व्हावी हे विहित आपले विचारास आले असेल तरी आमचा उपाये काये आथवा साकंल्य मनास आणून येथास्तित बंदोबस्त करून वृतीचा अंष ज्याचा त्याजला अनभवे येसे आपले विचारास आले तरी सेवेसी मी येईन आणि सविस्तर इा ता॥ विदित करीन आज्ञोतर आलियानरूप सेवेसी प्रविष्ट होईन विस्तार वाढऊन बहुत ल्याहावेसे नाही विशेष काये लिहिणे कृपा वृधीते पावविजे हे विनंती

---

ले. १०८ श्री १६८८ वैशाख व. १२

१७६६ जून ४

पो छ ९ मोहरम मु॥ चरोली प्रांत गोहद.

चिरंजीव राजश्री मालवा यांसि प्रती अहिल्याबाई होलकर असीर्वाद उपरी येथील कुशल जाणुन स्वकीये लिहित जाणें तुमंचे पत्र येऊन वर्तमान कलो येत नाही तेणें करून चित उद्विग्न आहे तर येसे न करोव सदैव पत्र पाठऊन सविस्तरे लिहित जाणें अम्ही तुम्हास दोन तीन पत्रे पाठविली आहेत त्या प्रों चिताचे समाधान करावे[1] अता शोक करावयाचा प्रकार नाही सरदारीचा विचार दौलत चालली पाहिजे यास्तव विवेक करून कामाकाजांत चित घालून आव घालावा ज्या प्रों तीर्थस्वरूप कैलासवासी सरदारी चालवीत अले त्याच प्रों तुम्ही पाया घालून त्याच प्रों काम काज चालऊन वडिला प्रों लौकिक होय तेच तुम्ही कराल अता कोता अंदेशा दूर करून उमंदी नजर धरून वडिलाची कीर्ती आहे त्याजपेक्षा तुम्ही अधीक संपादन कराल यांतच तुमचा लोकिक आहे राजश्री गंगाधरपंत तात्याच्या मर्जीनरूप वर्तत जाणें

रा छ २५ माहे जिल्हेज बहुत काये लिहिणें हा आसीर्वाद

मोर्तब
सुद

---

१ मल्हारराव होळकराच्या मृत्यूनंतर हें दुखवट्याचें पत्र अहिल्याबाईनें आपल्या मुलास लिहिलें आहे.

ले. १०९ श्री. १६८८ आषाढ वद्य ३.
१७६६ जुलै २४

नकल

अखंडित लक्ष्मीं आलंकृंत राजमान्य राजश्री
रामचद्र ना [ रा ] येण गोसावी यासिं

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा सबा सितैन मया व अलफ राजश्री गंगाधर येशवंत याणी जुनरात बुधवार पेठेत वाडा बाधावयास काम लाविले आहे त्यास पूर्वी पातशाही रस्तं होता व रस्त्याचे हादीवर दगड पुरातन रोविला होता तो उपडुन त्याजपुढें रस्तियावर सात आठ हांत भींत घातली रस्ता केवल कोता केला त्यास पहिला रस्ता बाद् करून न देंणे ये विसीं पेशजी आनंदवलीचे मुकामीहून तुम्हास पत्रें सादर केले त्या पत्रास हैंगे केलीत यास्तव दुसरे पत्र कर्नाटकचे स्वारीतुन सादर केले त्याजवरून तुम्ही त्याचे घराचे काम बद केलेत त्यावर रा। कुकांजी शिवराम खासा स्वारी समागमे हिदुस्थानांत आले मागे तुम्ही घराचे काम चालवावयासि सागोन चालते केल म्हणोन हुजूर विदितं जाहाले असीयास दोन पत्रे सादर असंत मारानिलेचे घराचे काम चालो देतां हे गोष्ट कांर्याची नसे हाली आज्ञापंत्र सादर केल असे तरी सुदामत रस्त्यावर घर बाधोन रस्ता बाद करीतं अंसतील तरी कामास न ये भींत घालू न देंणे घातली असली तरी पाडून टाकणे येविसीं फिरोन बोभाट येऊ न देणे जाणिजे छ १६ सफर आज्ञा प्रमाण

---

ले. ११० श्री १६८७ पौष वद्य १४
१७६६ जानेवारी १०

पैा छ १५ साबान सीत सितैन
तीर्थ रूप मातुश्री बाई वडिलाचे शेवेसि

आपत्य माधवरायाने चरणावरी मस्तक ठेऊन साा नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ताा २८ छ रजब पूर्णा नजीक दहीहांडे प्रांा वराड येथे वडिलाचे आसिरवादे करून सुखरूप आसो विा वडिलाकडून आसिरवाद पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी सविसतर वृत्त ल्याहावयासि आज्ञा करावी इकडील वर्तमान तर भोसले येथून पंचवीस कोसावर आहेत बराबर फौज दाहा हजार चांगली आहे त्याचे मानस की यकदा खामखा लढावे नाही तर रात्रीस दगा तरी करावा हे मानस आहे पूर्वी काही एक पेचामुले तीर्थस्वरूप रो दादासाहेबानी सलुखाचा संदर्भ भोसल्यासी केला की पंधरा लक्षांचा जाहगीर माघारी द्यावी आणि सलुख करावा हे वडिलाचे मानस होते प्रस्तुत पंधराचे लक्ष वडिलाचे राहिले तीसा लक्षाची जागीर भोसल्यानी माघारी द्यावी

तर च सलुख करावा आसे वडिलासी पके केले आहे* प्रस्तुत वडिलाची मर्जी पुण्यातल्यासारखी आहे वडिलास कलावे भोसल्याचा सलुख वर जाहल्यास वडिलाचे जाणे हिंदुस्थानात होईल जाण्याविषी ही मोठा आग्रह आहे •बहुधा जाणे होईल. आसेच दिसते नवाबा निज्याम आलीखान ही गंगेवर आले असतील त्याणी वेदराहून कुच केल्याचे वर्तमान आले होते सत्वर च तेहि येऊन पोहचतात यात संदेह नाही प्रस्तुत भोसले आंतरयामी नरम च आहेत यावरून आसे हि वाटते की सलुख होईल पाहावे काय होते ते वरकड वर्तमान होईल ते मागाहून शेवेसि लिहीन शेवेसि श्रुत होय हे विज्ञापना

---

ले. १११ श्री. १६८७ माघ वद्य २

पैा छ ३ रमजान

१७६६ फेब्रुवारी ४

तीर्थरूप मातुश्री बाई वडिलाचे शेवेसि

आपत्य माधवरायाने चरणावर मस्तक ठेऊन सां। नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागाईत छ १६ सावान मु॥ खोलापूर येथे वडिलाचे आसिरवादे करून सुखरूप आसो विशेष वडिलाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नाही पत्र पाठविण्यास आज्ञा केली पाहिजे इकडील वर्तमान तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब परवा आदीतवारी हिंदुस्थानांत स्वारीसाठी कुच करून निराले राहिले काल ही कुच होऊन पाच कोस गेले आम्ही हि कुच करून मुकाम मारी आलो येथून नवाब हि पंधरा सोला कोसास आहेत त्यांची आमची भेट दो चहू दिवसी होईल नवाबास पंधरा लक्षाची जागिरीचा करार केला आहे तो त्यासि बोलून आण भाप करून पंधरा लक्षाच्या सनदा भोसल्याबद्दल जाहगिरींचा करार करून देऊ वरकड प्रकार तर आलाहिदा पुरवणीवरून कलेल हे विज्ञापना

---

ले. ११२ पैा १६८७ फाल्गुन शु. २

१७६६ फेब्रुवारी ११

सीत सितैन

पुरा तीर्थरूप मातुश्री बाई वडिलाचे शेवेसि

आपत्य माधवरायाने चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार भोसल्यानी लढावे हा इत्यर्थ करून आले होते परंतु आपली फौज फार जमा जाहली व तोफा ही फारच यास्तव

---

* हे पत्र लिहिण्यापूर्वी एका आठवड्या आधीं लोहारे परगणे बाळापूर येथें माधवराव व राघोबा यांची भेट झाली तेव्हांपासून १०।१२ दिवस दोघांचा मुक्काम एकत्र होता.

नाइलाज होऊन सलुखाचा पैगाम करून सलुख केला तीसा लक्षार्ची जाहगीर माघारी दिल्ही वडिला बरावर हिंदुस्थानात जावयाचे कबूल केले आणीक कितीयेक सालजाव करांज्यास सोडावयाचे वगैरे मोगलाकडील कबूल केले प्रस्तुत नरम च आहेत तीसा लक्षाचे माहलाचा तपसील तरी पंधरा लक्षाची जाहगीर नवाबाकडे जाईल बाकी पंधराची यादी (दि) ली त्यांत भोसल्यास साडे चहूची माघारी दिल्ही कांकी थोडासा त्याचा संतोष आसावा परंतु त्याचा संतोष कलत च आहे आपले तर्फेने त्याच्या संतोषास्तव मात्र दिलही यानंतर ते वडिलाबरावर हिंदुस्थानात जातात परंतु त्याचे ही लोकाचा गवगवा च आहे प्रस्तुत तरी वडिला बरावर गेले आहेत

पै॥ छ १ रमजान

---

**लेखांक ११४** **श्री.** १६८७ फाल्गुन शु. १४
१७६६ फेब्रुवारी २३
सीत सीतैन

तीर्थरूप मातुश्री बाई वडिलाचे शेवेसि

आपत्य माधवरायाने चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता। छ १३ रमजान मुकाम मनरथ प्रांत बीड गंगातीर येथे वडिलाचे आसिरवादे करून सुखरुप आसो विशे वडिली पत्र पाठविले त्यात आज्ञा की तीर्थस्वरुप राजश्री दादासाहेब हिंदुस्थानात जाणार तुम्ही वेगले होऊन पंच महालात जाणार म्हणून ऐकिले तुम्ही तर काही च न लिहिले त्यास सविस्तर वृत्त व बालबोध कागद लिहून शेवेसि रवाना केला होता त्यावरून सर्व विदित व्हावे प्रस्तुत आज्ञा ऐसी त्यास आम्ही खोलापूरचे मुकामाहून तीर्थस्वरुपाचा निरोप घेऊन निराले राहिलो त्यानंतर वडिलाचे कुच होऊन बऱ्हाणपुराकडे भोसल्यासहित गेले पुढे भोसल्यानी समागमे हिंदुस्थानात जावयाकरता करार केला बराणपुरा पावेतो जाणे प्राप्त जाले त्यानंतर भोसल्याचे जाणे न होय वडिली सक्ती करावी तर फौज थोडी रोज दर रोज भोसल्याचा कजीया यास्तव भोसल्यास निरोप देऊन भोसल्याची फौज बरावर दोन हजार घेऊन पुढे आसेरीस जाणे जाहले त्यानंतर ही फौज बहुत करून उठोन आली आसे वर्तमान जाहले आम्हाकडील वर्तमान तर आम्ही दर कुच कारंज्यानजीक आलो येथें नवाब निज्याम दौलाची भेट घेतली परस्परे स्नेहपूर्वक बोलणे होऊन आम्ही व ते आपआपल्या डेऱ्यास गेलो ते हि येक दिवस येथे आले बोलणे चालणे होऊन पुढे हि त्याचा आमचा स्नेह चालावण्याआर्थे बोलणे रुबरू फार लांब जाले सखारामपंत ही होते त्यानंतर दुसरे दिवशी रुकनु-

दौल त्याचे दिवाण येथे आले होते त्यांचे ही इमान प्रमाण जाहले कोण येक गोष्ट पेचाची राहिली नाही यावरून आसे वाटते की सळुक पुढे चालेल आसे च वाटते नवाबास पंधरा लक्षाची जागीर द्यावयाचा करार ठरला होता त्याप्रमाणे सनदा करून दिल्या आमचे माहलाचे गुंते काही होते ते उरकले आता भोसल्याचा व मोगलाचा लढा राहिला वराडात आम्ही रुपये घेतले होते ते नवाबाचे घेतले नाहीत भोसल्याचे घेतले भोसल्याचे मते वराड दुतर्फा तेव्हा आफत व॥ समजून घ्यावी नवाबाचे मानसी आमचा पैसा काही न घेतला भोसल्याचा च हिसा घेतला तेव्हा मुलकात राहिला पैसा आमचा आसा कितेक लढे त्यांचे त्यांचे परस्पर आहेत भोसल्याची यादी लिहून परस्परे लढे उगवावयाचे होते ते तर मध्यस्तीचे रीतीने उलगडून दिल्हे बाकी जाबसाल राहिले याचे फडशास्तव कृष्णराव बलाल ठेऊन आम्ही कुच करून आलो भोसले ही निरोप घेऊन माघारे ( गेले ? ) नबाब समीप आले आहेत परस्पर बिघाडाविसी हऊस राहिली नाही रहश च होईल कृष्णराव हि तोडजोडीस ठेविले आहेत त्यामधे वराड दोघाचे खराब होते यास्तव सत्वरच नबाव गंगातीरास इकडे येतील बोलण्यात हि आसे च ठराऊन ठेविले होते त्यामध्ये करुन सत्वर च येतील आम्ही ही गंगातीरी त्यांची वाट आठ च्यार दिवस पाहावी लागते नवाबाचे हि घरची कामे बीड वगैरे त्यास करणे आहेत ती आमचे इतल्याने करणार यास्तव सत्वर येतील वरकड वृत्त पुरवणी वरून कलेल हे विज्ञापना

---

ले. ११५ श्री. १६८८ अधीक चैत्र शु. १४
१७६६ मार्च २५

रो॥ रामचंद्र नारायण गोरे* गोसावी यासी

सु॥ सीत सितेन मयाव आलफ तुम्हांकडून बहुत दिवस आलीकडे पत्र येऊन वर्तमान कलत नाही तर सविस्तर वृत्त लिहिणे तीर्थरूप मातुश्री बाईचें शरीरी काही ज्वराची पिडा जाहली आहे म्हणोन ऐकिले तुम्ही तरी कांहीं च न लिहिले या वरून अपूर्व वाटते तरी प्रस्तुत कसी प्रकृत आहे ती लिहिणे इकडील वर्तमान तर बावूजी नाईक पळाले याचे वर्तमान पूर्वी लिहिले च होते प्रस्तुत त्याचे पिच्छायावर विसाजी कृष्ण शाहाजी भोसले सर लस्कर पाठविले आहेत नाईक प्रस्तुत सोलापुरी आहेत ही फौज गेल्यावर बाहेरील ठाणी बसतील लोकाचे कबिले बाहेरील तालुक्यात आहेत दस्त करतील व आतील बहुतकरून कीला फितुराने यावासा आहे नाईकाची माणसे व दोघे लेक बारामतीस सापडली आहेत यामुळे नाईकास ही

* हा गोपिकाबाईचा कारकून

मोठा च पेच आहे पाहवे कसे होते आम्ही सत्वरच फौजेस निरोप देऊन गंगापुरास वडिलाचे पाय पाहावयास येतो तुम्हास कळावे जाणिजे छ १३ सवाल बहुत काय लिहिणे

---

ले. ११६ श्री. १६८९ आषाढ वद्य. १

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विठलराव सिवदेव उमदे तुल मुलुक बहादर स्वामी गोसावी यासि

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणे विशेष सांप्रत तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही गोहदेस मोर्चे दिलहे होते तेथील तहाचा बिचार कसा ठरला ते व हिंदस्थानचे वर्तमान सविस्तर लिहून पाठविणे जाणीजे छ १४ सफर सु॥ सबा सितैन मयाव अलफ बापूची रवानगी सत्वर करता म्हणोन पूर्वी लिहिले होते त्यास आद्याप बापू आले नाहीत तरी सत्वर त्यांस हुजूर पाठविणे वरकड त्या प्रांतीचे मनसबयाचा प्रकार कसकसा आहे तो लिहिणे हे विनंती पो छ २५. रजब सन सबा सितैन मु॥ सिख रोदा प्रांत सिकरवारी

---

ले. ११७ श्री. १६८८ भाद्रपद वद्य ९
१७६६ सपटंबर २७

राजश्रिया विराजित राजमांन्य राजश्री बिठल सिवदेव स्वामी गोसावी यासि

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणे विशेष सांप्रत तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी ऐसे नसावे सर्वदा आपणाकडील व तिकडील मनसुबियाचे कर्तव्यतेचे बारकि मोठे वर्तमान लिहीत जावे प्रस्तुत मुकाम कोठे आहे गोहदचा तह जाहला च आसल पातशाहा कोठे आहेत सुज्याउदौला व गाजुद्दीनखान कोणते मनसुबियात आहेत फिरंगी कोठे आहेत जाट व रोहिले कोणते उपद्व्यापात आहेत पुढे विचार काय करितात ते बारीक मोठे वर्तमान लिहीत जाणे जाणिजे छ २२ रबिलाखर सु॥ सबा सितैन मया व आलफ बहुत काय लिहिणे हे विनंती

---

ले. ११८ श्री. १६८८ कार्तिक वद्य ८
१७६६ नोवेंबर २४

पै॥ छ २ रजब सबासितैन

तीर्थरूप मातुश्री बाईसाहेब वडिलाचे शेवेसि

आपत्य माधवरायाने चरणावर मस्तक ठेऊन सां॥ नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता। छ २९ जा॥खर मु॥ कुररंभ येथे वडिलाचे आसिरवादे करून सुखरुप आसो विशेष वडिलाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी शरीर प्रकृतीचे वगैरे वर्तमान लिहावयाची आज्ञा करावी इकडील वर्तमान तर उदईक कुच करून बारामतीवर जातो त्याजउपरी दरकुच महादेव परयंत जातो तेथे च्यार पाच मुकाम करून सखारामपंत मुहूर्तेकरून निघाले आहेत त्यास मिलऊन घेऊन मग पुढे जाउ वरकड मा।र तर नवाबाचा व इंग्रजाचा सलुख जाहला नवाबानी पो। त्यास ईजाऱ्याने दिल्हे व काही चाकरीत दिल्हे त्याची चाकरी थोडी बहुत फिरंगी व गाडदी यानिसी करावी या प्रो। निश्चयात येऊनं सलुक ठरला नवाबाचे मते तूर्त च्यार रुपये मिळाले पुडे पाहत च आहोत फिरंगी याचे मत की आपण ठाणी व मुलुक मिलविला पुढे बनेल तसे करू परस्परे या प्रो। समजल्यात आले आहे परंतु नवाब नाइंलाज होऊन सलुखास कबूल जाहले फिरंगी जबरदस्त त्यासी पुरी पडु देणार नाहीत यास्तव सलुख जाहला ईजाऱ्याचे महालचे आठ लक्ष रुपये ठरविले बाकी माहाल फिरंगी यास चाकरी बद्दल दिल्हे आसे ठरले आहे वडिलास कलावे शेवेसि श्रुत होय हे विज्ञापना

---

ले. ११९ श्री. १६८८ मार्गशीर्ष वद्य २
१७६६ दिसेंबर १८

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री विठल सिवदेव
उमदेतुलमुलुक बहादर स्वामी गोसावी यासि

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष सांप्रत तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी ऐसे नसावे गोहदेवर हला केला परंतु तुम्ही काही च लिहिले नाही आपूर्व आहे आतःपर याचे व तिकडील मतसुबीयाचे व राज्यकारणे कोण कोठील आली याचे पुडे मनसुब करणे कोणता तो सविस्तर लिहिणे जाणीजे छ १५ रजब सु॥ सबा सितैन मया व अलफ बहुत काय लिहिणे तुम्ही दोन च्यार पत्रे पाठविली ती पावली आलीकडे पत्र येत नाही तरी सविस्तर वृत लिहिणे हे विनंती पौ छ २ रमजान नजीक राई रातगड प्रांत वखर

---

ले. १२० श्री. शके १६८८
इ. १७७६

सबासितैन

रोया विराजित राजमान्य राजश्री रामचंद्रपंत गोरे
स्वामीचे शेवेसि

पो बालाजी जनार्दन सां॥ नमस्कार विनंती उपरी गंगापुरास लोक आहेत त्याचा रोजमरा वगैरे खर्चाची नेमणूक करून पूर्वी दिलही त्या सिवाय जाजती खर्च धर्मादाव वगैरे याचे मुले फार होतो म्हणोन पूर्वी तुम्ही लिहिले त्यास नेमणुकी सिवाय जाजती धर्मादाव वगैरे खर्च किती लागतो त्याचा अजमास श्रीमंत मातुश्री बाईस पुसून लिहून पाठविणे हिंदुस्थान व सातान्याकडील वर्तमान लिहून पाठवावे म्हणोन लिहिले त्यास गोहदेस मोर्चे होते त्याची दाहा लक्ष खंडणी होऊन श्रीमंत राजश्री दादासाहेब कालपीचे सुमारे येऊन आंतरवेदीत जाणार सातान्याकडील आधीकोत्तर नाही राजश्री समाधान नवते त्यास आरोग्य जाहले श्रीमंत रो राव-साहेब सुरापुरची खंडणी चुकऊन दरमजल कर्नाटकात जाणार रो बाबूजी नाईक याजकडील तहाचा मार घाटत आहे लवकर फडशा होईल बहुत काय लिहिणे लोभ आसो दीजे हे विनंती

---

ले. १२१ श्री १६८८ पौष शुद्ध ९
१७६७ जानेवारी ८

पै॥ छ २५ सावान सबासितैन

तर्थिरूप मातुश्री बाई साहेब वडिलाचे शेवेसि

आपत्य माधवरायाने चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता छ ७ साबान मुा देवदुर्ग येथे वडिलाचे आसिरवादे करून सुखरूप आसो विा वडिलाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी पत्र पाठवावयास आज्ञा केली पाहिजे इकडील वर्तमान तर सुरापुरची खंडणी पावणे दोन लक्ष जाली गुडगुटे व देवदुर्गच्या खंडणीची निशा होत आहे देवदुर्गची खंडणी पनास हजार जाहली निशामात्र व्हावयाची आहे यका दोन दिवसांत निशा जहाली म्हणजे कुच करून तुंगभद्रावर जाउ गोपालराव बसालतजंगाचे तालुक्यात पांच तोफा समागमे घेऊन आदवानी प्रांताची खंडणी करीत आहेत आम्ही हि याच मुा संक्रात करून तुंगभद्रेवर गोपालरायाचे लगत जातो त्याची ही भेट होईल हैदराचा वकील गोपाळ-रायाजवळ येऊन पोहचला आहे बोलण्याचें लक्ष कलले नाही हैदर नाईक ही पेचात च आहे घाटाखालील लोकाचा पेच थोडा बहूत आहे या उपरी फौजेचे वर्तमान कल-

त्यावर विशेष वाटले आसे आहे आम्ही सत्वर च जातो यंदा लौकर या मुलखात आलो यास्तव खंडण्याचे निकाल लवकर होत आहेत प्रस्तुत आपली फौज पंधरा हजार जमा जाली याज खेरीज रास्ते व गोपालराव व किरकोल शाहाजी भोसले देखील नव दाहा हजार होतील वडिलास कलावे राजश्री बाबूजी नाईकास आणावयास गोविंद सिवराम पा। आहेत त्याचे पत्र आले की यका दो दिवसी किला हवाली करून घेऊन नाईकास मागून सत्वर शेवेसि येतो नाईकाचे करार दोन आहेत त्यासी ठरल्यावर शेवेसि लिहीन वडिली कृपा करून आसिरवादं पत्र पाठवावेयास आज्ञा करावी हे विज्ञापना

---

ले. १२२ श्री. १६८८ माघ वद्य ३
१७६७ फेब्रुवारी १६

पै॥ छ १० सवाल सबा सितैन

ती॥ मातुश्री बाईसाहेब वडिलाचे शेवेसि

आपत्य माधवरायाने चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम त॥ १६ छ रमजान मुकाम सिरे येथे वडिलाचे आसिरवादे करून सुखरूप आसो विशेष वडिलाकडून पत्र येऊन सुखरूप आसे वि॥ वडिलाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी वडिली कृपा करून वर्तमान शरीर प्रकृतीचे वगैरे लिहावयासि आज्ञा करावी इकडील वर्तमान तर परवाचे दिवसी येथे आलो त्या दिवसी मीर हैदराचा मेहुणा बाहेर उतरला होता त्यास पाहिलेच दिवसी हला केला सर्व गोट लुटून घेतला पांच साहा तोफा पाडाव करून खंदकावर मोर्चे कायम केले आपले ही लोक जाया जाहले जवलच्या लोका पै॥ मालोजी पिसाल व सिदोजी घोरपडा ठार जाले दुसरे दिवसी मुडदे निघाले आत राऊत पायदल मिलोन च्यार हजार आहेत तोफा सुरू जाहल्या आहेत सत्वर च वडिलाचे आसिरवादे करून किला फते होईल नाही तर हैदराची मामलत मोठी च होईल हैदर नाईक पटणास आला आहे त्याची फौज सर्व गाडदी मिलोन च्यालीस हजार आहे याज खेरीज मीर फैजुला कोडग प्रांती आहेत ही खबर ऐकून कुमक करील आथवा मामलत फसेल परंतु येक पेच मोठा च आहे पहावे कोणत्या थरास गोष्ट जाती नवाबाकडे हि पत्रे गेली आहेत उत्तर आल्यावर शेवेसि वर्तमान लिहीन शेवेसि श्रुत होय हे विज्ञापना

---

ले. १२३ श्री. १६८८ माघ वद्य ९
१७६७ फेब्रुवारी २३

पै॥ छ. १६ सवाल सबा सितैन

तर्थिरूप मातुश्री बाईसाहेब वडिलाचे शेवसी

आपत्य माधवरायाने चरणावर विज्ञापना येथील क्षेम ता॥ छ २३ रमजान मुकाम सिरे येथे वडिलाचे आसिरवादे करून सुखरूप आसो वि॥ वडिलाकडून आसिवाद पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी वडिली कृपा करून आसिरवाद पत्र पाठवावयासि आज्ञा केली पाहिजे इकडील वर्तमान तर सिऱ्याच्या खंदकावर मोर्चे गेले या उपरी सुरुंगाचा लगाव होत आहे आतील किलेदार याचा वकील आला आहे त्याचे बोलणे हे च कीं मला चाकर ठेवावे पांच लक्षाची जाहगीर द्यावी आणि चाकरी घ्यावी या प्रो बोलणे आहे आम्ही हि करार करून याद पाठविली आहे सत्वरच सिरे हस्तगत होईल कलावे करार मदार ठरल्यावर मागाहून शेवेसि पत्र लिहीन नवाब अद्याप मागे च आहेत खासा नवाब आल्याने कारभारास हिसके फार बसतील यास्तव पांच हजार फौजेनिसी रुकनुदोलास बोलाविले आहे ते ही सत्वर च येणार हैदर नाइकाचे मालमतीचा मार पूर्वी शेवेसि लिहिला जाइ त्यावरून कलले च आसेल प्रस्तुतचा प्रकार तर जे ां सिरे हस्तगत जा ले तेव्हा आम्हास सिरे त्यांस देणे नाही त्यांस तर सिऱ्याविसी आग्रह करण तेव्हा त्याचे पेशकसीचा फडशा हैदरनाइकाने केला पाहिजे कनिष्ठ पक्ष पंन्नास लाख रुपये घ्यावे तेंव्हा दोन्ही फौजेची समजावीस पडेल या प्रो मामलतीचा मार आहे प्रस्तुत गोष्ट आटीस पडली आहे आसे हि असून हैदरखान भिऊन मामलत करील तर च करील नाही तर मनसुब्याचे वाटेने गोष्ट आटीस पडली मुख्य सिऱ्याची आट निशेष प्रस्तुत हैदरखान पटणास आला त्यांस ही पेंच यंदा फार आहेत यामुले न जाणु मामलत करील तर करील वडिलास कळावे शेवेसि श्रुत होय हे विज्ञापना

---

ले. १२४ श्री १६८८ माघ वद्य ११
१७६७ फेब्रुवारी २४
सबासितैन

तर्थिरूप मातुश्री बाईसाहेब वडिलाचे शेवेसि

आपत्य माधवरायाने चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता॥ छ २४ रमजान मु॥ सिरे येथ वडिलाचे आसिरवादे करून सुखरूप आसो वि॥ वडिलाकडे आलाहिदा पत्र लिहिले आहे त्यावरून सर्व ध्यानात येईल इकडील सिऱ्याचा मार तर काल किलेदार गोपालरायाचे मार्फतीने भेटला त्याणे

कुरान उचलून दिल्हे की येकनिष्ठेने चाकरी करीन दुसरे काम सांगाल ते करीन या प्रो बोलण्यांत आले इकडून करार जाला आहे की पांच लक्षाची जागीर द्यावी त्याजमध्ये निमे या प्रांती द्यावी निमे राहिली ती आपले देशांत द्यावी गुरुमकोंडा किला त्याणे सरकारचा घेतला आहे तो त्याचे हवाली ठेवावा किलेदाराने पाच सात लक्षाची जागीर सोडविली आहे ती त्याणे सरकारात द्यावी याप्रो करार होऊन मीरास चाकरीस ठेविला गोपालराव, मुरारराव यांचे हि विचारास ही गोष्ट आली का की हा हैदराचा मेहुणा त्याचा मोठा सरदार मायेचा हा जेव्हा सरकारात आला तेव्हां हैदरास पेच च आहे दुसरे हा काही केवल जेर च होऊन आला असे नाही तो च हैदराचे सोबतीस बेजार नवीन नवीन पारपत्य कोणी ऐकिली नाहीत ती करतो यास्तव पहिला च बेजार होता दुसरे काल लढाईत तोफा गमाविल्या हें हि ठीक न जाले पुढे हैदराजवल जाऊन तो वरी गत ठेवणार नाही हे ही एक कारण तिसरे कारण हे च की गुरुमकोंडा किला सरकारचा मीराने कावा दावा करून घेतला तो हैदर मागु लागला तेव्हां याचे मत की मी हैदराचा आप्त मजवर इतबार नाही तेव्हा चाकरी न करावी हैदराचे मानस यास पेचात आणावेसे होते सारांश जाहला कारभार सरदाराचे मनास आला याजपासून उपयोग कामाचा घडावा आसे आहे होईल ते खरे आन दिवस वाईट दुसरे किल्यातली वस्तभाव निघावयाची आहे. उदईक निशाण जाईल किलेदार येथे च ठेऊन घेतला आहे हे विज्ञापना

---

ले. १२५ श्री. १६८८ फाल्गुन शु. ४
१७६७ मार्च ४

पे॥ छ २१ सवाल सबा सितैन

तीर्थरूप मातुश्री बाईसाहेब वडिलाचे शेवेसि आपत्य माधवरायाने चरणावर मस्तक ठेऊन सां॥ नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता। छ ३ सवाल मु॥ मतागिरी येथे वडिलाचे आसिरवादे करून सुखरूप आसो विशेष इकडील वर्तमान तर मतगिरीकिला घेतला लूट फार जाहली किला काही आसा यावा आसा नाहीं परंतु वडिलाचे आसिरवादे करून मात्र आला पाहता आर्थी पाहाडी किला आसा एका दिवसात यावा असे काही नाही किला फार बिलंदर आहे ईश्वर इच्छेने मात्र आला वडिलास कलावे वरकड वर्तमान मागाहून सेवेसि लिहीन हैदराने वकील फिरून पाठविला आहे बोलणे जाहल्यावर शेवेसि लिहीन कळावे मोगलाची फौज आद्यापी आली नाही येतील वडिलास श्रु ( त )होय बिदनूरची राणी व राजा किल्यात होता ते हि सापडले हे हि मोठे च काम जा ( ले ) आहे कळावे हे विज्ञापना.

---

१६८८ फाल्गुन वद्य ९
ले. १२६ श्री १७६७ मार्च २४
पै॥ छ १६ जिलकाद सबासितैन

तिर्थरूप मातुश्री बाईसाहेब वडिलाचे शेवेसि आपत्य माधवरायानें चरणावरी मस्तक ठेऊन सां॥ नमस्कार विज्ञापना येथील क्षेम त॥ छ २३ सवाल मु॥ चैनराय-दुर्ग येथे वडिलाचे आसिरवादे करून सु॥ आसो विशेष वडिलाकडून आसिरवाद पत्रे येऊन वर्तमान कलत नाही तरी सविस्तर वृत कृपा करून ल्याहावयासि आज्ञा करावी इकडील वर्तमान तर चैनराय दुर्ग पाहडी किला होता त्यास मोर्चे लाविले होते त्यास वडिलाचे आसिरवादे करून किला फते जाहला किला फार उत्तम आहे आता उदईक कुच करून बेंगरुलचे रोखे जाऊ वडिलास कलावे हैदर नाईकाचे मामलतीचा मार तर तो म्हणतो आहे की सीर सरकारात ठेवावी या खेरीज तालुका काही सोडू नये या प्रे॥ त्याचे बोलणे आहे या प्रे॥ करीत असल्यास तीस पस्तीस लाख रुपये घ्यावे या प्रे॥ बोलणे आहे हे न होय तरी आम्ही काही सालजाब तोडीत नाही मग आपले चितास येईल ते करावे या प्रे॥ हैदराचे बोलणे आहे आपले कडील मार तर येथून कुच करून पुढे जातो आणि सत्वरच मामलत फैसल करतो गोष्ट ठरल्यावर शेवेसि मागाहून लिहीन मोगलाची फौज समीप आली आहे त्यास मोगल आल्या आगोदरची गोष्ट उरकतो शेवेसि श्रुत होय हे विज्ञापना.*

---

* येथवर दिलेला मजकूर लिहून तयार झाल्यावर चंद्रचूड दफ्तराचे आणखी कांहीं नवे रुमाल भा. इ. सं. मंडळाच्या ताब्यांत आले. त्यांत गंगाधर यशवंतासंबंधी शके १६६१ पासूनचीं कांहीं महत्वाचीं पत्रें सांपडलीं. तीं या भागांत येणें अवश्यक असल्यामुळे त्यांचा समावेश ले. १२७ पासून पुढच्या पत्रांत केला आहे.

ले. १२७ श्रीभवानी १६६१ अश्वीन शु. १
१७३९ सपटंबर २२

श्रीमंत राजश्री गंगाधर येशवत
स्वामीचे सेवेसी

सेवक रामाजी यादव साष्टांग नमस्कार विनंती उपरि तुम्हास श्रीमंत राजश्री पंत प्रधान याचे तरफेने फडणीस आपण राजश्री मलारजी होलकर सुभेदार याचे तरफेन खासनिसी कुल लिहिणियाचा रोजगार तुमचा हुजुरून लिहिणियाचा रोजगार त्यासी तुमच्या आमच्या समाधाने आपण सर्व लिहिणार ठेऊन लिहिणियाचे कामकाज करीत होतो तुम्ही हि सर्व स्वामित्व लिहिणियाची दखलगिरी राखोन कामकाज करीत होतेस तेरीखाची केद आपल्याकडे राखीत होतेस त्यास दरमियाने तुमच्या मनात संशये आला की लिहिणियाच्या केदा रकमवार वाटून घेऊन स्वामीसेवा करावी आपल्या चितात की जेसे चालत आलों आहो त्या प्र॥ चालावें त्यासी त्याजमुळे करकशा लागला चौघा ग्रहस्तास श्रुत जाले येजमानास श्रुत जाले त्यास येजमानानी आज्ञा केली की आम्हास हीं उभयेता समान येक चितेकरून समानतेने वर्तणु [क] करणे कल्हं न करणे त्याजवरून तुम्ही चौघा ग्रहस्ताच्या विद्यमाने करार केला की तुम्ही आम्ही राजश्रि श्रीमंताचे आगर येजमानाचे चाकर दोघाचा मिलोन रोजगार येक धण्याचे चाकर आणिलेला तर तुम्ही आम्ही लिहिण्याच्या कैद रकमा निवडून दोन वाटे आपण करितो तुम्ही येक उचलून घेणे राहिला तो आपण घेऊ अगर तुम्ही वाटे करणे आपण उचलून घेऊ मग तुम्ही घेणे त्याजवरून तुम्ही केलियास च आपण राजी जालो येक कैद तुम्ही इजाफा मागितली ते हि आपण कबूल केली मग तुम्ही वाटे करून आम्हाकडून येक वाटा उचलिविला येक तुम्ही उचला त्यास साक्ष राजश्री भोजराउ बारगल व दादो महादेउ व मलारजी पिंगले व उदाजी लाबहाते याच्या विद्येमाने जाले बमोजीब यादी येजमानाच्या सिकियानसी त्याजप्र॥ वर्तणु [ क ] करावी यासी जो आन्यथा करील तो श्री देव ब्राह्मणाचा व येजमानाचा अन्याई यादी विराहित मुख्तगत करार दोघानी कामकाज कारभार परवानगी रसानगी दखलगिरी येकमते समानपणे करावी जे लिहिणार आहेत ते च उभयेतानी करार केले दुसरा कारकून ठेवावयासी गरज नाही कारकून जो ज्याचे जानसातीस (?) लागेले त्याचे आज्ञेत राहून सेवा करावी तिलतुल्ये चाकरीत येकानिस्टेने अंतराये करू नये उभयेतानी येकून येकासी अतराये करू नये बहुमान श्रीमंताचे घरी अगर येजमानापासी वगैरे बराबर या सिवाये केद कानु दाखलगिरी आदले लते बराबर कारकून दर कोटे ठिवणे तो येकून येराचे समाधाने ठेवावे आग्रहे न ठेवावे परास्परे यथा आंतराय न करावा

पावती आदां मिलकत अकुत्रिम दोघाच्या विद्येमाने करून येणे प्रा। दर सेकडा हो

५५ राजश्री गंगाधर येशवंत
४५ राजश्री रामाजी पंत

१००

पडल्या पानास तफावत करू नये करील त्यासी श्रीसाक्ष असे हर कोठे दखलगिरीसी कारकून परस्परे ठेवणे तेथे ठेवावे परस्परे येरून येरासी अगर परस्परे जानमातीस आगर सोवतीच्या कारकुनासी मनामध्यें कुजंकावसि न करावी सर्व धदे कैद कानु हाजुरची सरदाराची तुमची आमची येथाविभाग्ये घेऊन वर्तणूक वर्तणूक करावी देवी गतीने पुण्यें पो० जाले तर उभयेताचे हाजुरी आगर सरदारी कैद म्हणावयासी प्रयोजन नाही पदरी राहेल तेच अवघियाचे या केलिया करारासी आतरायें करील श्री *पाहून घेईल वहुत काये लिहिणे सु॥ अर्वैन मया अलफ सिधार्थी नाम संवत्सरे अस्वीन शुध प्रतीपदा नवरात्र हे विनंती कारकून येरू येराच्या आज्ञेत वर्तेल तर उत्तम जर दूर करणे जाला तर उभेयेताच्या विचारे करावा जर नवा ठेवणे जाला तर उभयेताच्या मते ठेवावा हे विनंति +लि॥ प्रा॥ करार असे हे विनती.

---

ले. १२८ श्री १६७५ वैशाख व. ९
१७५३ मे २६

पु॥ राजश्री गगाधर यशवंत
स्वामी गोसावी यांसि

विनंति उपरि मोगलासी इमान दिल्हे असता किले घेणे सर्व प्रकारे योग्य नव्हे दुसरीयाने लबाडी केली तरी तुम्ही ताकीद करावी उफराटे तुम्ही च बेमानी करू लागले हे सहसा योग्य नाही इमानापेक्षा काही अधीक नाही इकडे कलह लाऊन तुम्ही हिंदुस्थानास जावे हे वाजवी कामाचे नाही इकडील नीट करून श्वस्तचीतपणे जावे उतम पक्ष मल्हारबाची भेट व्हावी हे सर्वोतम विचार असे कर्जाबावत पैका मुदती आगोधर येई ते करणे अतरवेदीचा मुलूक आलियास तीन वर्षे होत आली अद्याप हा॥ हातास

---

*येथें श्रीच्या पुढे रिकाम्याजागेंत 'भवानी' हा या पत्राच्या प्रारंभीं लिहिलेला शब्द वाचावयाचा.

+ 'लिहिले प्रमाणे करार असे हे विनती' व पत्राच्या प्रारंभीं श्रीकारा लगत 'भवानी' एवढीं अक्षरें रामाजी यादवाच्या हातचीं आहेत. हें पत्र लेखांक ६ बरोबर वाचावें.

येत नाही कमावीसदारास पत्र पाठविले तर तुमचा उजूर करतात यास्तव तो ऐवज करारप्रा। सत्वर येई ते करणे चिरंजीव दादास पातशाहा वजीराची पत्रे आली असतील कदाचित ते तिकडे गेले असले तर जे मनसब्यास त्यास उपयोगी पडे ऐसी पत्रे परभारे वरचेवर पाठवावी सर्व प्रकारे नीट पडे ते करावे आर्वी तो जाणार नाहीत गेले असले तर मनसब्यास नीट पडे वजीर पातशाहाचा याचा लगाम लागे गेल्यास श्वरूप राही अैसी पत्रे पाठवणे तुम्ही गेले असतेस तर सर्व हि चिरजीवाचे मनोदयाप्र॥ करतेस तुम्हास इकडे कजिया उपस्थित केलात याजमुले जाता नये यास्तव उपयोगी पत्रे पाठवणे तुम्हास चिरंजीव जवल आहेत निरंतर पत्रे येत जात असतील च आम्ही कशास ल्याहावे हे विनंती*

---

लेखांक १२९ श्रीमोरया १६७५ जेष्ठ शुद्ध९
१७५३ जून ९

हिसेब यैवज हुंड्या सु॥ आर्बा खमसेन मया व अलफ रवानगी छ ७ साबांन मु॥ इंदुर

७५००० जैनगरच्या हुंड्या नग २
रां गणेश दीक्षित औरंगाबादेच्या साहुकारावर
२५००० परसरांम किसनदास
याजंवर देवीदास दुलीचंद
यांनी केली
५०००० मलुकचंद मोतीरांम
याजवर बाल किसन
मोतीरांम यांनी केली
———
७५०००
म॥ कनीराम नामजोगच्या
हर येक यैवजी मजुरा द्यावे
७६००० गोविंद बलाल यांजकडुन हुंडी
रां गणेश दीक्षित खरे औरंगाबादेस विठल जोसी रघुनाथ जोसी याजवर
५०००० तालगांव यैवंजी
२६००० अंतरवेद यैवंजी
———
७६०००

---

* ही लेखांक १९ ची पुरवणी असावी.

आवरंगाषाही सुलाखी रोकड

५०००० लक्षमण दिगांबर याजकडील हुंड्या वजीराचे यैवजी अजमगड
व॥ पड नग ८ हरबाजी महादेऊ नवले याजकडे औरंगाबादेस
जमां करविल्यां

पैकी खरी हुंडिया जाली रु ३२५००
हरबाजी नं॥ नवले
आवरंगाबाद बाकी गैर
आदा १७५००

पैकी गैर आदा लक्षुमण दिगांबर व॥ १७५०० बाकी२०७५००

७००० गु॥ लक्षमण दिगांबर
हुंड्या
१५००० परत हुंडी १७५००
पैकी
७००० नव्या हुंड्या

२२०००

८३५४१ गु॥ लक्षमण नारायेण विझे
वरात किलेच्या खर्चा व॥
श्री

२९१५४१

८४५९

ले. १३० श्री १६७५ आश्वीन शुद्ध ९
१७५३ आक्टोंबर १२




आज्ञापत्र राजश्री सदासीव चिमणाजी ता। मोकदम मौजे कणेसर ता॥ खेड प्रा॥

जुंन्नर सुहुरु संन आंर्बा खंमसेन मया व अलफ राजश्री गंगाधर येशवंत उपनाम चंद्रचूड गोत्र विष्णु वर्धन सूत्र आस्वलायेन यांस हुजरून मौजे मजकुर येथील जिल्हेबाव व मोगलाइ अमल सुदामत चालत आला आहे त्या प्रमाणें खेरजि हकदार व इनामदार करून इनाम दिल्हा आहे त्याविसीं मौजे मजकुरास हुजुरची सनद अलाहिदा सादर आहे व सुभांहुन हें अज्ञापत्र सादर केलें असे तरी जिल्हेबाव व मोगलाई अमल सुदामत चालत आला आहे त्या प्रमाणे सालमजकुरापासून मारनिले·कडे अमल देणें प्रतीवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें या पत्राची प्रती लेहुन घेऊन असल पत्र भोगवटीयास परतोन देणें जाणिजे छ ७ माहे जिल्हेज

मोर्त
बसुद

---

ले. १३१ श्री श. १६७५
सन ११६३ फसली स. १७५३

हिसेब पं॥ कोतूल प्रांत गंगाथडी नि॥ रामचद्र मल्हार सु॥ आंर्बे खमसेन मया व अलफ प॥ म॥र सरकार संगमनेर येथील बाबती व सरदेशमुखी तुम्हांस सालगुदस्तां सरंजाम दिल्हा आहे त्याप्रमाणें साल म॥री करार केला असें व मोगलाइ आमल साल मजकुरी तुम्हास सरंजाम दिल्हा असें प॥ म॥र येथील तनखा बेरीज———रुपये

२५९३४।· तनखा
१७२८९॥ यैन तनखा
८६४४॥। जाजती चढ
२५९३४।·

३२४१॥। सरदेशमुखी दरसदे रुपये प्रमाणें आकार रुपये
२९१७६ १२॥

येकुणतीस हजार येक से शाहात्तर रुपये पैकी वजा रुपये

३२४१॥।~ मुकासा नि॥ दाभाडे व पंवार
३३८४ जागीर किल्ले हरिचंद्र गड ब॥ नेमणूक ब॥ रुजु गु॥
६६२५॥।~

बाकी बेरीज सरकार रुपये

२२५५०८=

तपशील

१९३०८।· यैन

३२४१॥। सरदेशमुखी वजाइ

२२५५०८=

बावीस हजार पांच सें पनास रुपये चवल यासी इस्तावा साले वि॥

सन आर्बा खमसैन मख्तां

हक रुजु गुदस्त रुपये

१९११७॥। यैन हिसेब रु॥

१९२९८॥ पकी

वजा जकात आला-

हिदा दिल्हीं आहे

सबब को १८०॥

बाकी रुपये

३००० पथ्या बाबत

२२११७॥।

तपसील

२४५७॥ सरदेशमुखी दर

सदे रु॥ १२॥ प्रमाणे

४९१५ मुकासा बमय बावती

दरसदें रुपये २५ प्रा

२४५७॥ मुकासा दाभाडी

व पंवार निमे

२४५७॥ निमे बाबती

सरकार

४९१५

१४७४५।· जागीर दर सदें रु॥ ७५

प्र॥

३३८४ किले हरिचद्रगड

हक नेमणुक

३३०१ यैन

३६ भेट बमर्रे

सन खमस खमसैन मख्ता व॥

२२११७॥ हक रुजु गु॥

१७५० जाजती चढ

२३८६७॥।·

तपसील

२६५२ सरदेशमुखी दरसद

रु॥ १२॥ प्रो

५३०३ मुकासा बमय बाबती

दरसदे रुपये २५ प्रां

२६५१॥ मुकासा दाभाडी

व पवार निम

२६५१॥ निमे सरकार

बाबती

५३०३

१५९१२॥। जागीर दर सदे

रु॥ ७५ प्रो

३३८४ नमि किले

हरिचंद्रगड

हक गु॥

१२५२८॥। बाकी व

सरकार

१५९१२॥।·

२३८६७॥।

पैकी वजा रुपय

२८५७॥ मुकासा दाभाडें व

पवार

४७बटा
३३८४
११३६१ बाकी सरकार यैवज
४०० मोकासियास
द्यावा
१०९६१ यैन सरकार
११३६१·
१४७४५।·
२२११७॥।·
पैकी वजा रुपये
२८५७॥ मुकासी नि॥ दाभाडे व
पवार
२४५७॥ यैन हिसा
४०० जागीर सरकारचे
यैवज द्यावायाचा
करार
२८५७॥
३३८४ किले हरिचद जागीर
व॥ नेमणुक रुो
६२४१॥
बाकी सरकार यैवज रुपये
१५८७६।
तपसील
२४५७॥ यैन सरदेशमुखी आलाहिदा
१३४१८॥। येन रुपये
१५८७६।·
पैकी वजा माहाल म॥र
२५० कमावीसदार
२५० मजमदार
६०० प्यादे अ॥ २० दर अ॥
रु॥ ३ प्र॥ येक माही ६०
दस माही आकार
१५० बाजे खर्च

२६५१॥ वाटणी निमे
२०६ जागीर पैकी
२८५७॥·
३३८४ जागीर किले हरिचद्र
हक रुजु गुदस्त
६२४१॥
बाकी बेरीज रुपये १७६२६।·
तपसील
१४९७४। यैन रुपये
२६५२ सरदेशमुखी आलाहिदा
१७६२६।·
पैकी वजा माहाल म॥र
२५० कमावीसदार
२५० मजमदार
६०० प्यादे अ॥ २० दर अ॥
रु॥ ३ प्रा येक माही ६०
दस माही
१५० बाजे खर्च
४०० सरदेशमुखी बाबतीचे
माहाल म॥र
२५० कमावीसदार
१५० प्यादे अ॥ ५ दर
अ॥ ३ प्रमाणें येक
माही रु॥ १५ येकून
दस माही
४००
१६५०
तपसील
१८३ माहाल म॥र सरदेशमुखी
१४६७ बाकी सरकारपैकी
१६५०
बाकी बेरीज निवल सरकार
१५९७६।·

४०० बाबती सरदेशमुखीचे मा-
हाल मा।र
१५० कमावीसदार
१५० प्यादे अ॥ ५
येकमाही १५
य॥ दशमाही
———
४००
———
१६५०
तपसील
१८३ माहाल मा।र सरदेशमुखी
१४६७ बाकी सरकारपैकी
———
१६५०
बाकी निवळ वेरीज रुपये *
१४२२६।·

सदरहु प्रा पांच सालें इस्तावा भरून द्यावा आफत पडिली तर मजरा पडेल पेस्तर साल दरसाल यैवज भरून द्यावा

---

ले. १३२ श्रीलक्ष्मीकांत १६७५ भाद्रपद वद्य १०
१७५३ सपटंबर २२

शिका

अज्ञापत्र सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा तां मोकदमानी मौजे उमाळी पा। मलकापूर प्रांत वराड सु॥ आर्बा खमसैन मय

---

* येथून पुढे सीत खमसेनचा मस्तां २५६१७॥ व सबा खमसेनचा मस्त २७३६७॥ रुपये याचा तपशील दिला आहे. परंतु त्याची कल्पना येथवर दिलेल्या तपशीलावरून येण्याजोगी आहे. या मुळें तो भाग येथें गाळला आहे.

आलफ मौजे मजकूर पेशजीच्या मोकासीयाकडून दूर करून हालीं राजश्री गंगाधर येशवंत दिमत राजश्री मल्हारजी होलकर यांजकडे मुकासा दिल्हा असे तरी तुम्ही यांसी रुजु होऊन मौजे मजकूरच्या मालसायेरं जकात कुलबाव कुल कानु देखील नजर घांसदाणा दरोबस्त मुकास बाबेचा वसूल माारनिलेकडे देणे जाणिजे छ २४ माहे जिल· काद मोर्तबसुद




---

ले. १३३ श्रीमोरया. १६७६ माघ शुद्ध १३
१७५५ जानेवारी २६

वेदशास्त्र सपंन्न राजमान्य राजश्री पौड्रिक गणेश दीक्षित खरे स्वामीचे शेवेंसी विद्यार्थी गंगाधर येशवंत सा। नमस्कार विनंति उपर येथील कुशल माघ शुध त्रयोदसी परियेत स्वामीच्या आसीर्वादे करून येथास्थीत आसें विशेष राजश्री सुबेदाराचा यैवज देणे त्याचा भरणा स्वामीकडे केला त्या पैकी सवीस हजार + + होते ते सरकारातून नेमणूक करून घेऊ परतु त्याचा यैवज पाविला पाहिजे राजश्री विष्णु माहादेव याजंला त्यानी यैवज देविला त्यासि त्याजकडे भरणा जाला तुम्ही यैवज दिलहा येंकूण तीन लक्ष त्यामधें गैर आदा जाला येवज आपण दिल्हा नाही म्हणून मारानिलेचे पत्र आले यैसियासि कनीरामाच्या व गोविदपंत व लक्ष्मण दिगंबर याज बा। हुंडिया पाठविल्या तो येवज याचा भरणीयाचा आहे याज करिता तीन लक्ष बाकी राहिली ते मशारनिलेनीं धोंडीवा नाईक नवले याजकडें जमा करविला आहे त्यांजला यैवज देऊन सरकारची आमच्या नावची कवजे आहेत ते घेणे आणि लिहिल्या प्रमाणे यैवज तीन लक्ष बाकी राहिली ते देणे येविसी फिरोन बोभाट न ये ते करावे तुम्हापासि येवज जमा केला न केला त्याची परिचित पाहावयासि राजश्री विष्णु माहादेव याकडे रा। धोंडोवा नां। नवळे यांचेथे जमा करावे म्हणून राजश्री सुबेदार साहेबी आज्ञां केली त्यासि साहुकारीस आवघड काये आहे तरी नाइकाचेथें जमां करून कवजे घेणें व आमंचे हि कागद पावर्ता विष्णुपंतापासूनं घेणें वरकड कोणें विशीं चिंता नं करणें आमंची सचोटी राखणे बहुत लिहिणे तरी स्वामी सुज्ञ आसेत सके १६७६ भावा नाम सछरे हे विनंति

---

ले. १३४ श्री. १६७८ कार्तिक वद्य १४
१७५६ नोव्हेंबर २१

राजश्रिया विराजितं राजमान्य राजश्री गंगाधर येसवंत स्वामी गोां

पेाा बालाजी बाजीराऊ प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्हाकडे कमाविसीने गांव दिल्हे त्याचा मख्ता बितपसील

काा नेवासे बु।। बमय बहीर व वाडी प।। मजकूर येथील बाबती सरदेसमुखीचा मख्ता रुपये

२१०० संन सबां

२४८३।- सन समान

पुढें सन तिसापासून सालदरसाल चोविस शे सवात्र्यासी चवल प्रो करार

४५८३।=

येणेप्रमाणे पंचेताली शें सवात्र्यासी चवल दुसाला करार पौ सबा येकवीसशें व समान चोवीस शे सवा त्र्यासी चवल सालाचे साल निमे यैवज माघ मासी व निमे अखेर साली याप्रमाणें सरकारांत जमा करीत जावें पुढे संन तिसापासून चोविस शे सवात्र्यासी चवल दरसाल सदरहू प्रो दो हफ्तीयानी सरकारांत देत जावे यैसा करार

जागीर मार्कंडा निाा कृष्णराव गंगाधर यांजकडे कमाविसीने गांव त्याचा मख्ता रुो

२१४० मौजे मुगटी सवाई पाा सोनगीर दरोबस्त अमल जागीर मोकासी बाबती सरदेशमुखी सुधा

७२२८- न

९०।- सर देशमुखी

८१२।।

यास मक्ता साले

६०० संन सबा

७२५ सम

८१५ तिसा पुढे दरसाल आठशे पधरा

२१४०

८३५ पाा भामेरपैकी गांव अमल मोगलाई जागीर जाहा (ला) टके वराडी

१०९१।। का। छडींवले

६१०।। मौजे वडेल दरोबस्त

७६।। मौजे मलई दरोबस्त

३०८।।। मौजे परतापपूर

२०८७।

दर रुाा टके १।।। प्रमाणे रुपये

११९२।।=

पौ वजा मुकासां व बाबती दर सदें रुा।

३० प्राा

३५७॥= बाकी रुपये ८३५
मक्ता दरसाल सबा पासून आठशें पच-
तीस दरसाल देत जावे

---

२९७५
येणे प्रा येकूण तीस शें पंच्याहातर पैकी
सन सबा चौदा शे पचतीस व संन समान
पंधराशें साठ व सन तीसां सोला शे पनास
करार केले असेत याची हफ्तेबंदी दर
साल निमे माघ निमे अखेर साल येणे
प्रो वसूल देत जावा पुढें दरसाल साडे
सोला शे प्रो देत जावे

येणे प्रमाणें सरकारात यैवज ध्यावयाचा करार केला असे सदरहूप्रा॥ साल बसाल हफ्तेंबदी बरहुकूम यैवज सरकारांत पावता करून पावलीयाचे जाब घेत जां॥ तेणेप्रमाणे मजुरा पडेल *जाणिजे छ २७ सफर सु॥ सबा खमसैन मया व अलफ बहुत काये लिहिणे हे विनंती

---

ले. १३५ श्री. पौं १६८० श्रावण शु. १०
१७५८ आगष्ट १४

राजश्री महिपतरावजी कवडे सुभेदार
गोसावी यासि

छ. अखंडित लक्ष्मी अलकृत राजमान्य श्री गोविद बलाल आसीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केले पाहिजे विशेष आपण कृपा करून पत्र पाठविले ते पावोन परम संतोष जाहाला राजश्री मल्हार राम याणी नालीस लिहिली की गोविद केशव चालीस कोस धावोन येऊन गंढीत सिरत होते तर अैसे कोणी बेइमान नाही जे गंढीत जाऊन सिरले तशामध्यें ते कोणी दुसरे पर दरबारचे नाही आणि आम्ही हि कोणी दुसरे नाही जे गढी बलकाऊन बसावे येथे सनदेचा कारभार आम्हाकडे सरकारचे किले गढ्या शतशा आहेत केवल आम्ही कोठील जमीदार आहो अैसा अर्थ नाही गोविद केशव वहिलीस असतात तेथून देवरी सात कोस आहे तेथून सनद घेऊन देवरीस गेले गावा बाहीर राहिले दुसरे रोजी जाऊन मल्हारपंत भेटले सनद पाहिली त्याजवर च्यार रोज गडबड केली तदनंतर गावगनाचे

---

* येथून अक्षराचें वळण निराळें.

पाटील रुजु करू लागले पंधरा दिवस निमे परगणा रुजु जाहाला सोलावे रोजी नौबत वाजविली आणि गोविंद केशव यांस सांगोन पाठविले की तुम्ही उठोन जाणे नाही तर तुम्हासी कजिया होईल त्याजवर गोविंद केशव उठोन वहिलीस आले आणि आम्हास गोविंद केशव याणी याप्रो वर्तमान लिहिले की मल्हारपंती प्रथ (म) सनद मानिली पंधरा रोज पावेतो काही पाटील रुजु जाहाले काहीसे रुजु होणे राहिलें तो मल्हारपंती नौबती वाजऊन आम्हास सांगोन पाठविले की तुम्ही उठोन जाणे नाही तरी तुम्हांसी कजिया होईल त्याजवरून आम्ही देवरीस उठोन आलों त्याजवरून आम्ही उपदगडचे देवरी वरून सहज पुरीस आलो मल्हारपंत भेटीस आले आम्ही त्याजला सांगितलें की तुमचे खांवदाने सनद दिलि ह्या उपरी तुम्ही उजूर करावा हे उतम नाही ज्याची जागा त्याणे च आपली सनद करून दिल्ही यावर तुम्ही काय निमित्य उजूर करितां त्याजवर त्याणी करार केला की जागा रयत सर्व रुजु करून देतों गौर झामरे याची गढी व चवर पाट्याची या दोन हि गढ्या मात्र पंधरा रोजानी आम्ही देऊ त्याजवर आम्ही मान्य केले पंधरा रोजानी नाही वीसा रोजानी देणे तुम्ही खावदांची सनद पाहोन जागा स्वसंतोषे दिल्ही आम्ही हि कबूल केल्यानंतर तुम्ही गढ्या पंधरा रोजानी देऊ म्हणता त्यास वीस रोजानी देणे चिंता काय आहे त्याजवर रयत रुजु करू लागले आम्ही रहिलीचे मार्गे बुदलखंडांत आलो आज आपलें पत्र आले त्यांत याप्रो लिहिले आले की गोविंद केशव चालीस कोस धावोन येऊन दगा करून गढींत सिरत होते आणि रहिलीकडील रयत पलोन देवरीचे जाग्यांत आली त्यासी अकस करणार म्हणोन रयत तजावजा जाहाली ऐसे कितेक प्रकारे रा मल्हारपंत याणी लिहिलें त्यास ते तों आमची नालीस लिहितील परंतु तुमचा आमचा स्नेह तुम्ही घर जाणून जागा आमचे हवाली केली आम्ही हि तुम्हापासी करार केला त्यास प्रथम च जागा उजाड जाहालीवर मग पुडे मामलत काय होणार पहिली आबादानी आहे त्याहून आणीक दुपटीने आबादानी करावी तेव्हां जागा आबाद होऊन पैका मिलेल आम्ही हि मामलती च करीत आलो केवल आज मल्हारपंतांचे लिहिल्यावरून हे गोष्ट आपण प्रमाणांत न आणावी आम्ही आज येक आपणापासी बोलावे आणि येक वर्तावे असा प्रकार नाही ज्याप्रो आपणासी करार केला आहे त्यास अंतर होणार नाही पहिली रयत आहे त्याहून आणीक रयत दुपट आणून परगणियाची लावणी उतम प्रकारे करवितो आपण चितांत तिलमात्र संशय न आणावा मल्हारपंत आपणास अकसाने नाना प्रकारे लिहितील तर ते थोर च आहेत आपण किला सरकारांत ठेविला आम्ही कबूल केले जो किलेदार राहील प्यादे राहातील त्यास आपण येवज जो नेमून देतील त्याप्रो देऊन आम्हास किला घेऊन जमीदारी करणे नाही सरकारचे किले गढ्या आम्हाकडे शतशा आहेत परंतु खावदांचे सनदेने च आहेत आणि ज्या दिवसी खावदांची आज्ञा होईल त्या समई त्यासी आम्हास संमंध काय असे असोन मल्हारपती लिहिले की गोविंद केशव चालीस

कोस धावोन आले किल्यात दग्याने सिरत होते त्यास आम्हास किल्यासी संमध काय आधी रहिलीहून देवरी किती कोस आहे हे च मनास आणावे देवरीतील येक आसामी आम्हासी नलगे याहून जाजती रयत आणुन जोत करवावी तेव्हां आबादानी होईल मल्हारपंत आपणास आमची नालस नानाप्रकारें लिहितील त्यास आपला येक कारकून तेथे पाठवावा तो सर्व चलण पाहोन जाईल रयत आणीक आणुन वसवितो की परगणा उजाड करितो कजिया आम्ही आज पावेतो केला असेल नसेल ते सर्व पाहोन जाईल म्हणजे तरी प्रत्यये येईल आह्मी आपणासीं करार मदार केला आहे त्यांत तिलमात्र फेर पडणार नाही गौर झामरे व चवर पटयाची आपण गढी देविली परंतु ते सनद न मानिता पंधरा रोजी देऊ महिन्याने देऊ म्हणतात आणि अद्यापि गढ्या देत नाहीत परंतु आम्ही तिलमात्र कजिया न केला असे असतां उलटे ते च नालीस लिहितात अपूर्व आहे आपली खातरजमा असों द्यावी बोलिल्ये वचनास फेर पडणार नाही गौर झामरे व चवर पाठ्याची दोन हि गढ्या आम्हाकडे सत्वर देत ते करावे मल्हारपंत याणी नाना प्रकारें लिहिले त्यांस येथे तिलमात्र कजिया नाही त्याजकडे प्रथम मामला होता याजकरिता मन मानेसे लिहिले आणि पुढे हि लिहितील परंतु आपण तिलमात्र चिंतांत न आणावें रहिलीहून देवरी सा कोस आहे आणि चालीस कोस धाऊन गढीत सिरत होते म्हणून लिहितात गढी तुम्ही आपली सरकारी ठेविली आम्हास रुबुरु सांगितले असतां आम्ही कजिया करूं हे कसें घडेल आम्ही लिहिले हें प्रमाण पाहावयास येक कारकून देवरीस पाहावयांसि पाठवावा म्हणजे येथील चर्यास पाहोन जाईल आम्ही गढीवर चालीस कोस धावोन गेलो किंवा रहिली रयत देवरीचे जाग्यात आहे त्याविसी कोणे गोष्ट हि बोलिला असेल आणि आबादानी कसी होत्ये किंवा जागा उजाड करितात हे सर्व ध्यानात येईल आणि मल्हारपंती लिहिले आहे यात येक गोष्ट खरी जाहाली तर आम्ही लिहिले हे सर्व लटके आणि त्याणी जे लिहिले असेंल ते च प्रमाण मानावे जरूर जरूर येक कारकून पाठवावा आमची शफत असे आधी येक कारकून येथे पाठऊन द्यावा येथे कोणी रयतीसी बोलत नाही चहूकडून रयत आणविली ती येत आहे आबादानी उतम होईल चिंता तिलमात्र न करावी गौर झामर व चावर पाठे दोन गढ्याविसी सत्वर त्यास लिहोन गढ्या आम्हाकडे देवाव्या *आम्ही आधी कोणी हि कामात पडणार नाही ज्याप्रमाणे बोलिलो त्यात तिलमात्र आंतर न करून आपण गढी देविली मल्हारपंत याणी चार दिवस बोढुन धरिले न देत परतु कजिया आम्ही न केला महिनेभराने द्या काही फिकीर नाही या जागियाविसी तिलमात्र चितांत शशये न आणावा जर चितात शशये आला आसेल तर इतबारी कारकून पाठवावा रा मल्हारपंत याणी लिहिले त्यात येक हि गोस्ट खरी करून त्याणी द्यावी म्हणजे सर्व त्याचे खरे आम्ही तिलमात्रं बोलिले वचनांत तफावत करणार [ नाही ] कसबा देवरी किलेदाराकडे

* येथून पत्र संपेपर्यंतचें हस्ताक्षर गोविंदपंत बुंदेल यांचें आहे.

दिली त्याप्रा दिल्ही जमा बाधोन त्याचे हवाली करून त्यानी वसूल घ्यावा व किले-याची मरमत करून साहित्य करून जेमी बदीस जागा जतन करून येथील फिकीर न करावी आपण देवरी सरकारी ठेऊन किलेदार ठेविलात त्याचे साहित्य उतम करून राजी करून त्याचे व पत्र रजावदीचे येईल बहुत काये लिहिणे कृपा लोभ असों द्यावा हे विनती

पौ मिती श्रावण शुध १० दशमी शके १६८० मुा पुणे

---

ले १३६ | श्री | १६८१ वैशाख वद्य २
१७५९ मे १४

श्री राजा शाहु चर
णि तत्पर सदाशी
व चिमणाजी
निरंतर:

आज्ञापत्र राजश्री सदासिव चिमणाजी तां मोकदम मौजे वरुडे ता खेड प्रांत जुनर सुा तिसा खमसेन मयां व आलफ रामाजी सिवाजी व मल्हार गोविंद कुलकर्णी मौजे मा या हर दोजणास सुभां पुणियांस आणून सरकारचे आज्ञेवरून पुरसीस केली त्रिबक रघुनाथ कुलकर्णी मौजे मा हा सुभां फिर्याद आहे तर याचा तुमचा भाऊपणा कसकसा आहे तो सुभां लेहून देणे म्हणौन आज्ञा केली आसता सुरलीतपणे भाउपणियाची हकिकत लेहून न देत थटाईस येऊन उभयता पौ रामाजी सिवाजी गैरहजीर जाले मल्हार गोविद याचे पारपत्य करावे तर ब्राम्हण याजकरितां मौजे मजकूरचे कुलकर्णपणाचे वतन सुभा जप्त करून कुलकर्णपणाचे गुमास्तगिरीवर कारकून राजश्री गोपाल भास्कर यास पाठवा-षयाची आज्ञा करून हे आज्ञापत्र सादर केले आसे तरी मारनिले कारकून कुलकर्णाचे कामाकाजावर पाठवितील त्याचे हाते कुलकर्णपणाचे काम काज घेणे व गांवात कुलकर्णी याचे मुशाहिरी याची वाढ आसेल त्याप्रमाणें मुशाहिरे याचा यैवज देणे जाणिजे छ १६ माहे रमजान

मोर्तब
सुद

ले.१३७ श्रीगजानन १६८१ कार्तिक वद्य १३
१७५९ नोव्हेंबर १७

राजेश्री गगाधरपत तात्या व ता राजेश्री अनदराव अन्यां गोसावि यांसि

छ अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्ये श्रो जानराव वाबले दडवत विनती उपरी येथील क्षेम तां कार्तीक वद्ये १३ मुा सुकरतलाव श्रीभागिर्थीतीर जाणून स्वंकीये लेखन कीजे यानंतर पेसजी पंत्र महतपूरच्या मुकामचें अले त्याजअलीकडे काही च वर्तमान कलत नाही तंर सविस्तंर वर्तमानं लेहून पाठवावे येथील वर्तमान श्रीमतानी नजीबखानांस येढा घातलां अहे त्याने खल्यां व श्रीगगां पाठीसी देऊन बैसलां अहे मागे येक दोन वेलां तो बाहीर निघांला होतां त्यास सीकस्त करूनं बरे वजनं गोटात घातला त्याजवर दबां बरा च अहे त्यास श्रीमतानी फौज श्रीगगांपारं केली होती ते फौज पलीकडे जाऊन रोहिली याची ठाणीयेक दोन घेतली व तमाम गांव जालले ते फौज पलीकडें गेली याने नजीबंखानांचां धरच सुटला होतां तो इतक्यामध्ये अयोध्येहून सुज्यातदौलां आला व धुंदेखान व अफतरहीम रोहिले यैसे अवघे च जमा जाले फौज भांर जमा जाली मगं फौजा उतरून अलीकडे अल्यां अवघी फौज रोहिले व सुज्यादौला पलीकडे अहे अलीकडे उतरून येत नाहीत व साबाजीपंा व तुकोजी होलकर लाहूर प्राते गिलज्या आला म्हणून हे मजलदरमज (ल) कुच करून येथ लस्करात दाखल जाले लाहूर प्रातीचा अवघां चं अमलं उठलां येमुने पलीकडे अपला अमलं अवघा च उठला त्याचे ज्ये वर्तमान तुकोजी होलकरानी लिा असलं त्याजवरून विदित होईल तर श्रीमतास सागुन जयेनगर प्रातीचा निर्गम करून ये प्रातास यावे म्हणजे सर्व बदोबस्त होईल तुम्ही व हे यैसे येके जागा असलिया सर्वाचे पारपत्ये होईल व नक्ष सर्वावर बैसोन अवघ्या हिंदुस्थाना (चा) बदोबस्तं होऊनं येईल तर सत्वर ये प्रातास यावे जयेपूरचे पारपत्ये येथास्थित मणोदयाप्रमाणे उभयता सरदार येकत्र असलिया होऊन येईल कलले पाजे बहुत काये लिहिणे कृपा आसो दीजे हे विनती सो पौ येसाजी राम कृतानेक सा नमस्कार लिो कृपावृधी कीजे हे विनती

---

ले. १३८ १६८३ कार्तीक वद्य १०
१७६१ नोव्हेंबर २१

बाबूराव सदासिव याचे महिपतराव कवडे यास पत्रः--

त्या प्रांती बंदोबस्त राखावयाचा मजकूर लिहिलात श्रीमंतास पत्र लिहिलें असियास येविसीं श्रीमंतास विनंती करून त्या प्रांती राहोन बंदोबस्त करणें म्हणोन पत्र

घेऊन पाठविलें असे तरी त्या प्रांतीं लोहोगांव दुधाले बोधन देगनुर सारवाड वगैरे ठांणी घेऊन बंदोबस्त करणें रा छ २३ रविलाखर* बहुत काय लिहिणे

पौ छ २६ माहे राखर मुा का झरी सुा इसने सितैन

---

ले. १३९ १६८३ पौष शु.३
१७६१ दिसेंबर२९

बाबूराव सदासिव याचे महिपतराव कवडे यास पत्रः- विशेष राजश्री रामचंद्र जाधवराव मोगलाकडोन आम्हाकडे आले त्यास यांचा तालुका भालकी चिटगोपें भलख गुंजोटी वगैरे माहाल आहे तेथील मोकासा व बाबती सरदेशमुखी सरकारांतून मारनिलेस द्यावयाचा करार जाला मागाहून सनदा सादर होतील तुम्ही त्या प्रांती बंदोबस्तास गेला च आहां तरी यांचे तालुकियास उपद्रव लागों न द्यावा व मोगलाकडील कोण्ही याचे तालुकियास उपसर्ग करितील त्यांस तंबी पोहचवावी व चौथाई सरदेशमुखीचे कमावीसदार उपसर्ग करितील त्यांस हि ताकीद करावी ये विसीं श्रीमंतानी पत्र लिहिले आहे तरी जाधवरायांच तालुकिया चौथविसी उपद्रव नलागे तें करणें रा। छ २ जमादिलाखर तुम्हीं हि यांचे तालुकियास घांसदाणियात्रा उपद्रव न करणें रा। छ मजकूर बहुत काय लिहिणे

पौा छ २८ जाखर
मुा वसमत सुा
इसने सितैन

० श्री
मत्सिद्धेश्वरांभ+
ब्ज भजना सक्त सन्म·
तः। सदाशिव जनेर्भु
द्रां बाबूरायस्य रा
जते ॥ १ ॥

मोर्तब
सुद

---

ले. १४० श्रीशंकर १६८३ पौष शु. १३
१७६२ जानेवारी ८

राजश्री बाजीपत भाऊ गोसावी यांसी

छ. अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्ये श्री कलापा आपा नगरे शरणार्थ विनती उपरि येथील कुशल ता पोश सुध १३ त्रयोदसी पर्यंत यथास्थित जाणुन स्वंकीये कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष ... इंकडील वर्तमान तरी मोगल शहराकडुन येऊन चाभारगोदियावरी येऊन त्याची वाताहत करून

* हस्तक्षर बाबूरावाचें. पत्रावर शिक्का मोर्तब आहे.

ाजनुजे पलीकडून पाटसावर येऊन पाटस जालले लुटले तेथून भीमातीरे उरली नांदूर जीक लोणी कालभार येथे साह मुकाम करून श्रीमत् राजश्री पंत प्रधानं याचा याचा तह रह होऊन सला जाला मागती अले मार्गें माघारा मोगल चालला तलेगांव सुपे श्वरे तुर्त राखिले हे फार मेलविले वरक [ ड ] तसनस जाला तो कोठवरी ल्याहवा या ां कारचे वर्तमान इकडील जाले असे यानतरी मलापाचा व आपला मित्रत्व बहुत + + + + त्याच्या मुला लेंकराचा वारंवार आपण परामृश करीत च असाल पुढे हि याचा हेत या प्रकारे गुलग करून त्याच्या पुत्राचे चालवणार आपणं च आहेत त्यास प्राती आपणं व ते हि होता तेव्हा राजश्री गुखापां खलगे यासी व मलापासी रीरसमधाचे बोलणे चालणे जाले ते तुम्हास विदितच आहे अलीकडे याजकडे आमचे माणूस कोण्ही त्याजकडे गेले नाही अथवा त्याच माणुस त्र आम्हाकडे येऊन परामृश जाला नाही पुढें त्या वचनांवरी शरीरसंमध डावा ऐसा हेत ... हा शरीरसंमध करावा ऐसा अग्रह का तरी आम्हा लोकांत थम जेथे शब्द गुतल तो शं [ री ] र समधं अगत्यरूप करा [वा ] न केल्याने जाती- ध्ये बदनग आयेव लागतो याजकरिता हर प्रकारे तो च समधं केला पाहिजे वगैरे

---

ले. १४१ श्रीमोरया १६८४ कार्तीक वद्य ११
१७६२ नोव्हेंबर १२

चिरंजीव राजश्री बापु या प्रतो आन्याबा आसीर्वाद उपरी जुनी आपली राहुटी गैरे सरजाम पाठविला तो पावल नवी राहुटी उतर येथे आम्हास पाठवणे उंटाबराबर ाऊत दोन च्यार देऊन तीर्थरूपापासी जलद पाठवणे बहुत काये लिहिणे लस्करचे तमान तर शुक्रवारी येकादसीस रूज उभयेतांचा मुकाब [ ला ] जाला श्रीमंत माधव ायांच्या फौजानी सिकस्त खाली त्याजकडील लोक इकडील फौजा लुटितात ापल्याकडील मंडली खुशाल आहे हे आसीर्वाद

ले. १४१ ( अ ) श्रीमोरया

जश्री सकंभटास व चिरंजीव कृष्णरायासी आसीर्वाद उपरी सलुखाचा प्रकार बनत ही याउपरि स्थलांतर करणे ढील न करणे गोटागुंता हि घरा नसो देणे पागा सिलेदार लदीने पाठवणे संकटे मोठी आहेत तर राऊत लौकर पाठवणे मुले माणसे आन पत्र लो जलदीने नेणे हे आसीर्वाद

---

ले. १४२ श्री १६८५ चैत्र शुद्ध १५
१७६३ मार्च २९

राजश्री शंकराजीपंत नि॥ बच्याजी विश्वनाथ गोसावी यासि

छ्अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्ये श्री मलारजी होलकर दंडवत सुहूरसन

सलास सितैन मयां आलफ टाणे कुकडमुंडे तुम्हांकडे आहे त्यासी सदरहु ठाणे मजकूर राजश्री माहांमुनी गोपीनाथ याजकडे श्रीमंतानी देविले आसे तरी ठाणे यांच्यां हवाला करून पावलीयाची पोहचं माहांमुनीपासून घेणे जाणिजे छ १३ रमजान बहुत काय लिहिणे

ले. १४३

मलारजी होळकराचे सखाराम पंत यास पत्रः-

विशेष तुम्हीं राजश्री गंगाधरपत यासीं पत्र लिहिलें त्याचा सर्व आर्थ निवेदन जाला श्रीमंताचा यावयाचा भाव लिहिला कळो आला त्यावरून राजश्री गंगाधरपंत पाठविलें आहेत याची तुमची भेट होईल हे सर्व वृत विदित करतील सर्व प्रकारें भरवसा तुमचा आहे ये विशी विस्तारें काये लिहिणें छ ६ साबांन कितेक वृत्त गंगाधरपंतापासी सांगितले आहे ते विदित करतील सारांश की मनसुबियाच्या कार्यास त्वरेस मोल आहे बहुत काय लिहिणें हे विनंति*

ले. १४४

नकल श्री

राजश्री मल्हारजी होलकर
गोसावी यासि

असीर्वाद उपरी चिरंजीव राजश्री राव यासि भेटीस आणावयाचा प्रकार तुम्ही केला असता मागती काये जाहाल ते न कले बरं आसो होणार ते होऊन आले याज उपर चिरंजीवांस घेऊन यावं तुमच्या वडीलपणास सब्द न लागे ते करावं त्या मडलीत तुम्हा खरीज दुरंदेसी कोणी नाही याजकरिता त्यांस बरचेवर सागण ते सागत च गेलो ते बेवकुफी करीत च गेले आसो या उपरि तेथ तुम्ही वडील आहा तुम्ही आपल्या वडीलपणाकडे शब्द येऊ न द्यावा चिरंजीवास घेऊन याव आमचा विचार तुम्हा सिवाये दुसरा नाही अर गोष्ट नाही तर हे ईस्वरसत्तेने होणार ते होईल बहुत काय लिहिणें हे आसीर्वाद.

ले. १४५ श्री ज्येष्ठ व॥२ शके १६८५
ता. २७ मा. मे स. १७६३

तीर्थस्वरुप राजश्री बाबा वडीलांचे सेवेसि

अपत्य नारोबाचे सा॥ नमस्कार विनंति विज्ञापना ता॥ जेस्ट कृष्ण २ द्विंतिया

---

* बाजूच्या शिक्यांत 'श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर खंडोजी सुत मल्हारजी होळकर:' अशीं अक्षरें आहेत.

सुक्रवार पावेतो वडीलाचे आसिर्वादेकरून समस्त सुखरूप आसो विशेष राजकी वर्तमान तर खासा निज्यामआली वगैरे फौजा पुण्याहून उठोन न्हावीवर येऊन तीन मुकाम होते काल कुचे करून शाहरास जावयाचे रोखे भिवरथडीने जाते कालचा मुकाम आले-गांवावर होता पुणे जालले पेशव्याचा वाडा मात्र वाचला वाफगावचे खंडाची बाकी रुपये दीड हजार राहेले होते त्याज साठी तुलजाजी भागवत येथे रुपयेसाटी आले होते ते हि काल रुपये घेऊन गेले वाफगांवकराच्या बोली आद्याप आल्या नाहीत बोलीस मल्हारपंत पा व गणेशपंत कुळकर्णी येसे आहेत ते येका दो रोजा येतील आपले वर्तमान तर वाफगांवचे खंडाचे काही आजपावेतो मागितले नाही आपल्यापासून काही घेत नाहीत आम्ही सरकारचे लोकाचे आजपावेतो इस्तब्रत राखिले आहे राजश्री विसाजीपंताचा हि आम्हावर कृपा आहे मुशाऱ्या बा रुपये शंभराची गांवकऱ्यावर चिठी दिल्ही ते रुपये आद्याप हतास आले नाहीत राजश्री विसाजीपंतास हटकीले त्यास ते म्हणाले की स्वस्त जाले म्हणजे रुपये वसुल करून देऊ त्यास आटा चौ रोजा रुपये देतील हिशोब मागील हि आकारितो आलीकडील तर बरोबर आकारितो काही चिंता न करावी दाणे तो मईन दिढानहि-न्याची बेगमी आहे आपण पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान सर्व विदित जाले खंडचे व कडुसचे व कालोसचे वर्तमान समस्त सुखरुप आसोत गंगापा कोठवले यानी आपल्यास व मातुश्री आहिल्याबाईस पत्र पाठविले आहे याजविशइ बाईस च्यार गोस्टी सागुन पत्राचे उतर पाठवावे बहुत काये लिहिणे हे विज्ञाप्ति

सेवासि उकडभट व गोविंदा ब्राह्मण नमस्कार

चिरंजीव गोविंदास मातुश्री ताईचे आसिर्वाद

---

ले. १४६ श्री नकल १६८५ आषाड व॥ १२
१७६३ आगस्ट ६

सटवाजी कदम राव याचे भिकाजीपंत यास पत्र --

मौजे कोटली ता निझर पा नंदुरबार हा गाव आम्ही आपले तर्फेने दरोबस्त जाहागीर व बावती व सरदेशमुखी राजश्री गंगाधरपंत तात्या याजकडे सालमजकुरापांसून दिल्हा आहे तरी तेथील येवज तुम्ही आपणापासी आनामत आसो देणे तथील येवज दरोबस्त दुसरे कोणास न देणे तेथील येवज राजश्री गंगाधरपंत तात्या इकडे आल्या-नंतर त्याजपासी पावता कीजे सन ११७३ छ २५ मोहरम

---

ले. १४७ श्री १६७९ वैशाख व॥ १२
१७५७ मे १

बाळाजी बाजीरावाचे महिपत राव कवडे यांस पत्र --
विशेष वा। देणे पागा दि। इद्रोजी कदम यास साल गुदस्ता प्रमाणे साल मजकुरी रुपये ५०० पान्च शे देविले असेत पावते करून कबज घेणे जाणिजे छ २२ साबान सु॥ सबा खमसेन मया अलफ बहूत काय लिहिणे

---

ले. १४८ श्रीमोरया १६८५ श्रावण शुद्ध २
१७६३ आगष्ट ११

तीर्थस्वरूप राजश्री बाजीपंत मामा स्वामीचे शेवेसीं आपल्या समान विनायक बाजीराव कृतानेक सां नमस्कार विंनति उपरि येथील कुशल ता। श्रावण सुध २ मुकाम पैठण येथें आसो विशेष वडीली पत्र पाठविलें तेथें उदासीनतेचा मजकूर फार च लिहिला त्यास तीर्थरूप सौ। मातुश्री काकू मृत्य पावली वाईट फार जाले त्याचा × × फार जाला व पुढे करीन म्हटल्यांसि नित्य नव च आहे परंतु मृत्यलोक त्यास उपाय नांही आपण उदास न व्हावे बाईकडून जासूद आले त्यानी तोंडजबानी सागितले की उभयेता चिंरजीव आपल्या घरीं आहेत हे काय हे वर्तमान आपण हि आम्हास न लिहिले व आमचे घरीहून चिंरजीव गोविंदराव याणें हि न लिहिले हे काय हे आमचे घरची रीत नव्हे मुले लहाण त्याजवर वडीलानी लोभ न करावा व मुलानी वडीलांच्या आज्ञेत न चालावे येसी वळवटा नाही आम्ही जेव्हा पासून येकिले आहे तेव्हापासून चैन पडत नाही आजपावेतों आमचे घरी येसे चालत आले की वडील जे आहेत त्यानी सर्व मुलावर येके द्रिष्टीने लोभ करावा मुलानी हि मर्यादेने चालावे लौकिकात कलिप्रादुरभाव येवढ च की तीर्थरूप तात्या आम्हावर लोभ करीत नाहीत आम्ही त्याचे आज्ञेत × × × सून येते आसो उपाय नाही परंतु हे काय अर्थ काही कळत नाही मुले लहाण त्याजवर तीर्थरूप राजश्री बाबानी व तीर्थरुप सौ। मातुश्री बाईनी विशेष लोभ करावा त्यास हे काय काही कळत नाही आसो आपल्या येथें आहेत आपण लोभ करित आसतील तेथे आम्ही आधीक लिहिलीयाने लापणिका दिसते परंतु मुलें निपट च लाहाण आणि चिंरजीव माधवरायासिं लेकुरपणापासून आमची सवे आणि तो आनाड त्यात मातुश्री वारली फार वाईट दिसत असतील येणेकडून चैन पडत नाही व वरकड राजकीवृत जोसीबावास लि॥ असे त्या वरून कळेल हे विनति

---




ले. १४९ श्री

श्रीमंत राजश्री अन्याबा व ता। राजश्री बापु स्वामीचे सेवेसि आज्ञाधारिक मोरो रामचद्र सा नमस्कार विज्ञापना स्वामीचे कृपे करून भाद्रपद सुध २ परियत यथास्थित आसे विसेष आवंदा मोगलानें बहुत समत केले आमचे घर मांत्र वाचले आहे वरकड वस्तवानी भाडे व पाघुरणें लोहोगडचें माचीस ठेविले होतें ते माची लुटली व जालिली तेथे सर्व गेलें काही राहिले नाही यैसी इश्वरें गत केली आहे सर्व आश्रा स्वामीचे पायाचा आहे निभाव करणार स्वामी समर्थ आहेंत चादवडाहून आलीया तागाईत काही घरास गेलो नाही मुले माणसे आईचा समाचार घेतला नाही स्वामीचे चाकरीत आहो गावची लावणीं हि केली सातपुता याचा सेताचा कजीया पाढरीने निवडिला आणि सेत याचें हवाला केले इकडील वर्तमान कानोजी सातपुता सागतां विदित होईल गणेशबागाची बहुत खराबी केली होती परतु आम्ही आलियावरी नवसर थला करू पूर्ववत प्रा केले आसे सेवेसी श्रुत होये हे विज्ञप्ति

आश्रीत बाबु भट मराटे आसीर्वाद आभीष्टचीतन करित बसलो आहे हे आसीर्वाद

श्री सटवाजी पा सिदे दंडवत विनति कृपा करीत जाणे पदरीचे आसो हे विज्ञाप्ति

---

ले. १५०

× × × × ×

जाली दोन किल्याची रद्बद्ली ...... पैकीं नलदुर्ग द्यावा दुसरे किल्याचा मोबदला सात लाखाची जागीर द्यावीसे जाले भोसले निरोप घेणार वरकड सरदार ही आपलांले जागां जातील श्रीमंत सुभेदारांस पुणीयास समागमें जावें लागेल यैसे दिसतें तात्या चांदवडास येतील आमची भेटी आद्यापी नाहीं याजकरितां गुतलों दर्शन जालियावर येक दोन रोजांत गुंता उरकुन सत्वर च सेवेसी येतो वाफगांवकराचे हिसेबावर पडले आहे चिंता न करावी सविस्तर राजश्री राहुजी पंत बाबाचे पत्रावरून कलेल चिरंजीव दादाजी व माधवरायाविसी आपण समीप असतां काळजी करावीसी नाही यांची मर्जी ठिकाणी च आहे शोध केला वरकड भेटी होतां च सविस्तर लिहितां बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनंति चिरंजीव राजश्री दादाजी व माधवराव यांसी असीर्वाद लिा परिसोन लोभ असों दीजे तीर्थरूपांचे शहरास गेल्या मुले दिरगत लागली या उपरी फार लौकर येतों हे आसीर्वाद

---

ले. १५० श्री. १६८५ मार्गशीर्ष शुद्ध ७
१७६३ दिसेंबर ११

श्रियासह चिरंजीव राजश्री दादाजी व राजश्री माधवराव याप्रति बाजी विठल आसीर्वाद उपरि येथील कुशल तां मार्गसीर्ष शुद्ध ७ रविवार मुा पुणे येथास्थित असें विशेष तुम्ही बखत्या बराबर पत्र पाठविले पावोन वर्तमान सर्व कलो आलें आम्हास इकडें दीसगत लागली म्हणोन श्रमी होऊन लिहिलें त्यास यत्न काय करावां जैसा प्रसंग प्राप्त त्याप्रमाणे केले पाहिजे येरवी आम्ही तुम्हास या दिवसात सोडून निराळे राहावे ऐसे सर्वात्मना नाही परंतु तीर्थरूपाची मर्जी आम्ही याजसमागमे च चादवडास यावे ऐसे जरूर देखोन राहिलो बरकड तुम्ही उद्विग्नतेने कितेक प्रकारे लिहिले येका दो पत्री नेवील मजकूर दर्शविला तो बाळाजीस निवेदन केला त्यासी तुमचे भेटीस यावयाविसी उतावली फार करितात परंतु दरबारचा विचार कारभार येक तऱ्हेचा येऊन पडिला आहे यामुळे उलगडा होत नाही तथापि अतःपर राजश्री सुभे-[दा]राकडील उतरे यावयाची प्रतीक्षा करितात आली म्हणजे जलदीने स्वार होऊन तुम्हाकडे येतील कोणेविसी चितात काळजी अथवा + + + ता येकंदर न धरावी चित्ताची स्थिरता करून संतोषयुक्त असावे वडील छत्र तुमचे मस्तकी असता तुम्ही चिंता वाहावी ऐसे नाही राजश्री सुभेदाराची प्रकृत नादी लागोन हरयेक मजकूर बोलावा तेव्हां पाल्हाल उदंड बोलतात त्याजवर न जावे तुम्ही दरबारी जात असता मेहनत करिता येणेकरून तीर्थरूपास व सर्वास चितात बहुत संतोष आहे त्याप्रमाणे च मेहनत करीत जावी मातुश्री अहिल्याबाईकडील लग राखिला आहे तो जतन करावां राजश्री त्रिंबकपंतदादा तेथे तुम्हास विश्रांत आहेत हरयेक विचार ते बुद्धिवाद सागतील त्या प्रा वर्तणूक करावी राजश्री सुभेदार पलीकडे सेंदव्यास गेले आणि मातुश्री अहिल्याबाई चादवडी असली तरी तुम्ही चादवडी च बाईसाहेबाजवळ उभयता हि राहावे अहिल्याबाई याणी सुभेदारासमागमे सेंदवे इंदूर पर्यंत जावे ऐसा विचार जाला तर राजश्री त्रिंबकपंत दादा समागमे तेथपर्यंत जातील त्याजबरोबर तुम्ही हि जावे इतकियात तुम्ही जेथे असाल तेथें तुम्हाजवळ आटोपुन येतो तीर्थरूपाची मर्जी तुम्हा चौघावर हि समान आहे कोणे विषई चितात विकल्प येकंदर न आणावा वेदमूर्ती राजश्री जोसी-बावा जाणार त्यास संतोषे करून निरोप द्यावा येकले कसे कंठावे म्हणोन खंत न करावी पुरुष आहां तुम्ही जेथे असाल तेथे दाहा माणसें अनयासें जवळ जमा होतील चिरंजीव राजश्री अन्याबाचें शरीरी सावकाश बहुत वाटत नाही म्हणोन लिहिले त्याज-वरून बहुत श्रम वाटतात त्यास तुम्ही उभयता नित्य समाचारास जाऊन दोन घटि-कापर्यंत जवळ बसत जावें अनमान न कीजे आरोग्यतेचे वर्तमान दरचेवर तीर्थरूपास व आम्हास लिहीत जावे चिरंजीव बापू तुमचे च घरी भोजन करितात त्याचा सत्कार

उतम करीत जावें खंडू चाकर तुम्हाजवल आहे त्यास त्याचे लग्न निघाले तरी मोबाजी व खंडु दोघांचे येवजीं वीस पंचवीस रुपये खर्चास द्यावें आणि दोघा भावा-पासून तुम्ही आपणापासी चाकरी घेत जाणें इतबारी आहेत याजकारिता लिहिलें असें सारांश पुरुषैर्य धरावें आतां आपणास ईश्वर किंवा वडिलाचे पाय आहेत दुसरा आर्थ नाही वडील चिरप्रवासी तेव्हां आपले आपण धैर्य धरावे खंत करूं नये मातुश्री बाईसाहेबांकडील लग जतन राखावा राजश्री त्र्यंबकपंत दादा आहेत लाहाण मोठी जे गोष्टी संशय वाटेल तो त्यांस पुसत जाणे तुमचें दैव चांगलें आहे कोणेविसीं चिंता सहसा न करावी आमच्या शरीरीं ज्वर आठ दिवस येत होता आतां आरोग्यता जाली कलावें चिरंजीव मथाबाईस वरविचारणा करीत असो खंडो विसाजी देशपांडे पुणेकर यांचे पुत्र आपाजीपंताचा लेक नवरा चांगला आहे थोडेसे व्रह्मस्व आहे रा दादांचे विचारें कसे ते लिहिणें बरकड नांव वतन सर्व उतम आहे निश्चय जालियावर लिहितों चिरंजीव मणिकर्णिकेच्या हातास फोड येऊन हात नासला आहे म्हणुन बखत्याने सांगितलें त्यास सकी व चिमी यांसि बोलाऊन आणीत जाणें ममतेंत घेऊन मुलीचा हात बरा होय व निगा चांगली होय ऐसी तजवीज करावी चिमीची मुदारत करावीसी जाली तरी दाहापांच रु॥ अगत्य पाहुन खर्च करणें परंतु मुलीची आबाल येकंदर होऊं न देणें तुम्हीं लेंकरे ये गोष्टीचीं कालजी नसावी परंतु दैवांस ठाकून आलें ते केलें पाहिजे लेंकरांची उपेक्षा आपण केली तरी त्याचे प्राण कसे वांचतील नित्य मातुश्री माईनें व तुम्हीं मुलीस आपल्या घरास आणुन हात आपल्या द्रिष्टीने पाहात जावा समाचार घ्यावा अलस न करितां या प्रो॥ करीत जावें खर्चा वेचास तुम्ही आपली आबाल कोणेविसीं न करावी रा सदासिव ना॥ आणा तलेगावकर माहजन तेथें आहेत तुमची पत्रे येतात त्यास बहुधा कलत नाही तरी त्यांचे हि पत्र पाठवीत जाणें आतिथ्य करीत जाणे दरबारास जात जावें अलस किमपि न करावा येथून तुम्हांस वारवार बुधीवाद लिहावा ऐसें नाहीं सुज्ञ आहां परंतु सूचनार्थ लिहीत असतों विस्तार न मानावा तीर्थरूपांस पत्रें तेथील चेष्टित सविस्तर लिहीत जावें आमचे श्रीम नारायण गांवांस पाठवावयाचें कार्य नवते असा फिरोन आठ पंधरा दिवसां लौकर न घेऊन जाणें अथवा आम्ही हिकडील थोडी माणसे देऊन रवाना करितो चिरंजीव आनोबाचा समाचार जातीने जाऊन घेत जावा लौकिक राखावा तुम्ही सुज्ञ असा आम्हांकडे पत्र लिहित जाल त्याजवर कोणाचा नमस्कार न लिहावा दुर्नरियास न दाखवावे येथील पत्रें फाडून टाकीत जावीं अगर जतनेनें ठेवणे बहुत काये लिहिणें लोभ असों दीजे दरबारचे वर्तमान तुर्त नवल विशेष लिहिजेसे नाही मागाहून आधिकोतर आढळलियास लिहीत जाऊं हे आसीर्वाद

सेवेसी विनायक विश्वनाथ कुतानेकर सां नमस्कार विनंती लिा परिसोन लोभाचा

पूर्वा करीत जावी दरबारचे वर्तमान लिहून पाठवणे म्हणुन आज्ञा त्यासी त्रिंबकजी आसुदासमागमे सरकारची पत्रे लिहिली आहेत त्याजवरून श्रृत होईल हे विज्ञापना

---

ले. १५२ श्री. १६८६ वैशाख वद्य ३
१७६४ मे १८

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री भिवाजीपंत दीा राजश्री गंगाधरपंत तात्या स्वामी च सेवेसीं सेवक देवाजी केशव व कासी बलाल नमस्कार विनंती उपरी मौजे वरूड ताा खड येथे तुम्ही श्रीमंता कडून पत्रे घऊन आला आणि रामाजीपंत व मल्हारपंत हे उभयेता घरी नसता मुलास लेकरास द्राही दिल्ही म्हणोन विदित जाले त्यास सरकारची पत्रे काये आणली आसतील ती सुभाकडे दाखवावी आणि सुभाची पत्रे घेऊन मग मोजे मजकुरास जावे ते सारे येकीकडे ठेऊन गावास जाऊन मुलास दाबादुबा करावी हे उतम नाही त्यात ज्यास काम ते तरी आसलियावर सुधेच आहे सरकारच्या वसुलात खलेल करावी हे उतम नाही तर सुभा पुण्यास जाऊन राजश्री फडनिसा कडे पत्रे सरकारची आसतील ती देऊन ते आज्ञा करीतील त्या प्रमाणे करावे तो महिण्या पधरा दिवसा श्रीमंत राजश्री रघुनाथपंत सुभेदार ही येतील कलावे बहुत काये लिहिणे हे विनंती

पो छ १६ जिलकाद मुा निंबगांव
सुा आर्बा सितेन मया व अलफ

---

ले. १५३ १६८६ आषाढ शुद्ध १०
१७६४ जुलै ८

गंगाधर यशवंताचे बाजीपंतास आषाढ शुद्ध १० दशमीचें मुा लस्कर आवातुणी प्रांत जयेनगर येथून पत्र —

राजश्री त्रिंबक नाईक भोकरे यांचे कापडा बाा रूपये देणें त्याजसाठीं नाईक मजकूर यांनी आपले गुमास्ते भवान नाईक लधु लस्करास पाठविले त्यासी लस्करांत गुमास्ते माार यांजपासी रूपये ४७५ पांवणे पांच से दिल्हे बाकी येवज चिरंजीव राजश्री आन्याबा व दादाजी यांचे पत्राप्रमाणें ६५२२। पासष्टसे सवा बेवीस हरयेक यैवजी नाईक मजकूर यांसी पावते करोन पावलीयाचें कबज घेणे ये विषई चिरंजिवास हि पत्र लिहिलें आहे *मिती आषाढ शुद्ध १० सके १६८६ तारण नाम संवछरे हे विनंति

---

* येथून हस्ताक्षर गंगाधरपंताचे

ले. १५४ श्री

श्रीमंत राजश्री बाजीपंत भाऊ स्वामीचे सेवेसीं सेवक केशो महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनति उपरी येथील कुशल ता। माघ वद्य २ या मोकाम चांदवड येथे आपले कृपे करून सुखरूप असो यानंतर तळेगांवीहून माघ शुध चतुर्थीचे पत्र आले ते नवमीस पोहचले तेथे अज्ञा की राजश्री विनायेकपंतास बोलाऊन मागुन कागदाच्या नकला करून घेऊन पूर्व संकेता प्रमाणे राजश्री कुशाबा बापु कडुन खर्चाची बेगमी करून घेऊन निकडीने जावे त्यास अज्ञे प्रमाणें राजश्री नायेगांवीहून बोलावून आणिले माणसास जावयास व त्याजला खावयास यैसे चार रोज लागले तेथोन अल्यास राजश्री बापुची मर्जी पाहून त्याजला हि सरकारच्या कामा काजाचा गवगवा भारी तशांत संधी जपून कागदपत्र करून घेतले खर्चास मागितले राजश्री विनोबाचे च हाते त्यास पना रुपये घेणे यैसे उतर केले मग त्यांजला उमजून सागितले की येक घोडी कवाडाचे तटु येक पडींधळाचे तटु येक माणसे तिघजण ब्राह्मण राघोबा व केशोबा या प्रमाणे खर्च येथुन नागपुरा परयंत जावयास वीस बावीस रोज पाहिजेत त्याजपासी थोडा तरी येक महिना काम काज करून दिल्हे तर त्यांचे मामलेदार तेलगण प्रांती आहेत त्याजकडे कागद पत्र घेऊन जाऊन त्यांज कडुन मग परगणे यांत यावे चार महिन्याचे काम निधानी तीन महिने तरी लागतील दोन से रुा तरी यावे सेवट सेभर तरी द्यावे यैसे रा। विनोबानी सागीतले मग पावणसे मात्र प्राप्त जाले त्याणी न दिल्हे तरी येथोन घरीहून खर्चास घेऊन जावे यैसी अज्ञा त्याजवरून जितके दिल्हे तितकेच घेतले तुम्ही याल म्हणुन येक दोन रोज मार्ग पाहिला येणे न जाले मार्ग पाहावयास निमित्य हे च की दरबारचे वर्तमान भोसले पुत्रतील व जबानी तुम्ही बोलायाचा प्रकार कांहीं सांगाल हा येक विचार व जागीर वसुली पंचवीं पंचविसाची दिली तरी घ्यावी नाही तरी न घ्यावी काम जाले तर कांहीं वसुली व तनखा येणे भरतीला करून देतील हे तुम्हास ठावके च त्यांत भोसे (ल) लबाड आहेत परतु धण्याचे नांवावर जे होणे ते होईल मागे च रवाना केले असते म्हणजे श्रीमंत राजश्री तात्या दक्षिणेत असता इश्वरतीने काम होऊन आणिखी पंधरा दिवसांत आलो असतो हिंदुस्थानात गेलेच वर्तमान कळल्यास बइलखोर माणुस मागे फुडे घेते हर येक काम वहिलावर त्वरेन करून घ्यावें आज दीड महिना हकनाहक फिरतो तुमचा तरी उपाये काये रोज उठोन नवा च मनसबा होतो त्यांसी सोडता नये आंथरूण पाघरूण टांकून फिरता उपाये काये कराल आम्ही यावे तर बरो राजश्री विठल भट यास तटु पाहिजे व माणुस तेंसे च सौभाग्यवती बाई सांगाते तटे माणसे नख्त यैवज व कापड संभाळुन घेऊन जावे बाटेस चोरा चिरटाचा दंगा जाल्यास आम्हास च सेट्ट लागेल यास्तव आम्हास हि यावयास अनकुन पडले ज्या ज्या का अन्न पाण्यांना

लग्नानबंद असतो तेथे जावे लागते श्रीमंताचा तुमचा मार्ग पाहावा तरी दिवस गत लागती यास्तं ( व ) जावयास गेलो येक वेळ कागद लिहून राहिलो ते दूर करून दुसरें न लिहिले मागती दिवसगत लागल्यास श्रीमंत रागास येतील येदानिमित्य व आपली अज्ञा निकडीने जावे यास्तं ( व ) जावयास गेलो घर बेगमीचा येवज पाडलीस रा अवबा कड जमा करविला आहे म्हणुन लिा तर सर्व प्रकारे कुटंबाचा सांभाल करीत च आला फुडा हि कराल हा भरवसा च आहे| तळेगांवी बहुत मार्ग पाहिला लिंगोजीस घराकड वाटे लावावे यास्तं (व) परतु आपले येणे न जाले सेवटी जुनरी तरी गाठ पडेल पाहिले तेथं हि भेट न जाली येवज राजश्री राघोजी जगनाथ राजश्री घनशाम बावाचे कारभारी तळेगांवी राहतात त्याज पासोन तीनसे रुपयाची चिटी पाटविली आहे त्यास राजश्री सदासीव नाईक महजन यांचे विद्यमाने रा अवबा कडून रुा चांगले पावीत करावे येवज व कापड आम्हा बरोबरचे कुली श्रीमंत राजश्री दादाजीचे विचारे मातुश्री माईच्या स्वाधीन केले पाडली करून येवज रुपये २५० अडीच से घेतले ते हि मातुश्री-च्या स्वाधीन केले यादी लिहून श्रीमंत राजश्री दादाजी यासी दिली आहे पुणे यांत पाडलीकर यांज बाा रुपये येक से णवद त्यापैकी राजश्री राघोपंत आपास म्हसी बाबत रुपये णवद दिल्हे सेभर रुा बाकी होते त्या पैकी घराकडून सटव्या आला होता मुलास चिटाचे पागोटे व चिटे अंगरखेची वगैरे जिनस पचवीस रुाचा घेतला होता बाकी रुा पावणसे आम्हाकडे होते ते आम्ही समागमे घेतेल आहेत त्वरेने आलो तर खर्च होऊन राहिला येवज आपल्या पासी पासी देऊ वावगा खर्च होणार नाही जुनरी वेदमुर्ती राजश्री जोसी बावास अज्ञे प्रमाणे रुा ५०० दिल्हे त्याची चिटी येथे राजश्री दादापासी घेऊन आलो येवज तुम्हां च पासी असो द्यावा म्हणून सागितले यास राजश्री दादानी उतर केले की दुसरेयाचा येवज निराळा आहे घेऊन जाणे गुंता ठेऊ नका त्याचे मर्जी प्रमाणे घेतले ते हि रुो मातुश्री माईच्या स्वाधीन केले त्यांत चांदवड सिका वगैरे से पनास रुा निघाले ते नित्य खर्चाचे येवजी घालून दुसरे रुा त्यात घालुन येवज ठेविला आपल्या गाा येवजी गंजीकोट वगैरे पांच चार रुा जे निघतील ते लग्नाचे गडबडीत मोबदला करून चांगला येवज करून ठेवावा श्रीमंत राजश्री महीपतराव कवडे याची भेटी तुम्ही श्री फिरंगाईस कुरकुंबी गेला होता तेथे भेटी जाली की नाही हे कळत नाही राजश्री विनोबा तिकडे जातील की कळना नाही तरी आपला कोणी असल्या वांचून कार्याची गोस्टी नाही याची तरतुद काये केली भेटी जाली असती म्हणजे परस्पर सविस्तर कळते तेथे आपल कोणी च नाहीसे जाले जेन्मात राजेश्री अंबाजी पंत तात्याचा कारभार दरबारी न्हवता तो त्याचा च उत्कर्ष जाला ईश्वरे कृपे करून तुम्ही साबुत असल्यास आपला उपर राखाल आपण येत्नात असावे आपली आमचे भेटीस दोन तीन महिने पाहिजेत यास्तव सूचना लिा आहे आम्हाकडेस गांव आहे

त्यास आम्ही कोणी च प्रसगी नाही उपद्रव करतील होणारास उपाये काये आपली पत्रे राजश्री आबाजीपंत तात्याकडे जात येत असतील तर आम्हाविसी त्याजला लिहावे तुम्ही सांगितल्या पेक्षा आणीखी दाहा चाळीस रुा अधीक राजश्री नारोबास सागुन मांतुश्री चिमाबाई कवडे यास देविले आम्हांवर नजर देऊन राजश्री केशोबाचे चालवावे ऐसे लिहावे श्रीमंत राजश्री दादासाहेबाचे पत्र मुख्य पेशव्यास अगर राजश्री अबाजी पंतास आपल्या फडर्णासीविसी विचारास आले तर उपाय करावा बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे सेवेशी श्रुत होये हे विज्ञाप्ति

---

ले. १५५ **श्रीमोरया** १६८६ पौष शुा १
१७६४ डिसेंबर २३

सहश्रायु चिरंजीव विजइभव राजश्री दादाजीस प्रति कृष्णराव गंगाधर अनेक आसिर्वाद उपरि येथील कुशल ताा पौष शुा १ रविवार मुकाम शाहाबडा अंतरवेद नजिक दिली येथे समस्त मंडली लहान थोर सुखरूप जाणोन स्वकिये कुशल लेखन करीत आसावें विशेष तुम्हा कडून बहुत दिवस पत्र येवोन वर्तमान कलत नाहीं तरी यैसी निष्टुरतां न करिता सविस्तर पत्रीं सदैव संतोषवीत आसावे या उपरि इकडील वर्तमान तर राजकी अद्यापि नजीबखान जवाहिरसिंग जाट यांचा खलस तुटला नसे दीड महिना जाला पुढे श्री इछेने मास पक्षात येवनाचे यथायुक्त होऊन उलगडा होईल या उपरी घरचा मजकूर तर तीा बावा दिलिपावेतो येजमान समागमे च आले तीा आपा व चिरंजीव गोविंदराव समागमे च होते येथे कामाचे प्रसंगावरून येजमानाची बुधी आशाश्वति पुर्ती ध्यानास आणिली देशकालवर्तमान ध्यानास तीा बाबानी व तीर्थरुप तात्यानी आणून सर्वास लाहानथोरास येकरूपतेने चालवावे ज्यात बरकत वाढत जाईल आणि काल दिसंदिस राजकांताचा च येत चालला यास्तव कोणी कोणाचा मनांत त्रास न धारिता आवैर करून सर्वानी राहावे यैसा निश्चय परमार्थबुधीने पक्तेने करून सर्वास उभयेता वडीलानी आज्ञा केली जे सर्वानी तीर्थरूपांचें आज्ञेचे तावीन राहावें हें ज्यास आमान्य त्याजकडेच पेशमानी बुधीदोष दूशण यैशी आज्ञा केली आणि तीा आपास सर्व मुख्तीयार करून कितेक आर्थ बहुत प्रकारे सांगून पाठविले आहे सारांश आम्हां तर पूर्वीच तीर्थरूपांचें चरणाचा अवलंब केला आहे हे वर्तमान पांडुरंग मुरार व केशव × × कृष्ण यास परमार्थ बुधीने ठाऊक असे तुम्हास येकदोन वेला सांगितले आहे आणि आमचा कायावाचा मनोदय हाच निश्चय आसे जे इहलोकीं वडिलाचे चरणाहून अधिकोत्तर धनदारादि किमपि नसे याच समतास अन्याचा हि मान्य आसेत हे सविस्तरें तीर्थस्वरूप आपास विनंति केली आहे ते सांगतील त्याजकडून सर्व कलेल यैसियासि तुम्हीं देशी आहां सौ मा बाईचे आंतःकरण रक्षून सर्व रसोत्पतीने बरकत + + + + तीा सौ मा बाईस व तीा आन्याबास (गांगांचे)

तुम्ही शास्त्रज्ञ आह्मा तुमचे सांगतले कोणी मोडणार नाही ये विशीं दोन च्यार वेला उभयतां वडिलास हि लिहिले आसे तुमच्या खेरीज कोणी वर्तणार नाहीत येसे जाणोन सर्वास रसोत्पतीने वर्तवावे लौकरी च तिा आपा भेटतील ते समई सर्व कलेल लोभाची वृधी करणे हे आसिर्वाद

---

ले. १५६ **श्रीगणराज.**

श्रीमंत् राजश्री तात्या
स्वामीचे सेवेसि

पोष्यें वासुदेव नारायेण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता छ २० रालाखर परयेंत स्वामीच्या कृपावलोकनें करून पागा सहवर्तमान सुखरूप आसों विशेष बहुत दिवस जाहाले आज्ञापत्र सादर होऊन सांभाल न जाला याजकरिता चित उदास आहें तरी येसे न करावे सदैव आज्ञापत्र सादर होंऊन परामृष करीत गेलें पाहिजे तेणेंकडून संतोष होईल पागेचे वर्तमान तरी बर्क्षा बांवास या प्रांते रवाना करतें समई श्रीमंत् राजश्री नानानी करार केला होता की दोन्ही परगण्यात आमल बसलियावर पागेंस सरंजाम देऊ त्यास या प्रांते आलियावर आपण कस्त करून फौज देऊन पठाणापासून आमल सोडऊन सुरलित करून दिलहा त्यास आज च्यार वरसें होंत आंली राजश्री नाना कुवराईस आलें तें समई आम्ही विनंती केली की पागेस सरंजाम द्यावयाचा करार केला होता त्यास कस्त मेहनत करून आमल बसऊन तीनचार वरसें जाली आद्याप देंत नाही त्याणी उत्तर केलें की तीर्थस्वरूप राजश्री तात्या जवल करार केला आहें कीं आखेर सालापासून सरंजाम पंचवीस तिसा हजारांचा देऊ त्यास अखेर सालास च्यार महिनें जालें आद्याप सरंजामास ठिकाण नाही या खेरीज तलब पैकी बारगिरास व पोरग्यास रोजमुरा व घोडयांस चंदी नेंमणुके प्रा देंतात आज च्यार वर्से भरत आली आद्याप हिसेंब करीत नांही हिसेंबाचे हि पुसलें त्याचें उतर केलें की तुम्हास हिसेंबासि दरकार कायें तुम्ही चाकरी मात्र करणे आम्ही हिसेब तात्यांजवल समजाऊन देऊ त्यावरून आम्ही रोंजमुरा खाऊन आज च्यार वर्से चाकरी करितों रोंजमुऱ्यावर च चाकरी करून राहावे किंवा चहु वरसांचा हिसेंब व सरंजामाचा जाबसाल करून देंतात की नाही येविसी आज्ञा होईल त्या प्रा वर्तणुक करू हें सर्व वर्तमान पुताजीस ठावकें आहें तरी पुताजीस बोंलाऊन नेऊन वर्तमान साकल्य ध्यानास आणून या दोंही गोंष्टीचा जाबसाल राजश्री नाना व राजश्री संकराजी पंतास पुसोन पुताजीस इकडें सत्वर रवाना करावें म्हणजें पुताजीस येथें ठेऊन आज्ञा होईल तरी मी सेवेसि येईन च्यार वरसें या प्रांतें होंत आली चहु वरसांचा हिसेब व सरंजामाचा जाबसाल करून पाठवावा व आज्ञेप्रा वर्तणुक करू वरकड इकडील वर्तमान तरी आठ पंचवीस हजार फौजेनसी श्रावण मासी चमेलवर येऊन भींडचें

ठाणें घेऊन नारायेणदासाच्या हवाला केलें राजश्री बाळाजी गोविंद यांस विस्वास दाखऊन छापा घालून लुटुन पस्त केलें कबिलें घेऊन सडे मात्र पलोन गेलें कालपीस ठाणें जाटानें बसविलें पांच हजार फौजें कालपी प्रांते ठेउन दत्या व सेवडें प्रांते येऊन तेथील मामलत चुकाऊन ज्ञां ( सि ) कडे दबाव देऊन नरवरच्या पुलावर आला तेथून या प्र‌ांतें यावयाचा सला खीचीने दिल्हा होता परंतु विचार करून माघारा फिरोन ग्वालेरीजवळ जाऊन राजश्री गोविंद सामराज यांस दबाव देऊन जिगनीचें ठाणें घेऊन आपले ठाणे बसऊन चमेंल पार गेला समागमें पछारवालें व गोंहदवालें आहेत गोंहदवाल्यानें जाटास विनंती केली की आमचीं ठाणी दक्षण्यानी घेंतली आहेत ती घेऊन देणें जाटानें उत्तर केलें की कार्तिक मास परयेंत त्याच्या फौजाची वाट पाहाणें फौजा न आल्या तर कार्तिक मासी येऊन ठाणी घेंऊन देउ आणि पुढें ही जेथ पर्यंत आमल सुटेल तेंथ परयेंत सोंडउ जाट नरवरा पावेंतो आला तेव्हा आहिरानी वगैरे जमीदारानी या प्रांतें दुडी करावयास सिध जाले होतें परंतु ते गेला यामुळें जागाचें जागां च थबकून राहिले या प्रा इकडील वर्तमान आहे सेंवेसिं श्रुत होय बहुत कायें लिहिणें लोभ कीजें हे विज्ञापी

चिरंजीव चिमा ती वर्षानी घरास गेला तों त्याचें स्त्रीचां गत तसी जाली त्यास त्याची सोये करून देणार आपण वडील आहेंत विस्तारें सेवेसि विनंती ल्याहावी असे नांहीं हे विज्ञापी

---

ले० १५७ — १६८६ फाल्गुन शुद्ध ३

१७६५ फेब्रुवारी २२

पौा छ १३ शवाल मुा कोतुल सन ११७५

सिवाजी गोपाळ व राघो रावजी यांचें फाल्गुन शुद्ध ३ मुक्काम नजीक ग्वालेरचे दादाजीस पत्रः—प्रस्तुत मु॥ मजकूर येथील गढीस मोर्चे लाविले आहेत येका दो दिवसानी खाली होईल उपरातीक गोहदकराचे पारपत्य करणे जरूर दुसरे मनसवा की जटवाडियात जावे ऐसा इरादा आहे आपल्यास उपयुक्त दिसेल ते करितील येथील वर्तमान पेदरपैली श्रीमंत राजश्री रावसाहेब आपल्यास लिहितात त्यावरून आवगत होये तीा राजश्री तात्या ज्याप्रमाणे ममता करितात त्याप्रमाणे आपण हि करावी सेवक लोक पदरचे आसो बहुत काये लिहिणे लोभ निरंतर आसो द्यावा हे विज्ञापी

---

ले. १५८

सदासिव गंगाधराचें दादाजीस पत्र --

लस्करचीं पत्रे येजमानाकडील आलीं तीर्थरूपाचे पत्र च नांही परंतु फिरती लागली बुंधेलखड प्रांत सेवढया नजीक आहे दतियेवालयाचा वकील आला आहे त्याची मामलत चुकलयावर वोडसेवाले हि मामलत करतील परंतु फौजेचे नेट पाहिजे आपल्या फौजातील लोक कांही उठउठो आले सबब नवी फौज ठेवावयासि मातुश्री आहिलय बाईस त्यानी लिहिले बाईनी इंदुरीहून आम्हांस दोन हजार फौजेविसी लिहिलें आहे त्याचा विचार तुमच्या विचारें कर्तव्य आहे त्यास येका दो दिवसानी आंम्ही गांवांस येऊं तुमची भेट होईल सविस्तर मजकुर सांगु आम्हांस गुंता पुण्यात जामखेडच्या सनदाविसी आहे तो लौकर च उरकेल आणि येतों श्रीमंत राजश्री दादासहेब भाद्रपद शु॥ १० तुलापुरावर येणार तेथे स्वार होऊन पुढें आनंदवलीस जातील सात आठ मुकाम तुलापुरी होतील आपलया गांवापासून जवळ उपद्रव पुष्कल लागेल आनिवार कारभार आहे बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद चिरंजीव राजश्री माधवरायाची पत्रें रामरायासि व त्रिंबकपंतदादास आली आम्हांस पत्र न लिहिलें कलावे हे आसीर्वाद

---

ले. १५९ श्रीमोरया १६८७ अश्वीन व. ४

१७६५ आक्टोबर ३

तीर्थस्वरूप सौ॥ मातुश्री बाइ वडिलाचे शेवेसी

आपत्ये कृष्णरायानें व गोविंदानें चरणावर मस्तक ठेवोन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत आश्वीन वद्य ४ बुधवार पावेतों किले झासी येथे सुखरूप वडीलाचे आसीर्वादे आपली मंडळी सह वर्तमान आसो वडीलाकडून पलशीकराबरावर सवीस्तरे श्रावण वद्य त्रयोदशी मितीचे आसीर्वाद पत्र पाठ्वले ते पावले तेणे [ करून ] बहुत आनंद जाहला वडीली वडीलपणे शासनअर्थे कितेक पत्रीं आज्ञापिले ते सिरसा वंद्य आहेत परंतु सांप्रतच्या वर्षांत द्वादशस्थानी बृहस्पती आला आहे त्याची कृपा आहे तो फलादेशास चुकत नाहीं परंतु वडीलाचे चरणाचा सहवास आहे येणेकरून सर्व उपद्रव आपले आसीर्वादे दूर होतील वडीलीं सर्वदा आसीर्वाद पत्री लेकराचा सांभाल करावा श्रुत होये हे विज्ञापना

गंगाजान्हवीसमान मातुश्री ताई वडीलांचे शेवेसी आपत्याचे सीर सा॥ नमस्कार लाब पल्ला म्हणोन पत्र गेलं नाहीं यांचा लेकरावर कोध करीत न जावा आसीर्वाद पत्री लेकराचा सांभाल करीत जावा हे विज्ञापना

हो। सर्कभट वेसीकर याचे व सिवाजी नाठक याचे समस्तास नमस्कार व आा असीर्वाद लोभ असो दीजे हे विनति

हो रा धोंडभट्ट सुदामे व लक्ष्मण पंत व्याही स्वामीस सां नमस्कार सदैव + + + + +सौ मा लक्ष्मी वहिनी व सौ मा व सौ मा उमावहिनीस सां नमस्कार

---

ले. १६० श्रीमोरया

गंगाधर यशवंताचे बाजीपंतास आस्वीन शुध ५ चें मुा झासीहून पत्र--

विशेष तुम्हीं पान्होळियाचे मुकामीहून पत्रें पाठविली ते पावोन सर्व अर्थ अवगत जाहाळा मातु + + + + + + वोंकारेस्वरास श्री + + + + + तिलींगाचे दर्शन घ्यावे या उदेशे येथपर्यंत समागमे आली आहेत त्यास घेऊन उजेनपर्यंत येतो व पुडे सुवता आसल्यास श्री विस्वेस्वर दर्शन मातुश्रीस घडोन पित्रुरुणां पासून हि आपलच्या आसीर्वादे करून उतीर्ण व्होवे येसे आहे त्यास आपली आज्ञा होईल तद्नरूप वर्तणुक करूं मातुश्री समागमे आलीयासं उजनपर्यंत चाळीस पंनांस स्वार हि माळव्या पर्यंत समागमे आणिले जातील म्हणुन व कितक स्वकीय अर्थ हि समक्ष बोलणे ते हि निवेदन होईल येसे लिहिलें यैसीयास देसाकडील तो बदोबस्त तुम्हीं केला च असेल त्यास मातुश्रीचा हेत पूर्ण करावा हे विहित तरी तुम्हीं प्रस्तुत त्यास उजेन पर्यंत समागमें आणुंन तेथे त्यास ठेवावे आणि सडे जरूर तुम्हीं समागंम उतम पाहुनं (यावे) प्रस्तुंत झासीस मोर्चेबंदी केली आस हे काम जाहालियास मासपक्ष या प्रांतात आहो तो सत्वर भेटीस यावे भेटी नंतर स + + + + + + कळोंन पुडे जे कर्तव्य + + + + + देसी पत्रें पाठविली आहेत पेशजी ते वृत ध्यानास आणुन तिकडील जाबसाल आणविला च आसेल लोभ आसो दीजे हे विनंति

---

ले. १६१ श्री १६८७ मार्गशीर्ष व. ७
१७६७ दिसेंबर १२
पौ मार्गसीर्ष वद्य अमावाशा
गुरुवार

श्रीयामह चिरंजीव राजश्री दादाजी यांसी बाजी विठल असीर्वाद उपरि येथील कुशल ता मार्गसीर्ष वा ७ पर्यंत मुकाम पारोळें जाणुन स्वकीय कुशल लेखन करीत असले पाहिजे विशेष आपली आज्ञा घेऊन स्वार जालों ते मणचरास येऊन तेथून बोतुरास आलों तेथुन बाभरड्याचा घाट चडता लस्करातील माणसें आदळलीं त्यांणी सांगितलें की श्रीमंत खानदेशचा घांट उतरून पारोळ्यास गेले त्याजवरून चित उद्विग्न जाहालें मग कुमेनसिंगी व झिमी यैशा घोड्या जिवबास घेऊन मार्गातून ... रवाना करून कोतुंलास आलों तेथे रा गोविंद पंत होते त्यास व रामचंद्र पंतास

ताकिद वसुलाची व लक्ष भोजनाचे सामानाची करून दापुरास येऊन दुसरे रोजीं नायगांवास आलों तेथें वो राजश्री दिक्षितांच्या मुखे व आणखी बहुतांच्या श्रवण केलें कीं पारोल्यास परिछिन्न गेले ते समई नाशकास चिरंजीव राजश्री आन्याबास चिठी पाठविली कीं रातोरात याल तर भेटी होईल नाहींतर मजला परिछिन्न जाणे आणि लाखलगांवी रा सिवरामपंत फाटक होते त्याजकडे जाऊन जनस्थानाकडील कागद यादी त्यांच्या स्वाधीन केल्या आणि बोलुन नायगांवास दिडप्रहर रात्रीं आलों तो चिरंजीव हि नाशकाहुन अर्डाच प्रहर रात्रीं रामकृष्ण-राव देखील आले भेटी होऊन परस्पर सारस्याचे भाषण जाले ते सविस्तर भेटी नंतर अवगत होइल तेथुन त्यांची आज्ञा घेऊन येक मुकाम मधे करून दुसरे दिवसीं मंलगांव नजीक लस्करांत दाखल जालो श्रीमंतां जवळ सर्व मंडळ आजकाल आपलें आहे वो राजश्री जोसी बावाची भेटी जाली त्याणी श्रीमंताची भेटी केली कांहीं बोलणे हि जालें ते समक्ष कलेल त्याज वर श्रीमंतास पुसोन येथें आलों आहे मागांहून आपणास ... विसी येक पत्र पाठविलें होतें ते पावलें च असेल हालीं पत्र पावतांच स्वार होऊन मोठया मोठया मजला करून लस्करांत आपण जरूर जरूर यावें उभयतां श्रीमंताच्या भेटी बहाल भडगांवच्या दरम्यान होऊन पंधरा दिवस पर्यंत मुकाम होतील तों पर्यंत आपण हि यावें बराणपुरा पर्यंत आपण श्रीमंतासमागमें राहून कित्येक मारप्रसंगो चित बोलावयाचे करावयाचे आहेत श्रीमंतेने या प्रसंगी उभयतां श्रीमंत हि आपणांवर सकृप होऊन मनसबा होईल येसे दिसतें बराणपुराहुन आज्ञा घेऊन गोंदीकडे जाऊं यावयास अनमान न करावा समागमे वो राजश्री शास्त्री बावांस आणावें शामाच्यार्थे आले च असतील त्यास आणावें मार्गाने बहुत सावधतेनें यावें घरचा बंदोबस्त रावाबापारा सांगावा खेड्याचा वसुल व गला हंगामसीर घ्यावा सोवती मातुश्री बाई देसी आली-यावर आणखी हजार रुा पर्यंत यावयासी सांगणें व खेड्याचा येवज जमा होईल त्या पैकीं पांच से रुपयांचा गला हगामसीर खरेदी करावयासी सांगावें मन्यास बराबर आणावें आलंकार बरोबर कांहीं न आणावे घरी वाफगांवी च्यार प्यादे व निंबगावी च्यार प्यादे या प्रो ठेऊन बंदोबस्त चौकी पाहारा करावया विसी बापांस ताकीदा चिरं-जीव सौवती उभयतां मुली वाफगांवी च असों देणे रा भिवबास आणून घरी ठेवणें..... घोडी राहातील त्याची निगा करावयास सांगावी चिरंजीव रा॥ आन्याबानी घोड्याचा रथ आम्हास दिल्हा आहे त्यास तो रथ वाफगांवी आणून समागमे इकडे आणाव तुम्ही संगमनेरावरून यावे रथ पारनेरावरून आणवावा अनमान न किजे सारांश लौकर लौकर यावें वरकड सविस्तर बारीक मोटे मजकूर भेटी नंतर कलतील माहादाजीपंतास ताकीद करून शरीर संबंधाचे नेमस्त करून ठेवावें माघ आखेर आम्ही येऊ तेव्हा सिद्धता आसावी येसे सांगावे हे आसीर्वाद.

---

ले. १६२

बाजीशामराज याचें बाजीपंत भाऊ यास फालगुन वद्य ७ चें पत्र–विशेष तुम्हीं हिंदुस्तानास जात होतां म्हणून रायेभाना बरोबर पत्र पा तों कुलमरीपासोन माघरा आला मागती वर्तमान आलें कीं श्रीमंत राजश्री दादासाहेब यासमागमें कवडे आहेत म्हणून मातुश्री माईची आज्ञा कीं त्याच्या समाचार पांचचार महिणे कलत नाहीं याकरितां फार चिंतातुर आहेत म्हणून मुजरद रायेभान पाठविला आहे तर आपले स्वकुशल वर्तमान सविस्तर पाठवावें यानंतर...... सौभाग्यवती आवई माघ शुद्ध २ द्वितीयेस मूल पाठऊन येथे आणिली होती चिरंजीव माधवराव समागमें आले होते येथे आलियावर पांचचार रोजा हिंदुस्तानचें वर्तमान विस्कलित अफवा आली त्याजवरून सौा आवई फार श्रमी होती तों साता आठा रोजानी राजेश्री सिवाजीपंत विंदुरवालें याचे पत्र निंमगावी आलें कीं श्रीमंत तात्या सुखरूप कुमेरीस सडें सुखरूप आलें तें च पत्र सौावती बाईनी तलेगावीं आवईपासी पा तेणेंकरून मातुश्रीस व समस्तास सतोश जाला श्रीची शरकरा येथे वाटली त्याजवर चौ पांचा रोजा निमगांवी सिदें निमगावचें त्याचा पोरगा पल्यां आला त्याणे वर्तमान सागितलें कीं श्रीमंत् कुशाबा श्रीमत् तात्यापासी नाहीत ते चुकलें त्याजवरून मागती निमगावीं बहुत समस्त मंडली श्रमातुर जाली तें चं समई*

---

ले. १६३ श्री

वडिलांचे सेवेसी आपत्याचा सां नमस्कार विज्ञापनां येजमानाचे शरीरी बहुत आस्वस्थता दोन दिवसाचा आंगी ताटकल यास्तव मादगी बहुत आहे आपलें हि स्मरण केले होतें त्यावरून सांगितलें कीं वाखा जाला म्हणोन देवाच्या दर्शनास निंबगावी गेले लौकर येतील त्या वरून सांगितलें कीं देवदर्शन करून यावें श्रीमंत राजश्री दादासाहेबाचे पत्र आले त्याची नकल पाठविली आहे त्यावरून कलेल महमद मुरादखान याची हि चिठी श्रे [ ह ] भावाची आली दुसरे येथे सटवाजी गायकवाड आले व उडती बातमी आली त्यानी सांगितलें की श्रीमंत रावसाहेबांची व दादासाहेबाची भेट-जाली परस्परे श्नेहभाव जाला येसी वदंता आहे वडीलास कलावें म्हणोन लिहिलें आसे भेटीचा मजकूर सत्य आसावासा आहे यांत संदेह [ नाही ] खरे आहे श्रुत होये हे विज्ञाप्ती भेटी क्षेपनिक्षेप जालया सटवाजी गायकवाड यांच्या गावापासून जवल च आहे तेथून सटवोबा आला वडिलास कलावें हे विज्ञाप्ति

---

* पुढील बंद गहाळ झाला आहे.

ले.१६४ श्री पै. १६८८ अ. चैत्र शु. १०
१७६६ मार्च २१

पुा तीर्थस्वरूप राजश्री दादाजी वडीलांचे सेवेसी सांा नमस्कार

विनंति उपरि राजकी वर्तमान तरी दतिया वोडस येथील मजकूर तो पेशजी लिहिला होता त्यावरून कलले च आसेल राजश्री विश्वासराव लक्ष्मण याचे स्वाधीन दोन्ही सवस्थानची वसूल व चालीसा लाखांची जागा केली या प्रांचा राजश्री बहेरो आनंत व [ राजश्री विठल रा ] व सिवदेव याचे मुलकाचा बंदोबस्त करूनं जिल्हा + + + + + नरवल येथे हि काही फौज रवानां करूनं बंदोबस्त करविला आहे नरवरचे वकील आले आहेत फरशा अद्यापी जाला नाही सांप्रत्य पछमरेची मामलत रुा तीन लक्ष करूनं गोहोदचे रानात आलो येथे येकदोन गढ्याचे पारपत्य हि केले सांप्रत्य त्याकडील वकील आले आहेत रुा पंचवीस लक्ष व पेशजी प्रां मुलूक द्यावयासी सिध जाले आहेत परंतु आपले रुा पंनास लक्ष निघतात यास्तव मांन्य न जाले सांप्रत्य वकील गोहोदेस गेले आहेत आद्यापी आले नाहीत नजीबखान व राजे माधोसिंग जैनगरकर आपण येक आहो नजीबखानासी व सीकासी कटाक्ष वाढून पाच सात युध्ये हि जाली नजीवखानाचा त्यानी पराभव करूनं जवाहीरासिंग जाट याकडे आले तेथे राजेश्री माधोसिंगाकडील फौज जाऊन युद्ध जाले सिखाचा पराभव जाला पाच सात से घोडे व पाच सात हजार माणूस मारले त्याची पत्रे उभयेताची आज च आली न्यांहारासिंग जाट येथे आले आहेत यास्तव जवाहीरसिंगाचे पारपत्य करून यासी राज्य द्यावे आणि पैसा मबलग मेलवावा या + + + + कुरा ज्याहानाबादेस आले आहेत त्याकडील वकील फिरंगीयाकडील वकील आसे आले फिरंगीयाची पत्रे आली त्यात मांर की तुम्ही कोणे गोस्टीचा बसवास न धरिता सलुख च करावा आणि तुम्हांस येक किला व काही हाजार दोन तिन पर्यंत गाव कोकणात देऊ या प्रां म्हणतात त्यास हि पत्रे आली आहेत तेह पातशाहा लौकर येणार पातशाहास जाटाचे पारपत्य करूनं पैका मबलगं घेऊन तखती बसवावे या प्रा सर्व मजकूर आहे खेचीचे हि पारपत्ये करावयाचे आहे वरकंड राजकी स्वकीये पुर्वणी पत्री लिहिले आहे त्यावरूनं कलल पै॥ छ ९ सवाल सुा सीत मु॥ कोंतुळ

---

ले. १६५ श्री. १६८८ अ. चैत्र व. १
१७६६ मार्च २७

पौ छ ५ जिल्काद मुा नजीक झाशी
राजश्री माधवराव गंगाधर गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्ये स्नो आहिल्याबाई होळकर दंडवत विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जावें विशेष लष्करात खर्चाची अडचण

महर्गता हि आहे म्हणोन येथें आम्ही वर्तमान ऐकिले त्यावरून तीर्थस्वरूप राजश्री सुभेदारास हि विनंतिपत्र लिहिलें आहे त्यास तुम्हीं एकांती तीर्थस्वरूपांस पत्र निवेदन करून पत्राचे उत्तर पुसून घेऊन आम्हास लेहून पाठविणे लष्करचे वगैरे राजकी वर्तमान तपसिलें लिहिले रा छ १५ माहे सवाल बहुत काय लिहिणे हे विनंति

---

ले. १६६ श्री श. १६८८ वैशाख वा १४
श १७६६ ता. ६ मा. जून

चिरंजीव राजश्री दादाजीस प्रति विनायेक बाजिराव आसिर्वाद उपरी येथील कुशल ता। वैशाख वद्य १४ मु॥ नजिक गोहद येथें आसो विशेष तुम्ही दोनच्यार पत्रें पा। ते पावली लेखनार्थ सर्व आवगत जाला तीर्थरुपास तुमची पत्रें होंती ती चिरंजीव राजश्री माधवराव यानी श्रवण करून उतरे पा। आहेत पावतील इकडील वर्तमान तर येजमान मृत्य पावलियामुळें मोटा पेच पडला त्याचा विस्तार कोटपर्यंत लिहावा आवदा लस्करें देसास येतील श्रीमत हि माळवियाचें आसपास छावण्या करितील श्रीमंताच्या व येजमानाच्या मनात होते की या प्रातीचा बंदोबस्त करून आंतरवेदीत जावे त्यास येजमान चीं आसी गती जाली तेव्हा मनसवा करणें कळत च आहे दिवस हि डोइवर आलें याज करितां माघाऱ्या येऊन छावणीया कराव्या येसा विचार होत च आहे सियाचा कारभार तसा च बखेडियांत पडला आहे च्यार दिवस नारोपंतास कारभार सागावा यसें होते च्यार दिवस दुसरीयांसि सागावें येसे होते कैसे होते हे पाहावे येंणे प्रो वर्तमान आहे देंसी मुले माणसे आहेंत त्याच्या परामर्षाविसि लि॥ येसे नाही सुचनार्थ लि॥ आसे दाणियांची माहागाइ आहे काही सोय करावी भरवसा तुमचा आहे बहुत काये लिहिणे लोभाची वृधी करावी हे आसिर्वाद तीर्थस्वरुप राजश्री बाजीपंत मामास सा। नमस्कार लि॥ परिसिजे लोभ किजे सर्व प्रो भरवसा स्वामीचा आहे ज्या प्रमाणे भरवसा धरितो त्या प्रा। निभाव करणे वडिलाकडे आहे बहुत काये लिहिणे लोभाची वृधी करावी हे विनंति

---

ले. १६६ श्री. १६८८ जेष्ठ वद्य ३
१७६६ जून २५

राजश्री गंगाधरपंत मामा गोसांवि यासि अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॥ सटवोजी जाधवराव दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत गेलं पाहिजे विशेष मल्हारजी होळकर मामा कैलासवासी जाले हे वर्तमान यैकून चित्तास परम खेद जाला तो पत्रीं कोठवर ल्याहावा तीर्थरूप सुभेदारा प्रा। आमचे ठाइं ममता करीत होते बरें इश्वरास आवडले ते गोष्टीस उपाय नाहीं आतां त्याचे ठाइं वडील आपण आहेत नरवर प्रांतीच्या अमलाविशीं कैलासवासी मामानी अभि-

मान चांगला धरिला होता वरें मामाचे ठाई आपण आम्हास वडील आहेत अभिमान पुरस्कर राज्याचे पारपत्य यथास्थित होऊन पांच सा वर्षांचा पैका राज्याकडील हस्तगत




होऊन आम्हास पावे येसे केले पाहिजे व सीपरी वगैरे ठाणी दोन तीन हस्तगत जाली नाहींत तें ही हस्तगत केली पाहिजे. कुकरस वगैरे ठाणीं सांप्रत आपण च सोडविली आहेत त्याचा वसूल राजश्री गोविंद सामराज व रामचंद्र सामराज कादार आम्हाकडें येक पैसा पाठवीत नाहींत हे सविस्तर वर्तमान राजश्री धोंडो पद्माजी यांनी आपणास निवेदन केले च असेल त्या प्रो त्या उभयतांस वरें वजेनें फजीत करून आम्हास खर्चास हुंड्या करून पाठवीत येसे केले पाजे इकडें ही वरचेवर मसलतींची चाकरी श्रीमंता जवल पडती यामुळें कर्जाचे पेंच भारी पडले आहेत याजकरिता आपण चितावर धरून आम्हांस तिकडून खर्चासी येऊन पोंहचे येसें केले पाजे सर्व प्रकारें भरवसा आपला असे येविशीं उपरोधिक ल्यांहावेसे नाहीं ता छ १७ मोहरम बहुत काय लिहिणें लोभ असों दिजे

मोर्त
बसुद

हे विनंती

---

**ले. १६७** **श्रीमोरया** १६८८ ज्येष्ठ शु. ६
१७६६ जूल १३

सौभाग्यादिसंपन्नवज्रचूडेमंडित मातुश्री बाई वडिलांचे सेवेसी

आपत्ये दादाजीने चरणावर मस्तक ठेऊन सा नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान जेष्ट शु. ६ जाणून वडिलीं आपणा कडील वृत लिहीत जावें विशेष काल गुरुवारीं तृतीय प्रहरीं हिंदुस्थानांतून पत्रें श्रीमंतांचे घरी आलीं वैशाख शुध ११ येकादसी मंगळवारी श्रीमंत सुभेदार मृत्य पावले बजाबाई व दारकाबाई उभयतांनी सहगमन केलें ईश्वरें मोठा घात केला सर्वांचे छत्र गेलें श्रीमंतांनी तीर्थस्वरूप राजश्री त्र्यंबकपंतदादा व मज कडून तमाम माहाल व कोट किले यांसी पत्रें लिहिविलीं कीं चितात कोणेविसी खतरा न आणून आपलाले जागा मजबुदीने व नक्षाने सुखरूप राहावें सुभेदाराचे जागा राजश्री मालराव बाबा आहेत याप्रमाणे पत्रें लिहिलीं वडिलीं चिताचे सांतवन करून चिताची स्थिरता करून आसावें आपलीं पत्रें आयापी कांही आलीं नाहींत मागाहून येतील हे विज्ञापना

---

ले. १६८ श्री १६८८ ज्येष्ठ
१७६६ जून

पौ जेष्ठ वद्य ७ शके १६८८ व्यय नाम सवत्छरे.

श्रीमंत सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाई साहेब वडीलाचे सेवेशी विनंति सेवक यादो तुकदेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना यैसी जे येथील कुशल जाणून ता॥ छ माहे मोहरम ठाणे पीपलगाव आलव पा॥ जामखेड येथ आपले कृपा आवलोकन करून क्षेमरूप असो विशेष माहालचे वर्तमान तरी पूर्वी आपणास विनंतिपत्र लिहिले होत त्याज वरून ध्यानास आले असेल श्रीमंत राजश्री आन्याबा आंबडचे मुकामी होते तेव्हां जमीदार मंडळी सुद्धा त्याजकड गेलो होतो त्यानीं आपले समक्ष प्रा॥ मजकूरची जमाबंदी केली आम्ही आज्ञा घेऊन माहाली आलो गावगना पाटील कुलकर्णी जमा करून जमाबंदीची तफरीक केली वसूल चाली लागला तो मोरो गिरमाजी निंबेकर उष्टरखांनीयावर कारकून सरकारच्या असतात त्यानी जामखेड पा॥ याची चौथाई व बाबती सरकारांतून करोन आले पूर्वी मौजे संताली व घोडेगांव हे दोन्ही गांव श्रीमंत आन्याबाकडून संताली राजश्री रामचंद्र गणेश याजकड दिल्हे व घोडगांव नारायणजी बाबर याजकड दिल्हे त्याच्या सनदा पूर्वी आल्या होत्या तेव्हां आपले आंगवल गांव राखीले होते श्रीमंत आन्याबाची आज्ञा होती त्यास श्रीमंत रावसाहेबांचे लष्कर बीड प्राती आले तेव्हा राजश्री आन्याबाच्या हतच्या सोडचीटया दोहीगांवच्या व सरकारच्या मसाला जमीदारावर रु ५०० व संताडीयाबरावर रु १०० व राऊत दोनसे यैसे वेंकाजी गणेश मोकाशी याच्या सनदा घेऊन आले त्यामधें धामधूम बहूत केली आपण कजिया करावा तरी दो गांवच्या सोडचिठ्या होत्या व पत्र आले होते की कालदेशवर्तमान पाहून आपली आबरू राखोन सरकारचे काम करणें दरबार काम राजश्री त्रींबक विनायक सुभेदार यास पत्री लिहिन जावे म्हणजे दरबारचा बंदोबस्त करून देतील यैसे पत्र आले तेव्हां कजिया कोणाच्या बल करावा यैसे असोन परगणे याचा बदोबस्त राखोन लष्करात पत्रें व कारकून राजश्री त्रिंबक विनायक सुभेदार याजकड पाठविले वर्तमान सवीस्तर लिहिले त्यास त्याही उत्तर पाठवीले की ज्या प्रा॥ आन्याबानी आज्ञा केली आसल त्याजप्रमाणे वर्तणूक करणे यैसें पत्र आलें वेंकाजी गणेश याचा उपराला वरचेवर लस्करातून होउ लागला शाहजवल उपाये नाही त्याही धामधूम मनमाने तेंसी मांडली दोन राउत प्रा॥ फिरो लागले तेव्हा आमचा तहसील बंद जाली उपाय नाही ते स्वाराच्या चाल संताड व घोडगव वसूल सुधा माघारी दिल्हा मोकासा व बाबती सरकारच्या आकारापेक्ष्या अधीक घेतले मसाला रु॥ ५०० जमीदारापासून घेऊन पायात घासदाणा घेतला यैसा बखेडा जाला याजमुले तहसील अवघ्र लस्कर या प्रांते होत तोवर बंद होती तफरीक अगोधर केली होती वसूल करीत आहेत जमाबंदी करार

जमा रुपये

१००५१ यैन जमाबंदी

५०० नजर

५०० कारकुनी

११०५१

पैकी वजा दुमाले गाव तनखेबा

२४६० दुमाले गाव

१४५० संताड

१०१० घोडेगाव

२४६०

७२९ तनखेबा कृस्णराव गोविंद

५५५ धामणगाव

१७४ नाहुली

९७२

३१८९

बाकि जागीर रुपये ७८६२

पैकी वरात वगैरे

२३२२ वराता परभारें पां

कबजा

१०२७ केशोराव पंडीत आग्नहोत्री

७५ त्रिंबक मुदगल

४५० नरसिगराव नलिकठ प्रां घोडा

३६५ बाबूराव नलिकंठ

१०० लक्ष्मन गिरमाजी

६० फडणीस हुजूरचा

२०० सिरपाव जमीदार

१० गंगाजी मुटे

३५ जीन

२३२२

२००० नेमणूक माहली
१००० विष्णु माहादेव वा। लक्ष्मण गीरमाजीं हुंडी

५३२२
बाकि रुपये
२५४०

पंचवीसे चालीस रुा राहिले त्यास आपल्या दर्शनास येताना रुा १००० हजार घेऊन येतो बाकी राहिली त्यास कारण की दर्मियान मोकासियानी दं ( गा ) केला आद्याप त्याचे स्वार प्यादे गावगना दंगा करीतच आहेत त्याचा आमचा नित्य कजिया होत आहे आखेर सालचे दिवस लावणीचे याहीमधे पर्ज्यन्य उघडला लोक घाबरे बहुत जाले दाणे रुपयाचे तीन पायेली कडबा चालीसा रुा हजार गुदस्ताची तवाई हल साल पाऊस गेला तेव्हा पुढें वस्ती कसी राहील कोणत्या आसरियावर राहावें यैसे कितेका प्रकार भयाभीत आहेत यामुले बाकी राहील ईश्वरकृपेन पाऊस पडोन आबादी जाली म्हणजे हुसार ? पर्येत रुा वसूल होईल वरकड वर्तमान राजश्री लक्ष्मणपंत जबानी सांगता कलो येईल श्रुत होय हे विज्ञापि

---

ले. १६९ **श्रीमोरया**

आसीर्वाद विनंति उपर सोमवार संध्याकाळचे पत्र पाठविले तें पाऊन वर्तमान सर्व आवगत जालें येथील प्रकार दिनचर्येचे कचे वृत दररोज लिहित गेलों श्रीमंताकडील मुछदी आपल्या परी जाबसाल करितात आम्हांस तो कैलासवासी सुभेदार साहेबाचा धारा आहे त्याप्रमाणें करणें दुसरें होणार नाही फौजेस ताकीद करून येके ... ... ... ... ... काल सोमवारी ... ... ... जाबसाल दोन्ही प्रकारचे जाले सेंवट सांफ सांगितलें कीं आम्हास निरोप द्यावा नांहीं तर जसें चितातील भाव ते बोलावे तेव्हा बहुत गोड बोलून तुमचे तुम्हावर टाकले आम्ही गाली गुतलो या समई साहाये करावे तुम्हा खेरीज दुसरा सरदार कोणता की त्याजला आम्हीं संकट घालावें वरकड तुम्ही हिसेब दिल्हा तो आम्हास प्रमाण आहे यैसे हि बोलू लागले आम्ही उतर केले की ये समई आम्हीं जाऊन फौजबंदी करून येतो कैलासवासी सुभेदार साहेबा मागे वडील धणी खावंद आहेत मस्तकी हात ठेऊन कृपा करावी साहेबाचे प्रतापें वडीलाचे पुण्ये करून दाखऊ म्हणजे सहजात पैसा मिलल तूर्त निर्गत करून आज्ञा द्यावी विहित आसे सवा दीड प्रहर रात्र पर्येत दरबारी राहिलों सेंवट तेथे च रात्रौ निद्रा आज ... करून निकड केली आहे आज निदान उदैक राहून सर्व निर्गमात ... ... ... आपल्या कडून ... ... ... करीत नांही श्रुत होये हे विनंति

---

ले. १७० श्री

राजश्री मालजी बाबा होळकर गोसावी यासि

आसीर्वाद विनंति उपरी आपले कुच होऊन नवलसिंग गुजर याचे तालुकीयात स्वरीयावर गेले त्यास तेथे स्वारीचा उपद्रव लागला दोन तीन गाव कहीनें लुटले त्यास आपणा कडील उपद्रव आमचे जिल्यास लागावा ऐसे नाही तो हि जिल्हा आपला च आहे त्यास लस्करांत ताकीद करुन गावास उपद्रव न लागे ते करावे गुरे लस्करात आणली असली तर सोडून देवावी घासदाणीयासीं तगादा लागला आहे ते मना करावे येविसी अनमान न करावा कलले पाहिजे माणसे हि मारली गेली यात विचारास येईल ते करावे बहुत काये लिहिणे हे विनंति पुढे मार्ग पंचमाहालातून आहे चितास येईल तैसे रक्षण करावे विशेष काये लिहिणे हे विनंति

---

ले. १७१ श्रीनकल १७६९

यादि येशवंतराव गंगाधर यांजकडील इनाम गांव सुा तिसा सबैन मयां व आलफ

८५०५ ताा खेड सरकार जुन्नर
२५९६।।। मौजे निंबगांव
२५९२।। मौजे कनेरसर
९०१ मौजे गोसासी
१४३१।।। मौजे पुर
९८३ मौजे जउलके बुाा
८५०५
३००७७।•। पाा नेवासे
१३८१२ काा नेवासे बुाा
२४९६।।।=। मौजे बहिरवाडी
३२३५।।=।। दहिगांव
५३२।।=।। राजणी
१०००० किाा गांव
२२४४। मौजे कातरड
१४९३।=।। मौजे तरवडे
१९०३। मौजे रस्तापुर
२४३५।=मौजे हिवरें

१९२३॥~॥ गुंजास वेरीज
चौ गावची

१००००

३००७७।०।

५८८५८॥~ पो आंबड

११०१४॥~ मौजे गोंदी

१३३९४ मौजे व्याह्या मांडवें

९५० मौजे हिवरें चौढाले

८५०० मौजे साष्ट पिंपलगांव

२५००० नवें गांव होलकरा कडील

५८८५३॥= घेणे ते

२४५८॥ कडेवली......

१६९६॥ मौजे गणेगाव

७६२ मौजे सांगवी

२४५८॥

९९८९९॥~।

पे॥ वजा इनाम गांव मौजे हिवरें चौढाले पो आंबड रा॥ आवाजी ना॥ वानवले यासिं

देह १ यो॥ वेरीज

९५०

बाकी वेरीज ९८९४९॥~। हो

पे॥ वजा संसारखर्चाचे वेगमीस खेडीं पंचवीसा हजाराची ते देह

८५०५ ता॥ खेड सार जुन्नर

२५९६॥ मौजे निंवगाव

२५९२॥ मौजे कनरसेर

९०१ मौजे गोसासी

१४३१॥। मौजे पुर

९८३ जऊलके बु॥

८५०५

६२६५।०। पा॥ नेवासें पो

३२३५॥~॥ दहिगाव

५३२॥=॥ राजणी
२४९६॥।=। बहीरवाडी
६२६५।०।
२४५८॥ कडेवलीत पैा
१६९६॥ मौजे गणेगांव
७६२ मौजे सांगवी
२४५८॥
७७७१८३॥। किा बेरीजचे गाव सोईचे पाहून घेत्रावे
२५०००
बाकी बेरीज —————————— रो
७३९४९॥=।

---

ले. १७२ श्री. १६८८ आषाढ शुा ८
१७६६ जुलै १५

श्रीमंत राजश्री तात्या स्वांमीसाहेबाचे सो अज्ञाधारक खंडो यादव गुंा मो काा कोन्हले चेरणावर मस्तक ठेऊन सिर सां नमस्कार विनंति उपरि विनवाया प्रार्थना यैसिजे येथील कुशल ताा छ ७ सफर परियेंत येथास्तित जाणोन स्वकिये लेखन आज्ञा सेवकास करीत गेले पााजें यानतर श्रीमंत रोा सुभेदार साहेब कैलासवासी जाले हे वर्तमान यैकिलियावर चितास परम खेद जाला ते लिहिता पुरवत नाही आपन समुदा जेन्म साहेबाचें आश्रीयान येजमानाकडे सेवा करून दिवस कडे लाविले सेवटी भगवंते यैसे केलें उपाये नाही परंतु आम्हांस आपण पुर्वीपासून येजमानाचे जागा माहराज आहेंन म्हणोन भरवसा आहे यैसे जाणून दिमत धरून कामाकाजास सावध सुदामतिप्राो भेटीस यावें हे चिती चिंता आहे वाटेचा विचार उमजत नाही योविसी विज्ञाप्ति केली जाते की आपले आज्ञापत्र आलियावर सेवेसी येईन भेट होईल तो सुदीन आनि चिताचे समाधान होईल सारौरा या पत्राचे उतंराचे पंत्री साकल वर्तेमान लेहून पाले बंहूत काये लिहिणें कृपालोभ आसु दीजे हे विनंति

---

ले. १७३ श्री १६८८ आषाढ वा १२
१७६६ ऑगस्ट २

( पैा ) श्रावण शुा दसमी शुक्रवार व्ययनाम संवछरे
श्रीयासह चिरंजीव राजश्री दादाजी यांसि बाजी विठल आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून ताा आशाढ वाा १२ द्वादसी पावेतों मुकांम पारोलें जाणून स्वकीय कुशल

लेखन करीत असिलें पाहिजे विशेष आपली आज्ञा घेऊन स्वार जालो ते कोठे नेवासे आदि करून येक मुकाम न करितां येथें आलों राजश्री लक्ष्मण रावजीच्या बराबर चालवयाचा विचार सिध जाला यांचे आटोपणें हिसेब तयार होणे यामुळें दाहा आकरा मुकाम आजि पावेतों जाले व मार्गाचा हि शोध आणविला त्यास सेंदवियाचे घाटें जावे तरी सटवाजी गाइकवाड व मकाजी गीते वगैरे पांच सातसें राऊत व हजार पांचसे बरकंदाज भीलाचे पारपत्यास आले आहेत भीलाचे यांचे झुंज मातबर जालें घोडीं माणसें जायां जालीं परंतु भिलांचे पारपत्य चांगले जालें नाही प्रस्तुत आणखी जमाव करित च आहेत डोंगर माजून राहिला आहे यांज करितां सर्वांचे मते दोन मजला आधीक पडतात परंतु बराणपुरचा मार्ग सुगम त्याजवरून त्या मार्गें जावयाचा करार करून काल रावजी प्रस्थानास बागांत आणिले आजि कुच करून पांच सात कोसी जाऊ इतके दिवस येथे लागले म्हणून रागास न यावें मार्गाचे सावध जावे खर्च न करावा सिबंदी न ठेवावी मजबुदीने जावे यैसे कितेक आपले घरचे प्रकार त्याज वरून रावजी सोबत धड चालीस पनास राऊत यांचे इंदूर पावेतों येतील मार्गाची चिंता नाहीं लस्करात माहागाइ विशेष घरची घोडी पंधरा सतरा म्हणजे खर्च पाऊन सरफराजी होईल ते कलत च आहे याजकरितां सारीं घोडी व राऊत नाशकास चिरंजीव सौभाग्यवति यमुना बाईस डोली सहित मूळ पाठविलें वाफगांवास आलियावर सारीं घोडी मातुश्री माई पारोलीयास येणार त्याज बराबर रवाना करावी म्हणजे च्यार दिवस परभारें नंदूरबारेस जगतील अनमान न करावा आम्ही बराबर तीन घोड्या थोर व तटें खेचर मिळोन च्यार येंा सात नेली वरकड खर्च माघारा लाविला कलावे वगैरे

---

ले. १७४ श्री १६८८ श्रावण वद्य ११
१७६६ आगष्ट ३१

राजमान्यराजश्री अंताजी त्रिंबक कमाविसदार प्रा चांदवड दिा होलकर गोसावी यांसि

सेवक माधवराव बलाळ प्रधान नमस्कार सुा सबा सीतेन मया अलफ प्रा मजकूर येथील मोकास बाब जकात सुधां राजश्री मल्हारराव सोमवंशी हिंदुराव याजकडे पेशजी पासून चालत आहे त्या प्रो करार असे तरी तुम्हीं प्रामजकूरचे जमनिदारांस ताकीद करून मारनिलेकडील कमाविसदार मोरो केशव याजकडे सुदामत चालत आल्याप्रो मोकासबाबेचा अमल जकाती सुधा देवणे जाणिजे छ २४ रालावल आज्ञा प्रमाण

---

ले. १७५ श्री १६८९ आश्वीन वद्य ६
१७६७ आक्टोबर १३

राजश्री येशवंतराव गंगाधर गोसावियांसि

छ अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री मालराव होल्कर दंडवत विनंती उपर येथील क्षेम जाणून स्वकीय कुशल लेखन करणें विशेष प्रां गालणा हा महाल दादुखान टोके याजकडील गांव व दाभाडी इत्के वजा करून बाकी दरोबस्त अम्ह्मांकडे येसीयासी प्रो मजकूरचां गांव त्यांत दोन हिसे टोके मजकूर याचे बाकी तिसरा हिसा किले मजकूरच्या जागीरीचा तो अमचा येक्या गावांत दोन सता हा प्रकार उपयोगी नाहीं. याजमुळें टोके मजकूर चांदवडचे मुकामी सन आर्बा सितेनचे सालीं आले त्यानी च कैलासवासी तीर्थस्वरूप बावास विनंती करून वडेलचे दोन हिसे अम्हास दिले आणि दोन हिंशाचा अकार वडेलीचा होत होता. त्या यैवजाचे तीन गांव वडगाव वगैरे सोईचे पाहून सख्त रदबदली करून आपले कडे निखालस करून घेऊन कागद पत्र केले येसें असतां सांप्रत त्यानीं पुणीयांत श्रीमंत राजश्री रावसाहेबास गैरवाका समजाऊन वडेलचे दो हिशाचे यैवज पौ जागा आम्हा-कडे राहिलीं हें भासऊन त्या यैवजाचे गांव सा नेमून घेऊन ताकीदपत्र घेऊन आले त्यावरून श्रीमंतास विनंती पत्र लिहिले असे तरी तुम्हीं हि विनंती करून खान मार यांसी ताकीदपत्र घेणें व परभारे माहालीं पत्र गला त्यास मनाचिठीं घेणें वडेलचा तनखा हि अलाहिदा यांदीवर लिहून पाठविला आसे अणखी हि कितेक किरकोल बोभाट येथेपरयंत यावे हे उचीत नाहीं तरी श्रीमंतास विनंती करून बोभाट येऊं न देंणे रा। छ १९ जावल बहुत काय लिहिणे हे विनंती

(शिक्का:) श्री मन्मह्लारी चरणी तत्पर खंडोजी सुत मालराव होलकर

(मोर्तब:) मोर्तब सूद

---

ले. १७६ श्री १६८८ आश्वीन शु. १
१७६६ आक्टोबर ४

पौ छ ६ रावल सुा सबा सितैन मया व आलफ

श्रीमंत राजश्री दादाजी स्वामीचे सेवेसी—

सेवक अंताजी त्र्यंबक सां नमस्कार विनंती येथील कुशल ता। अस्वीन शुध १

मुा चांदवड सुखरूप जाणोण स्वामीणी आपले कुशल लिहिती आज्ञा करावी विशेष कृपा करून गोविंद जाखोजी यासी पत्रे दिल्हे की कसबे वेरुळची पाटीलकी घ्रसणेश्वरजीची आहे त्यासी तीन वरश पो होलकर याचे कमाविसदार याणी गोविंदपंत गुमास्ते यासी करू देत नाहीत हक अदाव देत नाहीत त्यासी गोविंदपंत सालमजकुरी परवतीवं गुरव आहे तो येरुळचा आहे त्याणे ताकीदपत्र देऊन पाठविला होता साल मजकुरी बखेडा बहुत केला हजार हो जमाबंदी केली त्यात सोडविले हुकुमत चालू दिल्ही नाहीं देवलाचे कामास प्रारंभ जाला ते समई मोगलाई आमल होता तेव्हा काही पाटीलकीचा मजकूर व देवाचे इनाम नवते पूर्वी मालोजी राजे भोसले दौलताबादकर होते त्यासी जाहगिरी होती त्याणी च देवालय बांधले होते तेथे नांदत होते घर वाडे वगैरे सर्व नाव चालत आले आहे मीसाल कुनबी हली पाटील आहेत ते त्याचे तरफेने होते ते च पाटीलकी करीत आले मीसाल मजकूर भाऊबंद आपल्यात आपण भांडत आले मोगलाचे वेलेस खटखटी सातारी वगैरे ठिकानी केली परंतु मोगलाई करता गणीमाचे काही चालले नाही मिसाल याचा भाऊ कुसाजी बाहेर होता त्याणे फार उपद्याप केला काही न चाले मग दमला सन ११६२ मधे देवलाचे काम सुरु जाले ते समई सातारीयासी जाऊन श्रीमंत माहाराज मातुश्री ताराबाई साहेब याची पत्रे कैलासवासी रा सुभेदार व सौागवतीा मातुश्रीबाईसाहेब यासी पत्रे पाठविली की काम करणे त्यासी दिवसगत फार लागली दरमियाण श्रीमंताकडे पुणियास जाऊन विसाजी अनंत आणिले होते त्याणी काम काज केले आपल्याकडे काही हलाकी नवती परंतु मोगलाईतून देवाचे इनाम पाउनसे हो तनखियाची सेत होती ते जबरदस्तीने काहडली त्यासी कारखानियाचे झडतीस जमा करून श्री देवाची पूजेस लावीत गेले झडतीत जमा आहे सिके जाले ते सन ११७२ मधे जाहगीर आपले सरकारात आली ते समई आवरंगाबादेचे मुा देवाचे इनामासाठी विसाजी अनंत याणी बखेडा केला त्यासी ठोकियाचे मुकामी श्रीमंत राजश्री दादासाहेब राजश्री रावसाहेब होते तेथे च कैलासवासी रा सुभेदार याजपाशी द र ग ऊ डी पाटील व जमीदार आले होते राजश्री शाहाजी भोसले याजपासी विसाजी अनंत जाऊन वर्तमान सांगून इनामाचा मजकूर केला ते समई श्रीमंत राजश्री तात्या साहेब कैलासवासी रा सुभेदार साहेबी आज्ञा केली की मनास आनावे कागद पत्र सातारीचे आम्हाकडे आहेतें आणि देवाची पाटिलकी असली तर श्रीचे देवालय यासी वगैरे काम लाविले इनाम तर देवाचे त्याचे धणी आहे पुजेचा कारभार आहे दुसरे गुमास्ते पाटीकीचे देवाचे व भोसल्याचे अम्ही आहे गुमास्ता न राहू देणे उटऊन उरुवुरु दिल्हे आणि सरकारचे काम करविले त्यासी दोन वरस सन ११७३ सन ११७४ काम चालले सन ११७५ मधे गोविंद जाखोजी गुरव मजकूर याणे उपद्राप करून पाठविला आहे हे काम काही

दरमियान नाहीं यैवज हाकाचा व इनामाचा सरकार झडतीस जमा आहे. त्यासी स्वामी तर वाकीफ नवते म्हणोण त्याजला पत्र दिले त्यासी अम्ही चाकर लोक अम्हास काही उजुर नाहीं धणी च आहे गोविंदपंताणे ठाणे मजकुरी येऊन किल्हे दौलताबाद येथील मावले वगैरे आनोन धोंडी व धर्मा कुणवी यापासून सेभर रुो मसाला घेतला मारहन बहुत केला दररोज पंधरा रुा घेतात अम्हाकडील आमचे भाऊ आहेत त्यासी खटखट करितात की तीन साला हाकाचा यैवज देणे आणि इनाम सोडविले त्या तागाईत यैवज इनामाचा देणे यैवज तर सरकारांत जमा आहे त्यासी गोविंदपंत अतीत्याई फार आहे पांधुरणे जाळून पुणियासी; येऊन नालीस करून आम्हास तेथे नेनार यैसे आहे तुम्ही धणी आहे पैका त्यासी द्यावा यैसे असले तर तैसीच आज्ञा करावी देऊ परंतु आपले सरकारात मजुरां पडल तर उत्तम नाहीं तर दरमियान आम्ही द्यावे की काय या कामाची अगत्य राजश्री नाना फडनीस व राजश्री सिवराम गोविंद व राजश्री नारो बाबाजीस आहे कीं यरुळ परगाणियात काही बखेड व्हावा त्यासीं आम्हासी काहीं उजूर नाहीं. स्वामी आज्ञा करतील ते प्रमाण मार्ग जाला म्हणजे बाकीचा ही लढा काहडतील तो ही द्यावा लागल श्रीमंत येजमान व राजश्री तात्या साहेब अखेर आस्वीन अथवा कार्तीकी पौर्णमे पावतो येतात त्यासी तूर्त स्मामीणी आपले पत्र व सरकारचे पत्र गोविंदपंतास पाठवणे कीं मागील इनामाचे व हकाचे विशई मुजाहिम न होणे पुढे इनामास मुजाहिम न होणे पाटिलकी करतील तर सरकार हुकमत काडीमात्र चालू देत नाहींत येदेवली (?) करावयासी आज्ञा जाली तर सुरलीत अमल देणे यैसी पाठवणे नाहीं तर तो ब्राह्मण आम्हासी खटखट करून कजिया करनार यैसे आहे चिंत पुरऊन काय करणे हे विज्ञाप्ती उतर सत्वर पाठवणे हे विनंती

---

ले. १७७ श्री १६८८ आश्वीन वद्य १२
१७६६ नोवेंबर ३०

चिरंजीव विजेइ भव मारकडीयाचे आयुष राजश्री दादाजीस प्रति सौ आन्नपुर्णाबाई कृतानेक आसिर्वाद उपरि येथील कुशल तां आस्वीन वद्य १२ जाणून स्वकीय लेखन करणें विशेष तुम्हीं श्रीमता समागमे स्वारीस जाता म्हणून वर्तमान कळलें त्यास येदा स्वारी कर्नाटक प्रातीची बहुत कठीण आण तुम्ही प्रवास कधी केला नाही शरीर आशग्त प्रवासांत बहुत सावध आसत जाणें घोडीयावर बसावयाचा आभ्यास करीत जावा इंदुराहून पत्र आली आसली तर वर्तमान लिहून पाठवणें चिरजीव आनोबा व कुशाबा ... चे हक्षर पत्र आज च्यार पाच महिने येऊन वर्तमान कळन नाही तुमचे तेथे तर्ग येतात किवा नाही ते लिा बाजारी वर्तमान आहे

इंदुराहून फिरोन लस्कर श्रीमंत राजेश्री दादासाहेबाकडे जाणार यैसी वदता आहे तुमच तेथे तुमची व सरकारची पत्रे असतील तर तेथे वर्तमान कुशलतेचे लिहून पाठवणें बहुत काये लिहिणे हे आसिर्वाद

---

ले. १७८ श्री १६८८ मार्गशीर्ष शु. २
१७६६ दिसेंबर ४

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमामान्य राजश्री
राघो विठल गोसावि यांसी

सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार सुा सबा सितैन मया व अलफ मौजे सागवी पो पेडगाव हा गाव राजश्री गंगाधर येशवंत याजकडे आहे त्यास तुम्ही उपसग लाविता फडफर्मासिचे रोखे करितां म्हणून मारनिलेनी विदित केले त्याजवरून पत्र सादर केले असे तरी याचे गावास कोणेविसी उपसर्ग न लावणे जाणीजे छ २२ रजब
* आज्ञा प्रमाण

लेखन
सीमा

---

ले. १७९ श्रीमोरया १६८८ मार्गशीर्ष शु॥ १४
१७६६ डिसेंबर १५
पै॥ छ २१ रजेब सु॥सबा

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
राघोबा बापा स्वामीचे शेवेसी

सेवक येशवंतराव गंगाधर सांा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता॥ मार्गसीर्ष शुा १४ सोमवार मुा हुंनूर नजीक सांगोले प्रांत सोलापूर लस्करांत सुखरूप जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणे विशेष तुम्हा पासून तलेगावीहून मंगलवारी प्रतिपदेस स्वार जाहालो तो शंभु माहादेव करून मार्गसीर्ष शुध्ध ६ शष्टी र ( वि ) वारी लस्करांत दाखल जाहालो श्रीमंताची भेटजाली या नंतर येका दोरोजी आज्ञा मागून इंदुरास जाण्याचा उदेश धरिला होता इंदुरास जाऊन त्याजला इकडे घेऊन यावे याअन्वये श्रीमंतानी हि निरोप द्यावयाचा करार केला होता इतकियांत इंदुरीहून तीर्थरूपाची पत्रे श्रीमंतास व आम्हांस आली की आम्ही सत्वर च स्वार होऊन दर मजल देशी येतो म्हणून लिा होते पत्रे श्रीमंतास दाखिविल्या उपरांतीक बहुत संतुष्ट जाले पहिल्यापेक्षा आधिकोत्तर लोभ करितात आपली कामकाज करून घ्यावयाची

---

* येथून अक्षराचें वळण निराळें आहे.

तटली होती ते करून घेतली व पंवाराबाबदचा हि बंदोबस्त करून घेतला आम्हास आगो- धरच निरोप देणार होतें आता ते येतात तेव्हां आम्हास पुढे पाठवणे प्राप्त च जाले आम्हीं मार्गसीर्ष वद्य २ द्वितीयेस गुरुपुष्यावर श्रीमंताची आज्ञा घेऊन दरमजल पंढरपुरावरून वाफगावास येतो तेथुन पुढे हि पाचा सात मजली जावे लागेल तो ते हि तेथून निघाले च आस्तील मार्गी भेट ( ती ) ल सारांश क्षेपनिक्षेप येतात संदेह नाहीं ते येतात तेव्हा दाणादुणा व सरंजामवगैरे आगाउ तरतूद करून सिध्ध केला पाहिजे याजकरिता मुजरत जासूद तुम्हाकडे पाठविला आसे तरी हजार दो हजाराचा गला तांदूल गहू दाणा वगैरे संवग जागा पाहून खरीदी करून बेजमी करून ठेवावी समयास गलांठा द्रष्टीस पडल्यानंतर तीर्थरूपाची मर्जी राहणार नाही यास्तव सर्व सरंजाम देखील लांकूड फाटे गवत काडी आधी करून तयार असो द्यावी ये समई हजार पांचाशा कडे पाहून दाणादुणा वगैरे साहित्य खरीदी न केल्यासं मागील श्रम व्यर्थ होतील तीर्थरूप बहुत प्रसन्न आहेत म्हणोन ती रा मामानी लिा आहे मामाची पत्रे व जीनस पाठविली आहेत त्यावरून तेथील हिसेब कितेबाचा मजकूर व तर्थिरूपाचे मर्जीचे भाव ध्यानास येतील मामाच्या लिा प्रो खेड्यापाड्याचा बंदोबस्त राखावा खेड्यापाड्याचा वसूल वासूल घ्यावयास अ- नमान न करावा परंतु ( खंड )णी तूर्त करू नये मामा आल्या नंतर हाइल या प्रो मामानी लिा आहे गोविंद रामास कोतूल नेवासे दहिगाव राजणी वगैरे गावास (खंड )णीस पाठवावे म्हणोन मामानी त्या प्रो मशारनिलेची रवानगी करावी नव्या घरापुढील आवा- राच्या भिंती घालून आवार मात्र सिध्ध करावे पुढे तूर्त करू नये व जुने वाड्याचा मागील चौक नव्या घरा प्रो करावा म्हणोन तीर्थरुपाची आज्ञा आहे बजिनस मामाची पत्रे पाठविली आहेत तेणे प्रा कलेल त्या रीतीने बंदोबस्त करणे सारांश तीर्थरूप आलियानंतर तुमची आमजी फजीती न होये ते करणे मामा तो तेथे जाऊन रुजू जाले आहेत न्यून पडल्यास निमित्यधारी तुम्ही आम्ही च होऊ याज करिता तरतुदेस आलेस न करणे आम्ही लौकर च येऊन पोहचतो पत्राचे ( उत्तर )जासुदा समागमे देऊन पंढरपुरचे वाटेने पाठवणे लोभ करीत जावा हे विनंती

राजश्री बापा यांशि शास्त्रीबावा व शिवराम कृत आशिर्वाद लिा परिसोन लोभवृध्दी करीत असां श्रीमंत पाराशरपंत यासी उभयथांचे आशिर्वाद

---

ले. १८० — श्री १६८८ मार्गशीर्ष व. ११
१७६६ दिसेंबर २७

राजमान्य राजश्री रघुनाथ हरि हवालदार ता खेड गोसावी यांसि

सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार सुहुर सन सबा सितैन मया व अलफ ता मजकूरीं राजश्री मालजी होळकर व राजश्री गंगाधर यशवंत याचे इनाम गांव वगैरे

आहेत त्यास तुम्हीं उपद्रव देतां व नवीन कजिये उत्पन्न करितां म्हणून मशारनिलेनीं विदित केलें त्याजवरून पत्र सादर केलें असे तरी तुम्हीं उपसर्ग याचे इनाम गावास न देणें कदाचित कजिया गावचा असल्यास याचे हे मनास आणतील तुम्हीं काडीमात्र उपद्रव न लावणें जाणिजे छ २४ रजब आज्ञा प्रमाण

लेखन
सीमा

---

ले. १८१ श्री

सेवेसि सांष्टांग नमस्कार विज्ञापनां येथील कुशल ता। जेष्ट शुा। ३ शनिवार तृतिये प्रहर पर्यंत यथास्थित आसे विशेष आज प्रातःकाली तीर्थस्वरुपाकडील पत्रे आंली ती सेवेसि पाठविलीं पावलीं च असतील म्यां चिटी लिा। आहे त्या चिटींत दहिगांवचे पाटील याचे समाचारास दोन आा। चोरबातमीनें आल्या आहेत म्हणोन लिा। त्यास त्या दोन आा। युक्तीनें च धरल्या एक आा। ठीक वर्तमान न सांगें एक आा। निराली नेऊन वर्तमान राजश्री रामचंद्र व्यंकटश याचे देखता पुसिले आगोधर ठीक न सांगे मग फुटला सांगितले सटवाजी पाचोडा पाटिलाचा हस्तक कारभारी वगैरे आम्ही वीस आा। गावातून बाहेर पडलो पैा। सात आा। देडगावीहून आंम्ही दहिगांवांस लाऊन बाकी तेरा आा। आलों पैा। आकरा जंण येथून पांच सात कोसी खेडें आहे ते तेथे राहून त्यांनीं आम्हास पुढें बातमीस पांठविले या प्राा। सांगितले ते लेहून घेऊन त्याजबरावर पांच राऊत देऊन आकरा आा। धरून आणिल्या याची पैरवी कोणती ती लेहून पाठवावी पैा। दोन तीन कुभांडी आहेत त्यांचे तीर्थस्वरुपानी आडकून ठेवावयांचे लिा। आहे त्यांचे कंसे हें आज्ञा करावी आम्हांपासी चौकीपाहाऱ्यासी आा। थोड्या आहेत याकरिता लस्करच्या आा। पुण्यास येतील त्याज पैा। पांच च्यार आा। ज्या जथील त्या आता सत्वर पाठवाव्या ह्या आा। तेरा सांपडल्या यांत हि कांम आहे तीर्थस्वरुप भिकाजीपंतास सत्वर पाठवावे मीं येथे येकला आणि काम आष्टौ प्रहर बाहेरील बोभांटाची व हें संधान येसें लिगाडांचें आहे यास्तव तेथे त्याजसी बोलावयांचे बोलून पाठवावे हे विज्ञप्ति उतर सत्वर पाठवावे हे विज्ञप्ति

---

ले. १८२ श्री

सदासिव गंगाधर याचे कार्तीक शुध ११ चे मुा। नासीक येथून बाजीपंत मामास पत्र—

विशेष तुम्ही पान्हेल्याहून आलेत म्हणून कळले येक दोन पत्रे हि आपल्यास

पाठविली ते पावली च आसतील ... ... श्रीमंत राजश्री दादासाहेब पौर्णिमेस निघणार आहेत घोडपेवरून खानदेशात उतरणार आहेत तिकडून श्रीमंत रावसाहेब हि येणार गाठ पडेल किंवा दरमजल चालतील हे कलत नांही आम्हांस बराबर जाणे मग गाठ पडणार नाही यास्तव लौकर आलें पाहिजे बहुत काय लिहिणे लोभ आसों दीजे हे विनंती.

गणेगांवी घोडी ठेविली होती त्या पैकी चाकरीची घोडी आम्हाबराबर द्यावीसे चिरंजीव रा। दादाजीनें मान्य केले आहे घोड्यावर हवालदार आहे त्याजसमागमे सरंजामसुधा आम्हाकडे पाठउन द्यावी हे विनंती*

---

ले. १८३ श्री

चिरंजीव राजश्री दादाजीस प्रती सो आन्नपूर्णाबाई कृतानेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। मार्गेस्बर वद्य ३० आमावाशा सोमवार जाणून स्वकीये लेखन करणे विशेष चिरंजीव कुशाबा तेथे आला म्हणून वर्तमान कलले त्यास याचे काय वर्तमान ते लिहून पाठवावे राजश्री तुकोजी बाबा + + यात्रेस जाणार + + + राहणे आणखी किती दिवस + + जाते समई गावावरून जाल किवा + + जाणे होईल हे ल्याहावे आंम्हास [ खर्चाची ] वोढ बहुत आहे राजश्री विष्णु माहादेव याजकडे पत्र पाठविले होते येक हजार रुो कर्जाऊ पाठऊन देणे संसार खर्चास आले म्हणजे तुमचे तुम्हांस पाठऊन देऊ त्यास त्यानी पधरा दिवस माणसे ठेऊन घेतली आणि जाब दिल्हा की प्रस्तुत यैवजाची वोढ आहे म्हणून जाब दिल्हा याजकरिता तुम्हांस लिहिले आसे तर चिरजीव बाजीबास सागोन खर्चास पाठऊन देणे मनुशास संकट प्राप्त जाले तरी आन्नावाचून राहावत नाही वरकडा वाचून राहावल आन्न सर्वास पाहिजे पत्र वाचाल आण येकीकडे टांकले यैसे न करावें पत्र वाचून खर्चास पाठऊन देणे बहुत काय लिहिणें हे विनंती

---

ले. १८४ श्री

चिरंजीव राजश्री दादाजीस प्रति सो आन्नंपूर्णा बाई आसींर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करणे विशष आंम्ही बुधवारी स्वार होऊन नाशकास गेलो आम्हांस श्री त्रिंबकेस्वरास जाणे लागल तिकडे महिना दीड महिना लागल घरी मोरोपत ठेवले आहेत खर्चाची त्यासि बेघमी केली नाही संसार खर्चापैकी बाकी रुा ५० होते ते आंम्ही खर्चास नेले आता वरी येक रुा नाही बोसरीच्या कड्या घालावयासी

---

* टीपः- या च आशयाचे, मुक्कामाचें व मितीचें पत्र सदाशिव गंगाधराकडून चि० दादाजीस गेलें आहे.

सुतार लाविले आहेत आण तेल तूप तादूळ उडीद वगैरे गवत कापावयासी पैसा खर्चीस द्या पाहिजेत तर मोरोपताजवळ रु ५०० पाचसे खर्चास आगत्यरूप देणे फिरून संसाराची वेगमी जाली पाहिजे आम्ही आल्यावर हगाम जाईल याज करिता आगत्यरूप खर्चास द्यावे बहुत काये लिहिणे आसीर्वाद

---

ले. १८५ श्री

दंडवत विनंती उपरि येथील कुशेल जाणोन स्वकिय लेखन करित जाणे विशेष यथून दोन तीन पत्रे तुम्हास पाठविली पावली आस्तील श्रीमंत राजश्री दादासाहेबानी श्रीमंत राजश्री रायांसी पत्र दिल्हे आहे ते राजश्री सिवबा बराबर येथे आले होते ते फिरून सुतरस्वारासमागमे तुम्हापासी पाठविले आहे तेथून पुढें येक शहाण्या कारकुनापासी हे पत्र देऊन श्रीमंत राजश्री रायापासी पाठवावे देसी हुलड जाली त्याचा बदोंबस्त कसा काये केला तो सर्वदा लिहिणे खानदेश वगैरे जागाजागाच्या जफ्त्या उठोन गेल्या कि नाही नस्तील गेल्या तर फिरून त्यास ताकिदपत्रे पाठवून बदोंबस्त आधी करवणे हगांमाचे दिवस चालले जफ्तीवालीयासि दरद काय रयेतीची दरकार त्यास कशास लागावी याजकरिता उठंत्री जेथील गेली नसेल तेथे लवकर करणे वर्तमान सर्वदा लिहिणे रा छ. १५ मोहरम बहुत काये लिहिणे हे विनंति

---

ले. १८६ श्री

पुरवर्णी श्रीमंत राजश्री तात्यास्वामी चे शी विज्ञापना आपण पत्रीं आज्ञा केली कीं चिरंजीव आन्याबा कोठें आहेत काये मनसबा करितात जागीर कोणती किती मेळविली तुम्हांशी वर्तणूक कोण रीतीनें करितात म्हणोन आज्ञा त्यास स्वारीहून आली यानंतर निबगांवी आले तलेगांवी हि आले होते सांप्रत फिरोन निबगांवी गेले आहेत वरुडें वगैरे सरदारीचें कामकाज होणें यास्तव फिरोन पुण्यास दरबार जाणार आहेत जागिरीचा मजकूर तर सालगुदस्तां श्रीमंत राजश्री दादासाहेबांनी तो माजूर पो धोडपाऊण लाख रुपये व पो जामनेर पाऊण लाख व आणखी [illegible] येकून दीड लक्षाचा सरंजाम द्यावा आणि पांचा श्यां राऊतानिशी चाकरी करावी येणें प्रो करारमदार होऊन द्यावे देणेची याद जाहली राजश्री सखारामपंतांसी गाठ पडली यानंतर त्यांणी काये होऊ दिल्हें नाहीं माजूर तरफ तोफखानी याकडे सरंजाम दिल्हा त्याचे मोबदला मेवली अंबडापूर राजश्री पिराजी नाईकाकडील सरंजाम देतां येसे श्रीमंत दादासाहेब म्हणतात श्रीमंत रावसाहेबां कडील + + + गाल तर ते म्हणतात यांजकडे हिंदुस्थान वगैर सरंजाम मातबर आहे कारभार हीं आहे स्वदेसी मुलूख किती राहिला कीं सरंजाम द्यावा येसें म्हणतात आम्हाशी वर्तणूक तर सर्व प्रकारें आपली वडीलांची

कृपा इछितात दुसरा विचार नाहीं जाहागिरीचा मजकूर तर दादासाहेब देतों म्हणतात परंतु रावसाहब व बापूकडून सिधीस जाणे दुर्लभ आहे येविसी पेशजी ही सेवेसी लिहिले आहे मर्जीस आल्यास करू म्हणतात आपणाकडे जोखम तिलमात्र नाहीं परभारे डोल चालेल म्हणतात आपल्या ध्यानास ये तर राहिले याप्रो आहे तरी आज्ञा काय ते केली पाहिजे हे विज्ञापना

---

ले. १८७ श्री १६८३ मार्गशीर्ष ( अजमासे )
१७६१ दिसेंबर

तीर्थस्वरूप मातुश्री समान मायां वडिलाचे सेवेसी.

आपत्यसमान सौ आनपूर्णाबाईचे व सौ काकूचे कृतानेक नमस्कार विनंती उपरि मोगल सोनईस द्वितीयेस आला आज निंबदेहारियास आला आसेल पुणियास येतो आम्हीं जुनरास जातो तुम्ही जुनरास पत्रदर्शणी स्वार होऊन येणे कोणे गोष्टीची आशा न धरणे पांघरूण चिर्गुट घेऊन जाणे आणि घरात येक माणूस रक्षण ठेवण याउपरि जुनरास जावयास येक घडी दिरग न करणे बहुत काये लिहिणे हे विनंती हे पत्र राजश्री बाजी विठल यांचे घरीं देणे

---

ले. १८८ श्री १६८४ कार्तीक शु० १
१७६२ आक्टोबर १८

श्रियासहश्रायु चिरंजीव राजश्री कृष्णराव बापु यांसि सौभाग्यादिसंपन्न काकूचें अनेक आसीर्वाद उपरि येंथील कुशल ता कार्तीक शु. १ प्रतीपदा जाणुन मुा तलेगाव येथे सुखरूप असो विशेष तुम्ही पत्र पाठविलें त्याजवरून वर्तमान सविस्तर कळले तुम्हास लस्करास यावयाची आज्ञा आली तरी याच मार्गे येऊन भेट घेऊन जावे कदांचित पुण्यास च गेला तरी गेला वरंकड वर्तमान तरी यथास्थित असे* बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद+

---

* येथून अक्षर काकूचें + यापुढें बाजीं विठलानें आशीर्वाद, दादाजीनें नमस्कार वगैरे लिहिला आहे.

ले. १८९ श्री शके १६८४ ( अदमास )
इ. स. १७६२

चिरंजीव विजई भव राजमान्य राजश्री आन्याबा यांसी बाजी विठल आसीर्वाद उपरि आपण राउत पाठवितों म्हणून मान्य केलें याजकरिता प्रतीक्षा केली अपल्यास विस्मरण पडलें त्यास आम्हांविसी उपेक्षाबुधी सहसा नसावी आम्हास आपले आज्ञे- वितरिक्त अर्थप्राण दुसरीकडे जोड नाहीं श्रीमंत राजश्री तात्यांस पत्र लिहिलें आहे ते आपण विनंती करून देसीहून आम्हास निर्मुक्त करून मुलें माणसें सुधां समागमें घ्यावें आमचे आहे तें सर्वस्व तुमचे असें दुसरा अर्थ चितांत सहसा न धरावा कासीबा वीर याचे जवाहीर गाहाण आहे कालदेस त्याचे लिगाड गाहाणाचे कामाचे नाही त्यांचा पैका किमतीप्रमाणें धरून हिसेब रा + + + + + + पाहून + + करून नवे खत आपल्या विचारें दोन तीन हिसेब प्रकारचे केले आहेत त्यामधे तुमचे विचा- रास येईल तसा फडशा करू + + + खत घ्यावें त्यास राऊत पाठऊन आणावयासी अंतर कराल तरी माझी शफत असे तुम्हास कारभारामुळें अवकाश नाहीं खरा च परंतु चिरंजीव बापू तुम्ही दोघांतून येकजण अवकाश करून हे कार्य करावे आडावद परगाणियांत गांव डमडेरियापासून किनगांव खुर्द अगर लोणी अगर पारगांव यांतून येक करार करून घेऊन सनद रा विनायेकपंताचे स्वाधीन करणें साल मारचा वसूल घेतला असेल तो यांजकडे देणें म्हणून कमावीसदारास त्यांचे ताकीदपत्र घ्यावे बहूत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आसीर्वाद चिरंजीव राजश्री बापू व दादाजीस आसीर्वाद + + + + + हे काम स्मरण धरून करावे हे आसीर्वाद

---

ले. १९० श्री १६८४ मार्गशीर्ष वद्य ७
१७६२ दिसेंबर ७

तीर्थरूप सौ मातुश्री बाई व काकू
वडीलांचे शेवेसी

आपत्ये कृष्णरायाने चरणावर मस्तक ठेऊन कृतानेक सिरसाां नमस्कार विनंती उपरि येथील कुशल तागाईत मार्गशीर्ष वद्य ७ सतपर्म मुा नजीक हारवडा येथें सुखरूप जाणोन स्वकीये कुशल सदैव लेखन करावयासि आज्ञा केली पाहिजे विशेष वडीलाची आज्ञा घेऊन स्वार जालो तें सुखरूप लस्करांत तीर्थरूपापासी पावलों येथील साध्यंत वृत तीर्थस्वरूप राजश्री आन्याबांचे पत्री तीर्थरूपानी लिहिले आहे त्यावरून सर्व आवगत होईल सारांश गोष्टी भेटी होतील तो सुदीन आसे सर्वदा आसीर्वाद पत्र पाठऊन बालकाचा सांभाल करीत जावा पत्र दोन महिने जाले आसीर्वादाचें न आले तरी करून सचित आसो तर आसीर्वादपत्री निरंतर सांभालति आसावें बहुत काय लिहिणे शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

---

ले. १९१ श्री १६८५ ज्येष्ठ शु. २
१७६३ मे १५

सौभाग्यादिसंपन्य वज्रचूडेमडित अन्नपूर्णाबाई यास

प्रति अमाबाई क्षेम विनंती आमचें वर्तमान ता। जेष्ठ सुध द्वितीया मंदवासर मु॥ वाफगाव तुमचे ग्रही समस्त सुखरूप असों विशेष वर्तमान या प्रांती मोगलाचा दंगा जाला याजमुले आमची गावची मडली बाभुलवाडियास गेली आम्ही सडी मात्र मातबर जागा आणि तुमचा आश्रय जाणून येथें आलों त्यास येथील प्रकार तर जे समई विनायकदासाचा मुकाम येथें + + गावकरी यानी खडणी केली तो यैवज येकदा च द्यावयाचा करार केला तेव्हा येथील कमावीशदार विसाजीपंत व भिकाजीपंत व बणाजी टवाला + + + + गला पडोन पैका घेतला + + + कोण्हांची अबरू राहू दिल्ही नाही तेव्हा आम्हास हि तगादा केला प्यादे लाविले अबरूवर गे + + + + णी संकट जाणून रा॥ + + + + कासीसडे येथे पाई ... स जावयास आले गुरे घोडी घेऊन जात होते त्यास त्याजला येकट्यास मात्र आम्ही आपल्याजवल रहाऊन घेतले कीं आम्हाजवल कोण्हीं नाही त्या + + + ष्य सर्व वस्तभाव बाभुळवाडियात आहेत पैकियाची निकड केली तेव्हा त्याच्या हाते राजश्री मोरो नारायेण याचे विद्यमाने त्यांच्या भरणियात यैवज नग दोन हाजाराची भरती सोनयाची करून दिल्ही निरखा मन माने तैसा चौदा प्रा॥ धरला आणि खत येकदर मोरो नारायेण यास करून दिल्हे तेव्हा करार की पटी करून यैवज वसूल करून घेतल्या + + घ्यावा या करारावर नग दिल्हे त्यास वेढा उठोन गेला दोन च्यार दिवस जाल्या उपर खत मोरो नारायेण याजपासून जबरदस्तीनें घेतलें आणि कटाला किल्ल्यात ठेविल्या आहेत त्या हि + + + आहेत खत घेतले तेव्हा मोरो नारायेण जात होते त्याजबराबर आम्हीं हि बाहेर निघत होतो त्यास वेसी बंद केल्या जागजागा चौक्या बैसविल्या लुटून घ्यावे यैसा मनसबा केला तेव्हा राहावे लागले याप्रकारे येथे आम्ही कैदे दाखल आहों घोडे देखील बाहेर पाणियावर जाऊ देत नाहीत परतु तुमचा आश्रय समर्थ म्हणून स्वस्थ चित करून आहो पत्री विस्तार लिहिता पुर्वत नाही सारांष कीं येथील ग्रहस्तास लेहून आमचा यैवज आम्हास पावता होये ते गोष्टी + + + + गुडियावर यथास्थित केली असती तर खडणीचा यैवज वारून सरकार किफायत हि होती परंतु त्याणी कैसे केले हे न कळे आम्हीं हि चौघा प्रा॥ पटी द्यावयास कबूल असता + + + अटकावली आहेत आणि + + + + आहे तो देत नाहीत ये विशई + + + मान सर्व तुम्हास आहे जेणे करून याचें पारपत्य होये आणि पैका देऊन वोझी न अटकावीत यैसे करावें + + + तुम्हांकडील वृत कळत नव्हते + + + चिंता वाटत होती त्यास तुमचे पत्र बाबूखानाबराबर आले त्याजवरून वर्तमान कळोन समाधान जाले यैसे च निरतर पत्र पाठऊन साभाळ करीत असिलें पाहिजे निघो ज चे

+ + + तर घरे वाचली आहेत दाणियाची पेवे वगैरे घरातील वस्तभाव सर्व नेली पारनेरीं ठाणे बैसले आहे ते वो शा गावापासी देखील खडण्या घेतल्या आमच्या गावाजवळ सात हाजार खडणी घेतली आता वस्ती होत आहे बाभुळवाडियास काही खडणी पडली नाही तेथें जे गेली ते सुख पावली आम्ही मात्र येथे या सुखात पडिलो कलले पाहिजे बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती*

---

ले. १९२ श्री १६८५ फाल्गुन ( अजमासे )
१७६४ मार्च

श्रीउतमगुण ...... विराजित राजेश्री गंगाधरपंत
स्वामी गोसावी याचे सेवेशी

पोस्ये रामाजी यादव सा। नमस्कार विनंती उपर विनंती उपर येथील कुशल जाणोन तुम्ही अपले निजानंद सदैव लिहित गेले पाहिजे यानंतर तुम्ही आम्हास घेऊन आलेस त्या समई करार केला की येजमानानी आज्ञा केली आहे त्याजप्रा। वर्तणूक केली पाहिजे त्यासि हिसेब कितेक जो तुमचे आमचे गुजारतीने आहे तो रुजु करावा जो स्वतंतर आसेल त्यासी रुजु पाहोन काही स्वकीये कामकाज आसेल ते त्वरेने करून श्रीत्रिंबकस्वरास जाऊन आटोपून यावे आमचे घरी मुलींचे लग्न सौभाग्यवती मथुराबाईचे आहे तेथे मी हि सहश्र कामे टाकून येतो सिधीस पाऊन कामाकाजाचा निकाल येजमानास श्रुत करणे त्याचे आज्ञे माफक करून स्वार होऊन येजमानाकडे जावयासि प्रयाण करावे त्यासि मार्गप्रतीक्षा करीत राहिलो परतु लिहिले आले राजश्री बाजीपंत हि न पाठविले बरे आनकुळ पडले नसेल श्रीकृपेकरून लग्नसिधी जाली राजेश्री धोंडोपंतदादा व राजेश्री नाना व राजेश्री आबा व मातुश्री आंबाबाई व येसूबाई सर्वत्र लाहाणथोर आली होती उतम प्रकारे सारस्ये संपादून समाधाने आजी द्वितयेस स्वार होऊन गेले लग्नसमुदाय हि फार च होता परतु ईश्वरे उतम प्रकारे सिधीस पावविले तुम्हाकडे नेत्र आमचे लागले होते परतु मनोदये न जाला बरेपणा न होय प्रमाणे राजेश्री माहादाजीपंत बाबा याचे हि शरीरी स्वस्थ नवते व श्रीमत् राजेश्री विस्वासराउ यासी घेऊन जावे परतु उस्णकाल फार याजकरिता संकोच करून राहिले सेवेस निरवणूक केली होती त्याजप्रा। यानी हि निभावले याउपर तुमचा काय विचार मजला काय आज्ञा करिता ते आपले सत्ये स्मरोन आज्ञा करावी माझ्या शरीराची अवस्था तर परस्परे श्रुत होईल जर ईश्वर च कृपा करील तर बरे नाही तर काही बरे नाही परतु आम्ही तर तुमच्या भरवासियावर राहिलो परतु आम्ही तो नाही म्हणता परतु अववल जातमुखी देसोन येतें बरं आमची तर सेवटील बाजी आहे तुम्हास तर करुणा येत

---

* या पुढे राजसबाईचे नमस्कार व गंगाबाईस आशीर्वाद लिहिला आहे.

नाही उदंड अभये वचन किंया शफत दीधली परतु आमच्या कपाले तुम्हास निर्दयेता च प्राप्त होती चिरंजीव मुलास निरऊन तुमचे हाती द्यावे येजमानाच्या पायावर घालावे परतु विना तुमची चितसुधाता असल्याखेरीज कैसा योग घडतो याउपर तुम्ही भेटीचा लाभ देऊन मुलाचा आकीकार[1] करावा आपले पदरी भलेपण कियावतपण[2] घेऊन निभाऊन घ्यावे तुमच्या आमच्या मुलाची गाठ ये [क]त्र करून स्वामिसेवा करवावी म्हणजे आमचा हेत मुक्त होतो तुम्हास ईश्वर येस देतो हे जालियाखेरीज आम्ही घरी कैसे राहावे सर्व प्रकारे येजमानाचे निमित्ये होते येजमान भला आहे परतु बुधीभेद जाली याउपर बुधीचा स्थिरता राहात नाही याजकरता यांवे मग वाटेस जे श्री करील ते सुखे करू तुम्हास ईश्वर येश देईल ते खरे म्या कोणे वाटे यावे भेटी कोठे होईल मग जे आज्ञा कराल ते खरी उतर सत्वर पा। कृपा लोभ आसू दीजे हे विनती

---

ले. १९३ श्री १६८६ आषाढ शु. २१
१७६४ जुलै ९

श्रीमंत राजश्री त्र्यंबकपंतदादा
स्वामीचे सेवेसी

पो। बाजी विठल सां। नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता। आशाढ शुध ११ येकादशी पावेतों मुकाम नेवासे आपल्या कृपेकरून येथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष आपली आज्ञा घेऊन वाफगांवास आलों तो राजश्री रघुनाथराव भाउ खानदेशातून तेथ आले खानदेशांत माझा जाण्याचा विचार आपणासी बोलिलों च होतो त्यास यांची गांठ पडली याउपर यांचे मते तेथून इंदूर जवल आहे राजश्री लक्ष्मणरावजी बराबर जाऊन मातुश्री बाईची भेटी घेऊन यांवें मागील दुसाला हिसेब दाखवावा फडशा जाल्यास करावा अथवा श्रीमंत राजश्री तात्यांचा उजूर केल्यास पुढे सारें मंडल येका जागा जालियावर फडशा होईल येसे कितेक प्रकारें सांगितलें त्यास राजश्री रावजीपंतबावा पारनेरात येणार होते आले असतील म्हणून त्या च मार्गे आलो तों बावा आद्यांपि पुणियांत च आहेत यास्तव हें पत्र सेवेसी लिहिलें आहे खानदेशांत जातो तेथून इंदुरापावेतों हि जावें लागल त्यास राजश्री भाऊ विनंती करितील तरी येक पत्र मातुश्री बाईसाहेबांस स्वदस्तुरचे अवस्यमेव लिहून पाठवावे की सर्वप्रकारे कैलासवासी हरीपंतबावांच्या श्नेहावर द्रष्टी देऊन यांचे चालवांवे पहिला हिसेबाचा फडशा करून पुढे यांजवर लोभ करीत येसी करुणापर वाक्यें लिहावी आणि

---

१ आकीकार = अंगिकार. २ कियावतपण = क्रियावंतपण, खरेपणा.

या च प्रकारें राजश्री रावजीपंत बाबाचे हि येक पत्र यैसी जरूर जरूर पाठवावीं आतां दादांमागे यासि सर्व भरवसा तुमचा आहे तुमचे सोबती होते आपण वडील आहेत यांचे व्यंग दिसलियास दादा स्वर्गी तुम्हांस हांसतील लोभाची वृधी करावी हे विनती

---

ले. १९४ श्री

राजश्री बाजीपंत गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य

श्नो वेंकाजी करंजे दडवत विनती उपरी येथील कुशल ताा छ २१ साबान मुा निंबगांव जाणोन स्वकीये लिहीत गेले पाहिजे यानंतर तुम्हासी करार केला होता त्या प्राा तयार होऊन मौजे मजकुरास आलो साल गुदस्त साठी हजार समाईक रसद दिल्ही म्हणौन कमाविसी चे गावी खर्चास पाहिजे याकरिता दोन हजार रुा वसूल घेऊन उदईक स्वार होउन तुम्हाकडे यावे तो धनसेटी भाउनी सरकारचा डालाईत पाा त्यावरून आम्ही श्रीमंतास व राजश्री नाना फडणीस यासी पत्रे लिहून राघोब दावल भगत पाा त्यानी दरबारास जाऊन फडनीसांजवल लाखोटे दिल्हे तो धनसेटी भाऊनी बातमी लावली च होती ते हि दरबारास गेले नाना फडनीस यांजवल कानी काये सागितले हे न कले त्यानी राघोबाचे मागे ढलाईत लाऊन दोन हजार रुपये वेकोबाने घेतले आहेत ते माघारे देणे म्हणौन आटकेत ठेविले आणि आम्हांस राजश्री मल्हारजी होलकर व गंगांधरपत तात्या याणी आसरा दिल्हा म्हणौन श्रीमतांकडे जातात याकरिता सखोजी जगथाप सासवडकर यासी पत्र पो की वेकोवा करजे निंबगावी आहेत त्याजला घेऊन पुणियास येणे त्याजवरून आम्ही पुणियास जाऊ परतु तुम्ही राजश्री तात्या यांजला उतम प्रकारे बोध करून श्रीमंत राजश्री दादा यांजवल वर्तमान सागोन श्रीमंत राजश्री रावसाहेब व नाना फडनीस याजंला पत्रे घेऊन पाठवावी की धनसेट व वेकाजी करजे याजंला आम्हाकडे पाठऊन देणे आणि राघोबा दावल भगत बसविला आहे त्याजंला सोडणे दोने हजाराचा तगादा न लावणे येणे प्राो पत्रे घेऊन खामखा या गावास येक पत्र सरकांरचे जे अमातन यैवज असो देणें उभयेतास येक रुपाया न देणे यैसी पत्रे घेऊन पाठविली पाहिजेत* आमची सर्व भिस्त तुम्हावर आहे ज्या प्राो श्री सिधेस्वरी बोल्लिा आहा तेनप्राा करावे येविसेई तात्यास व राो रामचंद्र गनेस व दादोबा गोसावी व सुभेदार यास लिहिले आहे आम्ही तर फाशात पडलो आहो फाशातून पार

---

* येथून शेवटपर्यंत अक्षर वेंकाजी करंजे यांचें.

पाडने तुम्हाकडे आहे यइसे करावे जे तीर्थरूप कइलसी तुम्हास न हसत फार काये ल्याहावे बहुत काय लिा हे विनंती.

---

ले. १९५ श्री १६८७ वैशाख शु० ५
१७६६ एप्रील २५

पौ छ १२ जिलकाद

श्रीमंत राजश्री तात्या या [ सी ]

प्रती श्रीविष्णुभक्त तुलसीराम बैरागी. वास्तव्य इंदूर कुतानेक आसिरवाद उपरि येथील क्षेम ता वैशाख शुध ५ + + कुशल जाणौन निजानंद वैभव लेखिकास आज्ञा केली पाहिजे विशेष दिवस जाले या मार्गे येतील दरशण घडेल म्हणौन मार्ग प्रतिक्ष करीत होतो परंतु लाभ न घडला याजवरून चित सापेक्षित आसे पुढे ज्या वेळेस घडेल तो सुदीन आसे आपण यावे तरी मजल दर मजल फौज गेली आता येणारा समागमे + + + + लिहून सतोशविले पाहिजे + + सावळदास बेरागी आपल्या संनिध आले आहेत हे आमचे आवशक आहेत हे आपलया संनिध वर्तमान निवेदन करतील त्यावरून ध्यानास येणार या + + + साहिता करून ताकीदपत्र आज्ञा केले पाहिजे आपण + + प्रतिपालक आहांत करिता ताकीदपत्र दिल्हे पाहिजे श्रीरामनवमीचा प्रसाद लालदास बेरागी समागमे पाठविले आहे प्रा होईल विशेष काये लिहिणे + + शुभचिंतक आसो कृपा आभिवृधी करावी हा आसिरवाद

---

ले. १९६

गोविंदाचे आन्याबास श्रावण वद्य ९ मुा नजीक भांडेर येथुन पत्र: –

इकडील वर्तमान तरी प्रस्तुत वोडसे प्रांतातील गढयाचे पारपत्य होत आसे तोफा सुरजेहून आणिल्या पाचा रोजा दाखल होतील दतियाबालियाची मामलत जाली प्रस्तुत वालागढीस मोर्चे लाविले आहेत लवकर च घेतील वोडसेवाला राजा मृत पावला गढी घेतली याबर बोडसीवालियाचा निर्गम कसा होतो पाहावे आद्याप त्याजकडील कोणी आले नाही निर्गमास आलियावर ग्वालेर प्रांती बंदोबस्तास जावेसे आहे दुसरे विजयादशमी जालिया पठाण रोहिले याचे पारपत्य गेजमानास करणे आवशक आहे इंदुरी राजश्री आपाजीपंत भाऊ पा तीन च्यार हजार फौज ठेऊन राजश्री बाबासाहेबास रवाना करून शाहाजी दाभाडे व तुकोजी खेणे याचे मनास आणून बंदोबस्त करविला आसे (इत्यादि ... ...)

---

ले. १९७ श्री

तीर्थरूप सौभाग्यादिसंपन्न मातुश्रीबाई
वडीलाचे सेवेसी

आपत्ये सदासिवाने चरणावर मस्तक ठेऊन सां नमस्कार विनंती येथील कुशल ता। पौष शुध १४ पावेतो मुकाम व्याहमाडवे येथास्थित जाणून स्वकीयें लेखन करीत आसिले पाहिजे विशष आम्ही चांदवडाकडून कालेगांवावरून नेवासियाहून येथे आलों श्रींची समाराधना येक दों दिवसात आबडास जाऊं + + + ताकडे लस्करात जावयाचा उ + + + + परंतु गणेगांवकर अनदराव गरुड + + + गरुड व भिकाजी गरुड व मधाजी गरुड व नि + + + व कर व त्रिंबकराव गरुड व मुगटराव जगथाप व उमाजी वागजकर कोलगांवकर वगैरे सिलेदार व राजश्री जीवनराव आद्याप आले नाहीत दाहा बारा दिवसाचा करार करून गेले त्यास येक मास होत आला आद्याप न आले दहीगावीहून पत्रे हि वडीलाकडे पाठविलीं ते पावेली च आसतील बहुतकरून आज उदईक आम्हापासी दाखल व्हावे येसें आहे परंतु न कळे सिलेदार भाई सुस्ताई करून दिवसगत लावितील यास्तव आपण ताकीद निकडीने करून सत्वर सिलेदार मजकुरास पाठऊन द्यावे उतर प्रांतातून तीर्थरूपांची व श्रीमंत रा। सुभेदारांची पत्रें आली ते बजिनस आपणाकडे पाठविली असेत पाऊन आक्षरशाहा वर्तमान कळल यानतर पत्रे आम्हाकडे तीर्थरूपांची व येजमानांची पाठऊन द्यावी आम्ही हि तिकडे जात च आहोंत देखलां युध्य केला जाईल सर्व भगवतसता प्रमाण आसे त्याहीवर वडीलाचे आसीर्वादे कल्याण च आहे चिंता किमपि नाही श्रीमताचा व भोसलियाचा आद्याप मुकाबिला जाला नाही बहुतकरून सख्य च होईल यैसे आहे इतकियावर काये घडोन येईल तें पाहावें त्यावर येंदाचे साल माहा कठीण दुस्काळ + + + दिसोन येतों उतर प्रांते जाणे जां + + + + च आहे कदाचित देसीं राहाणे + + + + वगैरे धान्य खर्च बहुत लागेल वडीली ध + + + हास जपावें पत्रे आली ते पाहून ताबडतोब दुसऱ्या माणसा बराबर पाठवावे लस्करचे जासुदास घराचा बोडा आहे जाऊन घरीं बसील यास्तव ती पत्रे दुसऱ्या माणसाबराबर पाठवणे जासुदास जाब तुम्हीं आपला देऊन मजकडे पाठवणे बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती

राजश्री मोरो रामचंद्र व बाबूराव बचाजीस नमस्कार भास्कर जिवाजीच्या कामाविसी लिहिले तरी स्मरण धरून लिहिल्या प्रो तगायास न चुकावे बहुत काये लिहिणे हे विनंती

---

ले. १९८ श्रीशंकर १६८८ श्रावण शुद्ध ८
१७६६ आगष्ट १३

पौ छ ६ रोवल
सुा सबा सितैन

विनति उपरि राजश्री त्रिबकपंतदादा व येसवतराऊ गंगाधर यासि उपरि पहिले कागद आम्ही लिहिला मागून आमचे मानस* इदुरीहून आलीं छ १० स + वर्तमाण आल की श्रीमंत दादासाहेब याचीं गालेरवर छोवनी जाली श्रीमंत मालराउ होलकर व तात्यासाहेब यासि आज्ञा दिधली की इदुरास जाण ते तेथून स्वार जाले आठ दाहा दिवसामधे इदुरास दाखल होनार याकरिता आपनास कलाव याकरिता लिहिल अस बहुत काय लिहिण हे विज्ञापना

* मानस = माणसें.

---

ले. १९९ श्रीमोरया १६८९ आषाढ वद्य ६
१७६७ जुलै १६

श्रियासह चिरंजीव राजश्री माधवराव यासि गंगाधर येशवंत असीर्वाद उपरि येथील कुशल ताा आषाढ वाा ६ शष्टी गुरुवार मुा नेवासें जाणून स्वकीय कुशललेखन करीत जाणें विशेष तुमची पत्रें आली तें पावत गेलीं त्याची उतरें येथून वरचेवर रवाना जाली आहेत ते पावतील सांप्रत मातुश्री बाईसाहेबांस पत्र लिहिलें आहे व राजश्री विष्णुपंतानी लिा आहे ते पाठविलीं आहेत येकांती आक्षरशा वाचून दाखऊन उतरें लौकर पाठवणें तेथील वर्तमान आनेक रीतीचे परभारें यैकतो आणि तुम्ही कांही लिहीत नाहीं तरी यैसें न करणें रात्रदिवस सावधतेनें राहून होईल वर्तमान ते दिनचर्येचे वरचेवर लिहून पाठवीत जाणें बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद.

---

ले. २०० श्री

पौा छ०२५ माहे सफर

श्रीमंत राजश्री तात्या
स्वामीचे सेवेसी

सेवक चिमाजी नारायेण कृतानेक साष्टांग नमस्कार वितंती उपरि येथील कुशल ताा श्रावण वद्य पंचमी मुकाम श्री अवंतिकापुरी जाणून स्वकीयें कुशल लेखन करावें विशेष आपण पत्र पाठविलें तें पावले समाधान जालें यैसें च निरंतर पत्र पाठऊन सांभालीत आसावें यैसीयासी आम्ही इकडें राहून आपलें सेवेशी राजेश्री विठल कृष्ण पाठविले आहेत त्यांवर ममता करून पागेच्या खर्चाचा परांम्रष घेत जावा आपल्या सिवाये लस्करांत अश्रये कोणाचा नांही कर्जवाम त्यांस

मिल्नार नांही ज्या गोष्टीने आमचा निभाव होये तो अर्थ करावा लस्करांत माहागाई बहुत आहे आणि कर्ज कोठे मिलत नांही याजकरिता पंत मारनिले याची तारांबळ होत असेल सारांष त्यांची तारांबळ होत नसेल तो अर्थ करावा आपण वडील सर्व गोष्टीनें आहेत राजश्री माहादजी सिंदे याजकडे आमची सोये बनून येत नांही पहिल्यापासून त्यांचे संग्रही आहोंत येकायेकीं आम्हीं आपल्याकडे आलियास त्यांसी विशमता दिसोन येईल म्हणून हा काळपर्यंत त्यांजपांसी राहिलो परंतु निर्वाह होत नांही आपली स्वारी जयेपुराकडे गेली आहे राजेश्री माधोसिंगाकडील वकील येऊन करारमदार मामलतीचा करतील त्यास आमचे मानस कीं त्या प्रांती आपल्या सरकारांत माहाल येतील तेथील येका माहालचें कामकाज सांगावें आपण चितावर धरून सनदपत्र आमचे नावे करून घ्यावी आण आम्हांस उतर लिहून पाठवावे त्या प्रो रात्रींचा दिवस करून आपल्या सेवेसी येऊं चौं वडील आश्रये तुटले सांप्रत्य भरवसा आपला आहे निभाव करणे आपल्यास आहे बहुत काये लिहिणे कृपालोभ असों दीजे हे विनंती

---

ले. २०१ श्री

गऊ ब्रह्मनप्रतिपालक निराआधारियास आधार श्रीमंत राजश्री तात्या साहेब यांसि

प्रती असरीत अनत राम गुगरे आसिरवाद उपरि येथील जाणून स्वकीये लिा गेले पाहिजे या नतर आपली आज्ञा घेऊन स्वार जालो ते प्रयागांस सुखरूप पावलो आपन व राजेश्री कासीबा बोन्हाडे व तुकजी होलकर व आनदराव सितोले यैस स्वस्ती क्षेम पावलो चिंता न करण आपन खर्चास दिलद्द त्यास दर सेकडा रुा १३ तेरा प्रा हुडनावल गेली बरे + + स हि परामृश करनार समर्थ आहेत सर्व निरव्हा करन आपलयास आहे कलल पाहिजे बहुत काय लिा हे विनती

राजश्री बापु व राजेश्री माधवराव यास असीरवाद लिा अर्थ परसीजे कृपालोभ असो देणे हे विनती.

वेदमोर्त राजेश्री सकमभट व रामभट व जैरामभट यास सां नमस्कार लिा अर्थ परसीजे कृपालोभ आसो देण आपले येजमानस बिनती करीत जाण आपन आपले आहेत कलल पाहिजे हे विनती

---

ले. २०२ श्री पौ १६८८ चैत्र शुद्ध ७
१७६७ एप्रील ५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर येशवंतस्वामी गो यास पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत

जाणे विशेष मालराव होळकर यास फाल्गुण वद्ये द्वादशीस देवाज्ञा जाली म्हणून रा। सदाशीव गंगाधर याणी निवेदन केले॥

पौ छ ५ जिलकाद मुा इंदूर *

---

ले. २०३ श्री १६८९ माघशुद्ध १३
१७६८ ज्यानेवारी ३१

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
तुको महिपतराव गोसावी यासि

सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार सुा समान सितैन मया व आलफ आपाजी पाटील मौजे गोदी पो आवड याणे हुजूर विदित केले की हणवंतराव निंबालकर याही नारो मल्हार यास आणावयास अवधूत रघुनाथ स्वार देऊन पाठविले ते मौजे मजकुरी येऊन ठिकाण लाविता न लागे तेव्हा गावचे पाटील कुलकर्णी धरून नेऊन जबरदस्तीने तीन हजार रुपये घेतले याकरिता औरंगाबादेचे मुकामी राजश्री हैबतराव याजपासी जाऊन हटकिले ते समई सदरहू रुपये बीडास गेलियावरी देवितो म्हणोन कबूल केले परंतु आद्याप देत नाही म्हणोन याजवरून हे पत्र सादर केले असे याचा वाजवी अवज असल्यास हैबतरायास सांगोन देवावा +जाणिजे छ १० रमजान बहुत काय लिहिणे

लेखन
सीमा

---

* ही नकल आहे, अस्सल पत्र नव्हे.

+ येथून अक्षराचें वळण निराळें आहे.

समाप्त.

# सूचि.

( आंकडे पृष्ठांक आहेत. )

व



श

## ल

